# विलायतची डाक

## [ युरोपांतून पाठविलेलीं पत्रें ]

लेखक :

डॉ. वसंत नारायण पाटणकर,

एम्. ए., पीएच्. डी. ( मँचेस्टर )

आवृत्ति १ ली

★

जानेवारी १९५५

★

किंमत दोन रुपये

# प्रास्ताविक चार शब्द



**विलायतची डाक** म्हणजे माझा भाऊ वसंत यानें युरोपांतून पाठविलेल्या पत्रांचा संग्रह. गणित आणि संख्याशास्त्र ( Statistics ) या विषयांचा पदव्युत्तर अभ्यासक्रम मुंबई विश्वविद्यालयांत अत्यंत यशस्वी रीतीनें पुरा करून तो १९५१ सालच्या सप्टेंबर महिन्यांत इंग्लंडमधील मँचेस्टर विद्यापीठांत संशोधनात्मक अभ्यास करून पीएच्. डी. ही पदवी मिळविण्याकरितां गेला. त्याकरितां त्याला मुंबई विश्वविद्यालयानें सर मंगळदास नथूभाई टेक्निकल एज्युकेशन स्कॉलरशिप आणि नंतर त्याच नांवाची एक ट्रॅव्हलिंग फेलोशिप दिली होती.

माझा भाऊ म्हणजे गणिताचा विद्यार्थी. पण शाळेंत आणि कालेजात असतांना त्यानें आवडीचा विषय म्हणून वाङ्मयाचा अभ्यासहि खाजगी रीतीनें चालू ठेवला होता. त्यामुळें त्याच्या लिखाणांत एक प्रकारचा रसाळपणा असे. युरोपांतील दोन वर्षांच्या वास्तव्यांत त्यानें तेथील सामाजिक परिस्थितीचें अत्यंत बारकाईनें आणि मार्मिकपणें निरीक्षण केलें व तत्संबंधींचीं शेंकडों पत्रें मला व आमच्या नातेवाइकांना पाठविलीं. हीं पत्रें आमच्या कुटुंबांतील मंडळी आणि स्नेही नेहमीं आवडीनें वाचीत. त्यांतील दोन पत्रें ( **नाताळचा आनंद, शुभमंगल झालें !** ) सहज स्त्री मासिकाचे संपादक श्री. मुकुंदराव किर्लोस्कर यांस अवलोकनार्थ पाठविलीं. तीं त्यांना इतकीं आवडलीं कीं, लागलीच लागोपाठ दोन महिन्यांत त्यांनीं तीं '**स्त्री**' मासिकांत छापूनहि टाकलीं. तसेंच **हेलसिंकी येथील ऑलिंपिक सामन्यांसंबंधींचे 'केसरी'च्या** अंकांत प्रसिद्ध झालेले त्याचे तीन लेख वाचकांना अतिशय आवडले व त्यांचीं अभिनंदनाचीं अनेक वैयक्तिक पत्रें आम्हांला आलीं. **समाजसेवा** ( मुंबई ) या त्रैमासिकांतून प्रसिद्ध झालेलीं कांहीं पत्रें ( **हिमवृष्टि, कोळशाची खाण, इंग्लंडच्या राजाचा मृत्यु, सिनेमा व शिस्त** ) हींहि वाचकांना फार आवडलीं. तेव्हां यांतील आणखी कांहीं पत्रें निवडून त्यांचें छोटें पुस्तकच प्रसिद्ध केलें तर महाराष्ट्रीय वाचकांना तर तें आवडेलच, पण शाळांतील

विद्यार्थ्यांनाहि त्यायोगें सामान्यतः त्यांच्या पुस्तकांत न आढळणारी बरीच माहिती मिळून त्यांचें मनोरंजन होईल, त्यांना त्यायोगें एक तऱ्हेची दृष्टि मिळेल, असें वाटल्यावरून आज त्यांतील कांहीं निवडक ३१ पत्रें '**विलायतची डाक**' या पुस्तकरूपानें प्रसिद्ध करीत आहें. अर्थात् हीं पत्रें प्रसिद्ध करतांना खाजगी, वैयक्तिक आणि कुटुंबीय मजकूर गाळून त्यांचें योग्य असें संपादन करावें लागलें. या कामीं माझ्या भावाचे स्नेही प्रा. हेमंत विष्णु इनामदार यांची फारच मदत झाली.

या पत्रांत जर्मनी, नॉर्वे, स्वीडन, फिन्लंड, हॉलंड, डेन्मार्क इ. देशांतील माहिती देतांना अनेकदां त्या त्या देशांतील प्रख्यात व्यक्तींचा आणि शहरांचा उल्लेख करावा लागला आहे. त्यांच्या नांवांचे उच्चार कसे करावयाचे ही एक अडचणच होती. त्या बाबतींत पुण्याच्या सर परशुरामभाऊ कॉलेजांतील जर्मन भाषेचे प्राध्यापक डॉ. चाफेकर यांची व सेंट व्हिन्सेंट हायस्कूल, पुणें, येथील विद्यार्थी हेगेल गोखले यांची मदत झाली. हेगेल यांचा जन्म नॉर्वेमध्यें झालेला व त्यांचें कांहीं शिक्षणहि नॉर्वेमध्यें झालेलें, त्यामुळें त्यांची बरीच मदत झाली. याबद्दल त्यांची व डॉ. चाफेकर यांची मी आभारी आहें. कांहीं नांवांच्या उच्चारांच्या बाबतींत मात्र अडचण राहिलीच. त्यामुळें सर्वच नांवांचे उच्चार अगदीं बरोबर असतील अशी खात्री देतां येत नाहीं. त्या बाबतींत जाणत्या वाचकांकडून कांहीं सूचना आल्यास मी त्यांची आभारी होईन व पुस्तकाच्या पुढील आवृत्तींत योग्य ते बदल करीन.

उत्तर युरोपच्या सहलींत Pocket Guide to Europe या पुस्तकाचा माझ्या भावास बराच उपयोग झाला. प्रत्येक देशांत जाण्यापूर्वी त्या देशासंबंधींची माहिती या पुस्तकांतून त्यानें मिळविली होती. कांहीं पत्रांत या माहितीचा उपयोग करण्यांत आला आहे.

'स्त्री' मासिकाचे संपादक श्री. किर्लोस्कर आणि 'केसरी'चे संपादक श्री. ज. श्री. टिळक यांनीं त्या त्या नियतकालिकांत प्रसिद्ध झालेले लेख या पुस्तकांत पुनर्मुद्रित करण्यास अनुमति दिली. तसेंच 'समाजसेवा' मासिकाचे संपादक श्री. दत्तप्रसन्न कारखानीस (कवि आणि मराठीचे नामवंत अध्यापक) यांनीं त्या मासिकांत प्रसिद्ध झालेले दोन लेख व पुण्याच्या नू. म. हायस्कूलचे

शिक्षणतज्ज्ञ मुख्याध्यापक प्रा. वा. मा. दबडघाव व शाळेच्या मासिकाचे सहसंपादक प्रा. प्र. न. जोशी यांनीं शाळेच्या नियतकालिकांत प्रसिद्ध झालेले लेख ( बर्गन-ऑस्लो आगगाडीचा प्रवास ) पुनर्मुद्रित करण्यास अनुमति दिली. या सर्वांचे मी मनःपूर्वक आभार मानतें.

या पुस्तकांत प्रसिद्ध होत असलेल्या पत्रांबरोबरच युरोपांतील वास्तव्यांत जीं जीं स्थळें पाहिलीं तेथील प्रेक्षणीय दृश्यांचे शेकडों फोटोहि माझ्या भावानें स्वतः काढून पाठविले होते. अर्थात् ते सर्व छापणें खर्चाच्या दृष्टीनें शक्य नव्हतें. म्हणून त्यांतील निवडक फोटोच या पुस्तकांत छापले आहेत. कांहीं प्रसंगांचे फोटो नव्हते. त्यांचीं चित्रें काढून छापलीं आहेत. या चित्रांच्या बाबतींत चित्रकार भाऊराव खरे आणि प्रतिमा प्रकाशन संस्थेचे मालक मेसर्स जोशी–लोखंडे यांची फारच मदत झाली. कांहींहि मोबदला न घेतां या सर्वांनीं ही मदत केली. त्यांची मी आभारी आहें.

पुस्तक-प्रकाशनाच्या प्रांतांत मी हें पहिलेंच पाऊल टाकीत आहें. या बाबतींत वेळो वेळीं सल्ला देऊन व मार्गदर्शन करून माझी आई व वडील यांनीं मला सर्वतोपरी उत्तेजन दिलें. तसेंच माझा भाऊ वसंत व वहिनी सौ. कुसुमताई यांनीं प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष बरीच मदत केली. याबद्दल त्यांचे आभार कसे मानायचे ! त्यांच्या ऋणांत राहण्यांतच मी स्वतःला धन्य समजेन.

हीं पत्रें ज्या विद्यार्थ्यांकरितां प्रसिद्ध करीत आहें त्यांना तीं आवडोत व त्यांपासून त्यांना ज्ञानप्राप्ति होवो हीच इच्छा !

‘ नीलिमा ’, विजयनगर कॉलनी,<br>
पुणें २.<br>
ता. १४ जानेवारी, १९५५<br>
( मकरसंक्रमण )

**उषा पाटणकर**

# अनुक्रमाणिका

## विभाग १ ला

## मुंबई ते मँचेस्टर



## विभाग २ रा

## इंग्लंडमधील कांहीं विशेष अनुभव

## विभाग ३ रा

# उत्तर युरोपची सफर : विविध अनुभव

# विभाग पहिला

# मुंबई ते मँचेस्टर

पत्र १ लें

## बोटीवरील जीवन

॥ श्री ॥

सोमवार, दि. १० सप्टेंबर, १९५१.
स्ट्रॅथेडन बोटीवरून.

प्रिय सौ. आईस कृ. शि. सा. नमस्कार.

माझा आतांपर्यंतचा प्रवास फारच मर्जेत झाला. समुद्र शांत असल्यामुळें बोट मुळींच हालत नाहीं. काल थोडासा त्रास झाला; पण ओकारी एकदांहि झाली नाहीं. लिमलेटच्या एक-दोन गोळया संपल्या. लिंबू तर तसेंच राहिलें आहे. आतां प्रवासाची मजा चांगली येत आहे. तूं माझी अजीबात काळजी करूं नकोस.

माझ्या केबिनमधील श्री. अनंतरामन् हे 'ऱ्होड्स स्कॉलर' म्हणून इंग्लंडला जात आहेत. ते ऑस्ट्रेलियास जाऊन आले आहेत. त्यांच्या अनुभवाचा उपयोग होतो. श्री. स्वामीनाथन् हेहि आमच्याबरोबर आहेत. ते इंग्लंडमध्यें बरींच वर्षें होते. ते माझ्या शेजारीं जेवायला बसतात; त्यामुळें मला जेवण्याच्या सर्व चालीरीति (टेबल मॅनर्स) सहजगत्या समजल्या.

बोटीवरील माझा दैनंदिन कार्यक्रम असा आहे : मी सकाळीं खूप उशिरां उठतों; आणि तोहि परिचारक (स्टुअर्ड) चहा व सफरचंद घेऊन येतो व उठवतो म्हणूनच. या चहाला बिछान्यांत असतांनाच घ्यावयाचा चहा (बेड टी) असें म्हणतात. त्या वेळीं साडेसात वाजलेले असतात. परंतु आम्ही पश्चिमेस जात असल्यामुळें रोज पहांटे अर्धा तास घड्याळ मागें करावें

लागतें. नंतर दाढी, शौचमुखमार्जन, स्नान इत्यादि प्रातःकर्मे. संडास कमोद पद्धतीचे. स्नानसुद्धां टबमध्येंच. समुद्राच्या पाण्यानें प्रथम स्नान करावयाचें व मग प्रत्येकाला फक्त एक मोठी बादली स्वच्छ पाणी मिळतें. पण तें भरपूर होतें. हें होईपर्यंत ८॥ वाजतात. मग अर्धा तास डेकवर स्वच्छ हवा खात आरामखुर्चीवर बसून इतरांशीं गप्पा मारतों व नव्या ओळखी करून घेतों. नऊ वाजतां न्याहारीचा (ब्रेकफस्टचा) बिगुल होतो. चहा, आमलेट, पाव, केक, मटण इत्यादि भरपूर व चांगले पदार्थ या वेळीं मिळतात. दहा वाजेपर्यंत गप्पागोष्टी करीत न्याहारी संपल्यावर मी डेकवर खेळायला जातों. डेक गेम, टेबल टेनिस, रिंग टेनिस, बुद्धिबळें, पत्ते वगैरे खेळांपैकीं कांहीं खेळ खेळतों; किंवा पियानो, बँड इत्यादि वाद्यें चालू असतात तीं ऐकतों; अगर नभोवाणीवर बातम्या लागलेल्या असतात त्या ऐकत बसतों. हें करतां करतां दीड केव्हां वाजतो तें कळतहि नाहीं. दीड वाजतां लंच म्हणजे दुपारचें जेवण असतें. सर्व पदार्थ इंग्रजी पद्धतीचे असतात. ते कांट्याचमच्यांनीं खायची मला आतां उत्तम संवय झाली आहे. लंचच्या शेवटीं कॉफी किंवा आइसक्रीम असतें आणि उत्तम सफरचंदें व नारिंगें मिळतात. तीं बहुधा ऑस्ट्रेलियांतील असावींत.

दुपारीं आम्ही ब्रिज खेळतों. भारतांतून आलेले सुमारें शंभर विद्यार्थी बोटीवर आहेत. शिवाय फ्रान्समधील रग्बीची टीम ऑस्ट्रेलियांत गेली होती, तीमधील खेळाडूहि बोटीवर आहेत. ब्रिज खेळतांना नवनवीन ओळखी होतात. चार वाजतां चहा असतो. चहाबरोबर केक, बिस्किट, पाव इत्यादि असतात. चहा संपल्यावर मी ग्रंथालयांत वाचीत बसतों किंवा पोहण्याच्या तलावाकडे जातों. संध्याकाळीं सकाळचेच कांहीं खेळ खेळतों किंवा डेकवरून सृष्टिसौंदर्य पाहत बसतों.

रात्रीं आठ वाजतां भोजन (डिनर) असतें. या वेळीं सर्व प्रवासी उत्तम पोषाख घालून येतात. मच्छी, मटण, सूप इत्यादि पदार्थांची रेलचेल असते. जेवण छानच असतें. त्यानंतर वृन्दवादन, बोलपट, नृत्य वगैरे करमणुकीचे कार्यक्रम रात्रीं अकरा वाजेपर्यंत चालतात, त्यांचा आस्वाद घेतों. कांहीं वेळ डेकवर बसून मित्रांशीं गप्पा मारीत समुद्राची शोभा पाहत बसतों आणि निद्रादेवीची छाप पडूं लागल्यावर झोंपावयास जातों.



स्ट्रॅथेडन बोट



बोटींतील केबिन

अशा रीतीनें माझा प्रवास अगदीं मजेंत चालला आहे. माझी काळजी मुळींच करूं नये. उद्यां सकाळीं बोट एडनला पोंचेल. आम्ही सर्व जण गांवांत जाऊन येणार आहोंत. तेथील मजा पुढील पत्रांत कळवीन.

चि. उषा काय म्हणते? तिला माझे शुभाशीर्वाद. ती. नानांना शि. सा. नमस्कार.

तुझा,
**वसन्त**

* * *

पत्र २ रें

## एडन

॥ श्री ॥

शुक्रवार, दि. १४ सप्टेंबर, १९५१.
स्ट्रॅथेडन बोटीवरून.

प्रिय उषा,

माझें मागचें सौ. आईला लिहिलेलें पत्र मिळालें असेलच. मंगळवारीं सकाळीं आठ वाजतां आमची बोट एडन बंदरांत पोंचली. चार दिवसांच्या सतत प्रवासानंतर भूमातेचें दर्शन झाल्यामुळें आम्हां सर्वांना अवर्णनीय आनंद झाला व आमचे पाय केव्हां एकदां जमिनीस लागतात असें झालें.

एडन हें राजकीय दृष्ट्या महत्त्वाचें ठिकाण आहे. आशियाई देशांतून सुएझमार्गें युरोपकडे जातांना तांबडा समुद्र व हिंदी महासागर यांना सांधणाऱ्या अरुंद पट्टीवर एडन हें बंदर वसलें आहे. येथें समुद्रकिनारा इतका उथळ आहे कीं, बोट बंदरापर्यंत जाऊं शकत नाहीं. सुमारें एक फर्लांग आंत उभी राहते व मग छोट्या होड्यांतून किनाऱ्यावर यावें लागतें. त्याकरितां जातां येतां माणशीं दोन शिलिंग भाडें द्यावें लागतें. एडन हें अरबस्तानच्या दक्षिणेस असल्यामुळें येथील हवा फार कोरडी आहे. येथें पाऊस क्वचितच पडतो. उन्हाळा फार आहे; त्यामुळें सकाळचे आठ वाजले असूनहि अंगांतून

घामाच्या धारा वाहत होत्या. सुएझ येईपर्यंत अशीच उष्णता राहणार आहे. केबिनमध्यें बसणें तर अशक्यच आहे. वारा जरासुद्धां नसतो. सर्व लोक उघडे ( म्हणजे फक्त आंतील चड्डया घालून ) बसतात. हिंदी लोक मात्र सुती पँट व शर्ट घालून घामाचा वर्षाव सहज सहन करूं शकतात. कारण आपल्याला अशा हवेची संवय आहे. युरोपियन लोकांना मात्र या हवेचा इतका त्रास होतो कीं, जो तो म्हणतो कीं, आपण या मार्गानें पुन्हां कधीं येणार नाहीं.

एडनमध्यें उतरल्यावर जिकडे तिकडे डोंगरच डोंगर दिसतात. किनाऱ्यालगत फक्त दोनशें यार्डांची पट्टी समुद्रसपाटीवर आहे. एडन गांवाचा बाजार समुद्रकिनाऱ्याला लागून आहे. येथील वस्ती मिश्र आहे. अरबस्तानांतील मुसलमान, भारतांतील गुजराथी व पारशी आणि युरोपांतील इंग्रज असे लोक येथें प्रामुख्यानें आढळतात. इंग्रजांनीं आपल्या जीवनाची छाप येथील रहिवाशांवर पाडली आहे. गांवठी मुसलमानांचीं पोरेंसुद्धां आमच्याशीं इंग्रजींतून बोलत होतीं. येथें हिंदी व इंग्लिश पैसे चलन म्हणून चालतात. एडनला आयात-कर फारच कमी आहे; त्यामुळें वस्तु स्वस्त मिळतात. आपल्याकडील तीनशें रुपये किंमतीचें घड्याळ येथें एकशेंसाठ रुपयांस मिळतें. फरचे गालिचे, विणकाम व नक्षीकाम यांचें उत्कृष्ट अरबस्तानी कौशल्य येथें पाहायला मिळालें.

किनाऱ्यावरील बाजार पाहण्यांतच बराच वेळ गेल्यामुळें एडन-कॅम्प न पाहतां दुपारीं साडेबारा वाजतां आम्ही बोटीवर परत आलों. एक वाजतां बोट सुटली व आमचा तांबड्या समुद्रांतील प्रवास सुरू झाला. तासाभरांत आम्ही सुएझला पोंचूं.

आमच्या या प्रवासांत रात्रीं गमतीगमती पाहायला मिळतात. पौर्णिमा जवळ येत आहे. 'शरदाच्या चांदण्यांत' समुद्राचें पाणी पाहिलें कीं क्षीरसागराची आठवण होते. रात्रीच्या वेळीं जाणारें एखादें जहाज ( त्यावरील सर्व दिवे लावलेले असल्यामुळें ) मोठें सुंदर दिसतें. कोळयानें आपल्या अंगांतून धागे काढीत काढीत नयनरम्य जाळें विणावें तसें तें जहाज रुपेरी रस्ता खोदीत खोदीत पुढें जात असतें. आणखी एक मजा पाहिली ती माशांची. मोठाले मासे पाण्यांतून हवेंत दोन-तीन फूट उंच उड्या मारून परत समुद्रांत सूर मारीत असत.

तांबड्या समुद्राची पट्टी फारच अरुंद असल्यामुळें रात्रीं प्रवास करणारीं दोन जहाजें, सर्व दिवे लावलेले असल्यामुळें, एकमेकांना दुरून दिसतात आणि मग दोन्ही जहाजांवरील प्रवासी आरडाओरड करून एकमेकांना सलामी ( ग्रीटिंग ) देतात.

आज दुपारीं सुएझ शहर, रात्रीं सुएझ कालवा व उद्यां सकाळीं पोर्ट सय्यद येथें बोट जाईल.

तुझी सहामाही परीक्षा केव्हां आहे? सौ. आईची प्रकृति कशी आहे? तिला व ती. नानांना शि. सा. नमस्कार.

तुझा,
भाऊ

* * *

पत्र ३ रें

## सुएझ व पोर्ट सय्यद

॥ श्री ॥

मंगळवार, दि. १८ सप्टेंबर, १९५१.
स्ट्रॅथेडन बोटीवरून.

प्रिय उषा,

माझें सुएझहून टाकलेलें पत्र पोहोंचलें असेलच. त्यानंतर सुएझ कालवा, पोर्ट सय्यद वगैरे भाग उरकून आमची बोट मार्सेल्सच्या मार्गाला लागली आहे. गेल्या दोन दिवसांत इतक्या विविध गोष्टी पाहिल्या कीं त्यामुळें प्रवासाची सार्थकता वाटली.

एडननंतर तांबड्या समुद्रांतील उष्ण हवेचें मीं वर्णन केलें होतेंच. जसजसें सुएझ जवळ येऊं लागलें तसतशी हवा बदलल्याची स्पष्ट जाणीव होऊं लागली. गार वारे सुटूं लागले व उष्णतामान भराभर उतरूं लागलें. मुंबई ते एडन हें अंतर १६८० मैल आहे व एडन ते सुएझ १३१० मैल आहे.

जसजसें सुएझ जवळ येऊं लागलें तसतसा तांबडा समुद्र अरुंद होऊं लागला व दोन्ही बाजूंना मैल दोन मैल अंतरावर पर्वतांच्या रांगा दिसूं लागल्या. हा सर्व प्रदेश वाळवंटाचा असल्यामुळें पर्वतांवर एकहि झाडझुडूप नव्हतें. केवळ दगडी पर्वतच म्हणा ना !

सुएझचें महत्त्व तुला नव्यानें सांगावयास नकोच. तांबडा समुद्र आणि भूमध्यसमुद्र यांना जमिनीच्या एका अरुंद तुकड्यानें विभक्त केलें होतें. त्यामुळें युरोपांतून पूर्वेकडे येण्यास जहाजांना आफ्रिकेला वळसा घालून यावें लागे. १८६९ सालीं फर्डिनंड डी लेसेप्स या फ्रेंच इंजिनियरनें सुमारें १०० मैलांचा हा कालवा खणून जहाजांना नवा जवळचा मार्ग करून दिला. या कालव्याची रुंदी २०० फूट एवढीच आहे. तांबड्या समुद्राच्या बाजूला सुएझ बंदर आहे व भूमध्यसमुद्राच्या बाजूला पोर्ट सय्यद हें बंदर आहे. सध्यां इजिप्त व सुएझ यांसंबंधीं चाललेल्या राजकीय घडामोडी तूं वाचीत असशीलच. ब्रिटिश लोकांविरुद्ध येथें तंग वातावरण निर्माण झालें आहे. त्यामुळें येथें सध्यां लष्करी कायदा जारी आहे. प्रत्येक बोटीची कडक तपासणी होते. सुएझ कालव्याचे फोटो घेण्यास पूर्ण मनाई आहे. कालवा अरुंद असल्यानें एका वेळेला एका दिशेनें एकच बोट त्यांतून जाऊं शकते, अशी एकेरी वाहतूक चालते. त्यामुळें सुएझ बंदरांत आमची बोट शुक्रवारला ( ता. १४।९।५१ ) दुपारीं १२॥ वाजतां पोहोंचूनहि संध्याकाळीं ७ वाजेपर्यंत आम्हांला कालव्यांतून जाण्याला मार्ग मिळाला नाहीं. इतका वेळ बोट थांबूनहि सुएझ बंदर व गांव आम्हांला बोटींतूनच पाहावें लागलें. कारण बोटींतून उतरण्यास कोणालाच परवानगी नव्हती. गांवांत घरें वगैरे उत्तम तऱ्हेचीं असून बगीचेहि मुबलक आहेत. आणि असें सुरेख गांव जवळून पाहावयास मिळालें नाहीं म्हणून हळहळ वाटली.

रात्रीं सात वाजतां आमच्या बोटीस कालव्यांतून जाण्यास परवानगी मिळाली. कालवा अत्यंत अरुंद, दोन्ही बाजूंना अगदीं जवळ जमीन आणि मधून आमची बोट संथपणें चालली होती. घरें कालव्याला अगदीं लागून असल्यामुळें एखाद्या बसमधून रस्त्यानें जातांना जशीं घरें दिसतात तसें दृश्य दिसलें. घरांतील माणसें, फर्निचर, अगदीं सर्व कांहीं स्पष्ट दिसलें, त्यामुळें खूपच मजा वाटली. कालव्याच्या कडेला एका बाजूनें हिरवे आणि दुसऱ्या

बाजूनें तांबडे दिवे कालव्याची हद्द लांबून दाखविण्यास आहेत. आणि मागील बाजूनें सर्व कालव्यावर सर्च लाइटचे झोत टाकतात. सुएझ गांव संपल्यावर दोन्ही बाजूंस ओसाड जमीन लागते. मात्र सुएझ व पोर्ट सय्यद यांना जोडणारा रेल्वेरस्ता व मोटाररस्ता दोन्हीहि कालव्यांच्या शेजारूनच जातात. त्यामुळें रात्रीच्या वेळीं एखादी मोटार प्रकाशाचा झोत लांबवर टाकून आणि भोंग्याचा कर्कश आवाज जणूं बोटीला खिजविण्यासाठीं करून खूप वेगांत पुढें जाते; तसेंच एखादी आगगाडी इंजिनाचा धूर सोडीत भरकन् पुढें जाते. कधीं कधीं रस्त्यानें एखादा उंट धीम्मेपणानें जातांना दिसतो. आणि एवढ्यांत एखादें लहानसें खेडें कालव्याच्या कांठावर दिसूं लागतें त्या वेळीं खेड्यांतील लहान लहान मुलें बोटीचें कौतुक करीत धांवत धांवत तेथें जमतात—हीं सर्व दृश्यं खरोखर मनोहर वाटतात.

कालवा खोलीला कमी असल्यानें १०० मैल अंतर तोडण्यास आम्हांला १४ तास लागले व पोर्ट सय्यदला आम्ही शनिवारीं (१५।९) सकाळीं ९ वाजतां पोहोंचलों. पोर्ट सय्यद हें खूप मोठें बंदर आहे. अक्षरशः शेंकडों जहाजें बंदरांत दिसतात. आम्हांला बोटीवरून उतरून गांव पाहण्यास परवानगी मिळाली. परंतु तत्पूर्वीं इजिप्त सरकारच्या अधिकाऱ्यांनीं आमचे पासपोर्ट व हेल्थ सर्टिफिकिटें वगैरे पाहून व आमची झडती घेऊन मगच आम्हांला शहरांत जाऊं दिलें. हें सर्व होतांना १० वाजले. दुपारीं दोन वाजतां बोट सुटणार होती; त्यामुळें गांवांत भटकण्यास तीन-चार तास मिळाले.

पोर्ट सय्यद हें गांव आधुनिक पद्धतीचें आहे. रस्ते खूप मोठे व आंखीव आहेत. इमारती तीन-चार मजली तर सहजच आहेत, पण कांहीं तर सात-आठ मजलीहि आढळल्या. दुकानें, हॉटेलें भव्य आहेत. मात्र येथें फ्रेंच कलाकौशल्य व स्थापत्य यांचा पगडा जास्त वाटला. दुकानांच्या पाट्या व रस्त्यांचीं नांवें इजिप्शियन आणि फ्रेंच या दोन्ही भाषांतून आढळलीं. क्वचित् ठिकाणीं इंग्रजी भाषा दिसली; पण मोठ्या दुकानांत फ्रेंच भाषाच बोलली जाते. चलन म्हणून इजिप्शियन पैशांशिवाय फ्रेंच व इंग्लिश अशीं दोन्ही नाणीं चालतात. वाहनें रस्त्याच्या उजव्या बाजूनें चालतांना प्रथमच पाहावयास मिळालीं.

येथें वाहन म्हणजे टॅक्सी किंवा घोड्याची गाडी. मुख्य वस्ती अर्थात् इजिप्शियन लोकांची. फ्रेंच व इंग्रज लोक आहेत, पण एकंदरीनें कमीच.

येथील इजिप्शियन लोक खूप मोठा झगा घालतात. तो अगदीं डोक्यापासून पायांपर्यंत येतो. गोषामुळें रस्त्यांतून स्त्रिया मुळींच आढळल्या नाहींत.

येथील लोकांच्या स्वभावाविषयीं मात्र आम्हां सर्वांना फारच वाईट अनुभव आला. राष्ट्राची किंमत त्यांतील लोकांची सचोटी, न्यायप्रियता, उमदेपणा वगैरे गोष्टींवरून ठरते. पण इजिप्तविषयीं एक प्रकारचा तिरस्कार, केवळ दोन-तीन तासांच्या अवधींत सर्वांच्या मनांत निर्माण झाला. बाहेरच्या देशांतून आलेल्या प्रवाशाला उत्तम तऱ्हेनें वागवावयाचें सोडून त्याच्याकडून वाटेल त्या मार्गानें पैसे उकळावयाचे हा धंदा येथें पद्धतशीर चालतो. गिऱ्हाइकाला माल नको असला तरी तो त्याच्या गळ्यांत मारावयाचा यांत तर या लोकांचा अगदीं हातखंडा आहे. येथें रस्त्यांतून एकट्या-दुकट्यानें हिंडण्याची भर दिवसांहि सोय नाहीं. दहा-बारा जणांचा कंपू करूनच हिंडावें लागतें. नाहीं तर नवखा माणूस त्यांच्या तावडींत सांपडतो. मी व माझ्या केबिनमधील अनन्तरामन् आम्ही दोघे जणच एकत्र होतों. बळजबरीनें आम्हांला बुटांना पॉलिश करून घ्यावें लागलें व खजुराची एक पेटीहि विकत घ्यावी लागली. आम्ही एवढ्यावरच निभावलों. इतरांना याहून फारच वाईट अनुभव आला.

असो. दुपारीं दोन वाजतां बोटीनें पोर्ट सय्यद सोडलें व भूमध्य समुद्राचा प्रवास सुरू झाला. बोट क्रीटजवळून रविवारीं दुपारीं गेली. सोमवारीं दुपारीं इटली व सिसिली यांच्यामधून बोट गेली. दोन्ही बाजूंना रम्य वनश्री व सुंदर गांवें पाहावयास मिळालीं.

काल संध्याकाळीं स्ट्रांबोली या प्रसिद्ध बेटाजवळून बोट गेली. त्या बेटावरील ज्वालामुखी सध्या जागृत आहे. त्यामुळें धुरानें भरलेला तो ज्वालामुखी अगदीं जवळून पाहावयास मिळाला. जागृत ज्वालामुखी पाहण्याचा आयुष्यांतला हा पहिलाच प्रसंग !

आणखी तास दीड तासानें आमची बोट कॉर्सिका व सार्डिनिया या बेटांमधून मार्सेल्सला जाईल. तेथें आम्ही उद्यां बुधवारीं सकाळीं सहा वाजतां पोहोंचूं व तेथून दुपारीं चार वाजतां पुढें जाण्यास निघूं. मार्सेल्स शहर मोटारींतून चार तास पाहण्याची सहल आमच्या बोटीमार्फतच आंखण्यांत आली आहे. आम्ही बरेच जण जाणार आहोंत.

तुमचें सर्वांचें ठीक चाललें आहे ना? तुमच्या पत्राची मी लंडनला वाट पाहीन. सविस्तर हकीकत कळवा. आतां माझें पुढचें पत्र लंडनला पोहोंचल्यावरच टाकीन. मी अगदीं आनंदांत आहें. मुळींच काळजी करूं नये. ती. नाना व सौ. आई यांना शिरसाष्टांग नमस्कार.

तुझा,

**भाऊ**

* * *

**पत्र ४ थें**

## लंडनला पोहोंचलों

॥ श्री ॥

लंडन, दि. २५ सप्टेंबर, १९५१.

ती. नानांना कृ. शि. सा. नमस्कार.

बुधवार दि. १९ ला सकाळीं आम्ही **मार्सेलसला** पोंचलों. तेथें बोट दहा तास थांबते. त्यामुळें गांवांतील बराच भाग पाहावयास मिळाला. सर्वत्र द्राक्षांच्या वेली दिसत होत्या व हवा थंडगार, छान होती. फ्रान्समधील हें सर्वांत जुनें शहर. लोक आनंदी वाटले.

बुधवारीं सायंकाळीं साडेचार वाजतां आमची बोट सुटली. जिब्राल्टर शुक्रवारीं रात्रीं गेलें. तेथें बोट थांबली नाहीं. नंतर बे ऑफ बिस्कीपर्यंतचा प्रवास चौदा-पंधरा तासांचा आहे. समुद्र शांत होता, त्यामुळें कोणालाच त्रास झाला नाहीं. रविवार दि. २३ ला इंग्लंडच्या दक्षिणेस ब्रिक्झॅम येथें बोट थांबली. तेथें फक्त पासपोर्ट तपासणारे अधिकारी बोटींत चढले व बोट पुन्हां सुरू झाली. त्या रात्रीं आमची पासपोर्ट तपासणी झाली. सोमवारीं सकाळीं आठला लंडनच्या टिलबरी डॉक्समध्यें बोट लागली. खुद्द लंडन-पासून टिलबरी हें तीस मैल आहे. म्हणून स्पेशल बोट ट्रेन्स होत्या. त्यांत बसून आम्ही तीन वाजतां सेंट पॅंक्रस या लंडनमधील स्टेशनांत आलों. तेथें श्री. नवाथे भेटले. (त्यांचें पत्र मला ब्रिक्झॅम येथें मिळालें होतें.) त्यांनीं टॅक्सी करून मला श्री. कानिटकरांच्या हॉटेलांत आणलें. येथें महाराष्ट्रीय विद्यार्थी बरेच आहेत.

आज सकाळीं साडेनऊ वाजतां न्याहारी करून श्री. नवाथे यांचेकडे गेलों. त्यांनीं मला हायकमिशनरच्या कचेरींत नेलें. नांव नोंदलें. नंतर वॉटर्लू ब्रिज, पार्लमेंट सभागृहें, ट्रॅफल्गार चौक, १० डाउनिंग स्ट्रीट, वेस्ट मिनिस्टर ॲबी इत्यादि स्थळें पाहिलीं. त्यानंतर हॉटेलांत भोजन करून दुपारीं तीन वाजतां नभोवाणी झंकारच्या कचेरींत जाऊन तेथें श्री. शरद साठे यांना भेटलों. त्यांच्याशीं गप्पा मारल्या.

मी येत्या शनिवारीं मँचेस्टरला जाणार आहें. पुढील पत्र तेथूनच पाठवीन.

सौ. आईला सप्रेम शि. सा. नमस्कार. चि. उषाला शुभाशीर्वाद.

आपला,
वसन्त

* * *

पत्र ५ वें

## मुक्काम गांठला

॥ श्री ॥

मँचेस्टर, दि. २ ऑक्टोबर, १९५१.

प्रिय उषास सप्रेम आशीर्वाद.

गेल्या शनिवारीं सकाळीं पावणेदहा वाजतां कॉमेट या आगगाडीनें मीं लंडन सोडलें. येथें गाड्यांना पहिला व तिसरा असे दोनच वर्ग असतात. येथील तिसरा वर्ग म्हणजे आपल्याकडील गाड्यांचा पहिलाच वर्ग होय. मऊ गाद्यांच्या स्वतंत्र सीट्स असतात. तिकिट आधीं कितीहि दिवस काढतां येतें व जागा राखून ठेवतां येते. लंडन ते मँचेस्टर हें अंतर १८८ मैल आहे. तिसऱ्या वर्गाचा दर १ पौंड १७॥ शिलिंग आणि रिझर्व्हेशन फी एक शिलिंग असें हें महाग काम आहे. मँचेस्टरला श्री. नायर यांना पत्र पाठवून मीं माझी गाडी कळविली होती. पण ऐनवेळीं माझी गाडी लेट झाल्यामुळें आमची मँचेस्टर स्टेशनवर चुकामूक झाली. मी क्षणभर गोंधळलों; पण लगेच हमाल

करून एका सार्वजनिक टेलिफोनकडे त्याचेबरोबर गेलों. विद्यापीठाजवळच्या एका हॉटेलचा नंबर टेलिफोन डिरेक्टरींतून शोधून काढला व जागा आहे का तें विचारलें. त्यांचा होकार येतांच टॅक्सी करून त्या हॉटेलांत गेलों व एका खोलींत सामान टाकलें. लंडनच्या श्री. कानिटकरांनीं मला दोन पत्ते दिले होते. एक श्री. जव्हेरी या महाराष्ट्रीय विद्यार्थ्याचा व दुसरा श्री. दत्ता या बंगाली विद्यार्थ्याचा. हॉटेलच्या मॅनेजरला श्री. जव्हेरीच्या खोलीकडे जाण्याचा पत्ता विचारला. चार मैलांवर तें ठिकाण होतें. मी तर नवखा माणूस. पण इंग्रज लोक या बाबतींत फार सज्जन. दोनदां बस बदलायची होती. पण अनेकांनीं मला मार्गदर्शन केलें. शेवटीं खोली सांपडली; पण जव्हेरी तेथें नव्हता. त्यानें खोली बदलली होती. त्याचा नवा पत्ता मिळाला नाहीं.

रविवारीं सकाळीं श्री. दत्ताला भेटण्यासाठीं बाहेर पडलों. तो खोलीवर भेटलाहि. त्याच्या खोलीपासून विद्यापीठ लांब आहे. तसेंच तेथें कामगारांची वस्ती जास्त आहे. संध्याकाळीं त्याचेबरोबर भारतीय विद्यार्थी मंडळांत गेलों. कांहीं जणांनीं मला पत्ते दिले. त्या ठिकाणीं सोमवारीं हिंडलों व एक चांगलें घर पाहिलें. हा भाग विद्यापीठापासून फार तर मैलभर लांब आहे. खोली छान आहे. खोलींत कॉट, बिछाना, टेबल, खुर्ची, सोफा खुर्ची, दोन–तीन कपाटें इत्यादि सर्व आवश्यक तें फर्निचर आहे. शेगडी आहे. उबदार पांघरुणें (दोन जाड ब्लॅंकेटें व दोन चादरी) आहेत. येथें पैसे देऊन पाहुणा (पेइंग गेस्ट) म्हणून राहायचें. सकाळीं न्याहारी (ब्रेकफस्ट) व सायंकाळीं सहा वाजतां जेवण (डिनर) मिळणार आहे. शनिवारीं व रविवारीं दुपारीं जेवण (लंच) मिळेल. सोमवार ते शुक्रवारचें दुपारचें जेवण येथील पद्धतीप्रमाणें बाहेर हॉटेलांत घ्यावें लागेल. या सर्व सोयींबद्दल दर आठवड्याचे २ पौंड १५ शिलिंग इतके पैसे द्यावे लागतील. असो.

काल मी प्रा. बार्टलेट यांना भेटलों. विद्यापीठांतील संख्याशास्त्र विभागाचे प्रमुख प्राध्यापक म्हणून ते काम करतात. त्यांनीं माझी अगत्यपूर्वक सर्व चौकशी केली, व विद्यापीठांतील माझी अभ्यासिका (स्टडी) मला दाखविली. येथें 'पीएच्. डी. संख्याशास्त्र' या विषयासाठीं एकूण पांच विद्यार्थी आहेत. यंदां मी व दुसरा एक इजिप्शियन असे दोघे नवे विद्यार्थी आहोंत. आम्हां सर्वांनाच आठवड्यांतून दोन व्याख्यानें ऐकावीं लागतील

एक प्रा. बार्टलेट यांचें व दुसरें प्रा. वॉकर यांचें. शिवाय बाहेरील लोक अधूनमधून सेमिनार्स देतीलच.

येथील हवा मात्र खराब आहे. सूर्यप्रकाशाचा अभाव, आकाश नेहमीं ढगाळलेलें, अधूनमधून पाऊस व काळींकुट्ट घरें — असें उदास वातावरण आहे.

काल लॉइड्स बँकेंत गेलों. पासपोर्ट दाखविल्यावर लगेच मला पैसे मिळाले. तेथेंच माझें खातें उघडलें. आज सकाळीं रेशन-कार्डहि मिळालें. अशी माझी उत्तम व्यवस्था लागली आहे. येथें हिंदी विद्यार्थी खूप आहेत; त्यामुळें परकेपणा वाटत नाहीं. येथें अन्न मात्र तितकेंसें बरें मिळत नाहीं. मांस भरपूर नसतें. त्यांची शिजविण्याची रीतहि आपल्यापेक्षां वेगळी आहे. पावहि सामान्य प्रतीचे असतात.

येथें थंडी अजून फारशी पडली नाहीं. पुण्यास असते तेवढीच आहे.

आज २ ऑक्टोबर : गांधी-जयंती आहे. सर्व हिंदी लोक एकत्र जमणार आहेत. गांधीजींच्या जीवनावरील चित्रपट दाखविण्यांत येणार आहे.

बाकी सर्व ठीक. ती. नाना व सौ. आई यांना शि. सा. नमस्कार.

तुमच्याकडील सविस्तर पत्राची वाट पाहणारा,

तुझा,
**भाऊ**

* * *

पत्र ६ वें

## मँचेस्टरमधील दिनचर्या

॥ श्री ॥

मँचेस्टर, दि. १३ ऑक्टोबर, १९५१.

प्रिय उषास अनेक आशीर्वाद.

माझी येथील राहण्याची व्यवस्था अगदीं उत्तम आहे. मी येथें मिसेस् क्रॉस यांच्याकडे 'पेइंग गेस्ट' म्हणून राहतों हें मागील पत्रीं कळविलें होतेंच. मिसेस् क्रॉस (सौ. त्राटिकाबाई) या नांवाप्रमाणें रागीट नसून फारच प्रेमळ

आहेत. त्या कांहींच कमी पडूं देत नाहींत. खोली साफ करणें, शर्टसकट सर्व कपडे धुणें व त्यांना इस्त्री करणें आणि बिछाना तयार करणें हीं सर्व कामें त्या करतात. तुला आश्चर्य वाटेल कीं, बिछाना तयार करणें ( To arrange the bed ) म्हणजे काय ? तीन ब्लँकेटस्, एक चादर व एक पांढरी चादर एवढें पांघरावयास असतें. या पांघरुणांची घडी विशिष्ट प्रकारें केल्यावर तीं इतकीं जड होतात कीं, दोन गाद्यांच्या मध्येंच आपण झोंपलों आहोंत असें वाटतें. हें सारें मला नीट जमत नाहीं. बिछाना तयार करणें हें काम घर-मालकिणीच्या ( लँड लेडीच्या ) कामांपैकींच एक समजलें जातें. तसेंच खोलींत अस्ताव्यस्त पडलेले माझे कपडे, पुस्तकें वगैरे सामान दुपारीं मी बाहेर गेल्यावर मिसेस् क्रॉस लावून व्यवस्थित ठेवतात. अर्थात् अशी येथें पद्धतच आहे.

**माझी दिनचर्या** पुढीलप्रमाणें आहे. सकाळीं खूप थंडी असते. त्यामुळें लवकर उठवत नाहीं. शिवाय तोंड धुण्यास गरम पाणी सातच्या आंत मिळत नाहीं. त्यामुळें लवकर उठून उपयोगहि नसतो. पाणी गॅसच्या साहाय्यानें गरम होऊन नळांतून येतें. सकाळीं तीन तास व सायंकाळीं तीन तास खूप गरम पाणी मिळतें. दिवसां इतर वेळीं कोमट पाणी असतें. मात्र तें चोवीस तास व सर्व मजल्यांवर येतें. प्रातर्विधी, दाढी इत्यादि करून कपडे चढवीपर्यंत आठ सव्वाआठ होतात. नंतर डायनिंग-रूममध्यें जाऊन वृत्तपत्रें वाचतों. रेडिओवर इंग्रजी संगीत चालू असतांना साडेआठ वाजतां आमची न्याहारी ( ब्रेकफास्ट ) होते. ती नऊ वाजेपर्यंत संपवून मी लगेच विद्यापीठांत जातों व तेथें बारा वाजेपर्यंत अभ्यास करीत बसतों. विद्यापीठांतच दुपारच्या जेवणाची (लंचची) सोय आहे. बारा वाजतां निरनिराळ्या मित्रांसह लंचला जातों व गप्पागोष्टी करीत सावकाश लंच उरकतों. आमचे प्राध्यापक बार्टलेट यांची चिटणीस मिस् ॲपलबी ही कधीं कधीं आमच्याबरोबर लंचला असते. एकंदरींत वातावरण फार मोकळें असतें. एखादी इंग्रज मुलगी दोन-चार हिंदी माणसांबरोबर लंच घेतांना पाहून तिकडे कोणाचें लक्षहि जाणार नाहीं व कोणाच्या मनांत कांहींहि विकल्प येणार नाहीं, असें येथें वातावरण असतें. एक वाजतां लंच आटोपून मी पावणेचारपर्यंत अभ्यास करतों. पावणेचार ते चार चहा. पुढें चार ते पांच बहुधा तास असतो. तो

संपल्यावर मी साडेपांचपर्यंत घरीं येतों. नंतर सहापर्यंत तोंड धुणें अगर स्नान करणें व वृत्तपत्रें वाचणें हा कार्यक्रम असतो. स्नान रोज करण्याची येथें सोय आहे, पण तशी येथें पद्धत नाहीं, आवश्यकता नाहीं आणि तें करवतहि नाहीं. सकाळीं स्नान कोणीच करीत नाहीं. सायंकाळीं किंवा रात्रीं करतात आणि तेंहि टबमध्यें. स्वच्छतेच्या दृष्टीनें टबांत स्नान करणें मला बरें वाटत नाहीं. पण गरम गरम पाण्यांत डुंबत बसून सारें अंग शेकून काढायला मजा वाटते. मी आठवड्यांतून तीन वेळां स्नान करतों.

यानंतर सहा वाजतांच माझें रात्रीचें जेवण ( डिनर ) होतें. कारण साडेचार–पांच वाजतां अंधार पडूं लागतो. इतके दिवस तुमच्या आमच्या वेळेंत साडेचार तासांचा फरक होता. पण दि. २९ नोव्हेंबरपासून येथील हिंवाळी वेळ ( ब्रिटिश विंटर टाइम ) सुरू होईल व घड्याळें आणखी एक तास मागें करण्यांत येतील. सध्यां सहा वाजतां तर पूर्ण काळोख होतो. त्यामुळें बाहेरील हालचाली व कार्यक्रम बंदच. संध्याकाळीं मी विद्यापीठांतून घरीं मुद्दाम चालत येतों. दीड-दोन मैल अंतर आहे. तेवढाच व्यायाम होतो. ब्रिटिश कौन्सिलमध्यें पिंगपाँग खेळण्याची चांगली सोय आहे. संध्याकाळीं सात ते आठ तेथें चांगलें खेळायला मिळतें. मात्र तेथें गर्दी असली तर मी फिरायला जातों. रात्रीं आठ ते साडेअकरा–बारापर्यंत अभ्यास व मग झोंप– असा हा माझा दैनंदिन कार्यक्रम आहे.

आतां माझ्या **खाण्यापिण्याच्या व्यवस्थेविषयीं** थोडें लिहितों. सकाळीं साडेआठ वाजतां माझी न्याहारी होते. आधीं ओटमिल ( Oatmeal ) म्हणजे ओट या कडधान्यापासून केलेली पेज घ्यायची. नंतर टोस्ट व त्यावर टोमॅटो अगर आमलेट असतें. त्यानंतर चहा, बिस्किटें, पाव, लोणी, व जॅम ( मुरंबा ). या वेळीं चहा दोन–तीन कप सहज घ्यावा लागतो. कारण येथें पाणी फारसें प्यावेंच लागत नाहीं. चहा करायची पद्धत अशी—किटलींत चहाची पूड टाकायची, त्यावर गरम पाणी ओतायचें, नंतर थोडा वेळ थांबून चहा कपांत गाळायचा व लागेल त्या प्रमाणांत साखर व दूध घालायचें. किटलींतील चहा संपला कीं तींत पुन्हा गरम पाणी ओतायचें. चहाची पूड पुन्हां टाकायची नाहीं. असा चहा करतात. त्यामुळें तो भरपूर घेतां येतो. येथें चहा माफक ( Rationed ) मिळतो.

येथें भाज्या अगदींच कमी. बटाटे, फ्लॉवर, कोबी, टोमॅटो व गाजरें हे पदार्थ उकडून त्यांना मीठ लावलें कीं झाल्या भाज्या तयार. मसाला किंवा तिखट येथें मुळींच वापरत नाहींत. मांस रेशनवर मिळतें. मांस व मच्छी थोडें मीठ लावून चरबींत तळतात. मांस शिजविलें तरी तें अपुरेंच शिजवितात. विविध फळांचा जॅम (मुरंबा) हा उत्तम पदार्थ असतो. पावाला लोणी लावून त्यावर जॅम पसरून खाल्लयावर उत्तम लागतो.

दुपारचें जेवण (लंच) मी विद्यापीठांत घेतों; कारण बाहेरच्या रेस्टॉरंटमध्यें लंच फार महाग पडतो व टिप (बक्षिसी) द्यावी लागते. विद्यापीठांत हॉटेल्स उघडलीं आहेत. १ शिलिंग ५ पेन्सला चांगली लंच मिळते. येथें सेल्फ सर्व्हिस असते--स्वयंसेवक व्हावें लागतें. एके ठिकाणीं थाळया, चमचे, कांटे व सुऱ्या असतात. आपण स्वतःच त्या घ्यावयाच्या. निरनिराळ्या टेबलांवर हरतऱ्हेचे पदार्थ असतात. ते आपल्या हातानें हवे ते व हवे तेवढे घ्यावयाचे. नंतर काउंटरवर जाऊन तेथील बाईला दाखवायचे व ती सांगेल तें बिल देऊन टेबल-खुर्ची असते तिकडे जाऊन खावयाचें. कोबी, बटाटा इत्यादींची भाजी, वाटाणा अगर पावटा यांचे उकडलेले दाणे, मांस व पुडिंग (एक गोड पदार्थ) वगैरे पदार्थ मिळतात.

यानंतर दुपारचा चहा. विद्यापीठांतील संशोधन विभागाची गणित शाखा मोठी आहे. प्राध्यापक व विद्यार्थी यांची संख्या पंचवीसपर्यंत आहे. या सर्वांचा क्लब आहे. त्यांत चहाची व्यवस्था असते. एका टर्मला अडीच शिलिंग वर्गणी पडते. शिवाय एक पेन्सला दोन या दरानें बिस्किटें पाहिजे तेवढीं मिळतात. प्रमुख प्राध्यापकसुद्धां आमच्याबरोबर चहा स्वतः कपांत ओतून, तयार करून (त्यांत दूध, साखर घालून) घेतात हें पाहून मजा वाटली.

घरीं आल्यावर सायंकाळीं सहा वाजतां आमचें जेवण होतें. एखादें सूप (टोमॅटो, मीट [Meat] इत्यादींचें), नंतर मांस अगर मच्छी, कोबी, बटाटे यांची भाजी, नंतर पुडिंग व शेवटीं चहा, पाव-लोणी. पाणी मुळींच नाहीं.

येथें जेवण्याच्या चालीरीती (टेबल मॅनर्स) थोड्या वेगळया आहेत. कांटे चमचे, सुऱ्या इत्यादि गोष्टींचा बाऊ आपल्याकडे उगीच केला जातो. थोडें निरीक्षण केल्यावर कोणता कांटा कशासाठीं हें सहज कळतें. कांटे (Forks) दोन तऱ्हेचे असतात. एक मांस, भाजी इत्यादींसाठीं; दुसरा मच्छीसाठीं.

सूप, पुडिंग यांसारख्या पातळ पदार्थांसाठीं चमचे; सुऱ्या (Knives) लहान-मोठ्या असतात. जेवण झाल्यावर कांटा व चमचा एकमेकांना समांतर लावून ठेवायचे असतात.

हो, आणखी एक गोष्ट–जेवल्यावर तोंड धुवायचें नाहीं. चहा पिऊन तें जेवढें साफ होईल तेवढेंच. मला मात्र हें पटत नाहीं. मी आपल्या पद्धतीप्रमाणें तोंड स्वच्छ धुतों. इंग्रज लोकांचे दांत घाणेरडे असतात ते यामुळेंच.

मला येथील सर्व जेवणखाण व हवामान चांगलें मानवत आहे. त्यामुळें माझी प्रकृति चांगली आहे. काळजी करूं नये.

ती. नाना व सौ. आई यांना शि. सा. नमस्कार.

तुझा,

**भाऊ**

* * *

**पत्र ७ वें**

## मँचेस्टरमधील जीवन

॥ श्री ॥

मँचेस्टर, दि. २२ ऑक्टोबर, १९५१.

प्रिय उषा,

या पत्रांत **मँचेस्टरमधील जीवना**विषयीं विविध माहिती लिहिण्याचें ठरविलें आहे.

मी ज्यांच्या घरांत रहातों त्या **क्रॉस कुटुंबा**संबंधीं प्रथम लिहितों. मिसेस् क्रॉस यांना अजमासें पंचवीस वर्षें वयाची फक्त एक मुलगी आहे. म्हणजे साधारण माझ्याच वयाची, पण उंचीनें माझ्या सव्वापट व वजनानें दुप्पट असेल; एवढी धिप्पाड आहे. ती स्वभावानें प्रेमळ व बोलकी आहे. मिस्टर क्रॉस हे सकाळीं लौकर कामावर जातात व रात्रीं उशिरां परत येतात. त्यामुळें त्यांचा संबंध फारच कमी येतो. मिसेस् क्रॉस यांच्याविषयीं मागील पत्रांत लिहिलेंच आहे. इंग्रज लोकांशीं वागतांना एक वैशिष्ट्य ध्यानांत येतें. हे लोक स्वभावानें बोलके असले तरी व्यक्तिगत, खाजगी बाबतींत अगदीं अबोल (Reserved) असतात. माझ्याशीं मिसेस् क्रॉस व त्यांची मुलगी मेरी या खूप गप्पा मारतात. हिंदुस्थानविषयीं विविध तऱ्हेची माहिती विचारतात.

पण मी कोणत्या अभ्यासासाठीं आलों आहें, किती दिवस राहणार आहें, माझ्या घरीं कोण कोण माणसें आहेत यांविषयीं चकार शब्दहि त्यांनीं विचारला नाहीं. मिसेस् क्रॉसनीं मला माझी खोली, बाथरूम, डायनिंग रूम हें सर्व दाखविलें, पण क्रॉस कुटुंबासाठीं असलेल्या दोन खोल्या अजीबात दाखविल्या नाहींत. माझ्याप्रमाणें आणखी तिघे जण या घरांत पेइंग गेस्ट्स म्हणून राहतात. जेवतांना ते सारे जण माझ्याशीं खूप बोलतात; पण जेवल्यावर आपापल्या खोलींत गेल्यावर कोणी कोणाचा लागत नाहीं. आमच्या चौघांच्या खोल्या जवळजवळ आहेत; पण कोणी कोणाच्या खोलींत जात नाहीं. जो तो आपल्या कामांत गर्क असतो.

येथें बोलतांना खूप नम्रपणें बोलावें लागतें. 'मी आभारी आहें', 'माफ करा हं!', 'नमस्ते' (Thanks, sorry, excuse, bye-bye, please) वगैरे शब्द एकसारखे पेरावे लागतात. मी सकाळीं न्याहारीसाठीं गेलों कीं मेरीची गांठ पडते. ती प्रथम 'गुड मॉर्निंग' करते. रात्रीं जेवण उरकून खोलींत जाण्यापूर्वी 'गुड नाइट' अगर 'बाय-बाय' करण्यास ती कधींच विसरत नाहीं. या सर्व चालीरीती मला सरावानें साध्य झाल्या आहेत.

इंग्रजींत संभाषण करतांना एक अडचण प्रारंभीं बरीच जाणवते. इंग्रज लोकांचें बोलणें समजण्याची अडचण पडत नाहीं. पण आपलें बोलणें त्यांना कळायला अवघड जातें. आपण बोलूं लागलों कीं ते सारखे 'पार्डन्' करीत असतात. त्यांची आपल्या बोलण्याविषयींची तक्रार अशी कीं, आपण हिंदी लोक फार जलद बोलतों. प्रथम मला आश्चर्य वाटलें. मला वाटत असे कीं, ते जलद बोलतात. पण बारकाईनें पाहिल्यास आपणच भरभर बोलतों. मात्र ते तोंडांतल्या तोंडांत व विचित्र जोर (Accent) देऊन बोलतात म्हणून त्यांचें बोलणें समजण्यास त्रास पडतो. पण वेग आपलाच जास्त.

येथें पाऊस असतो पण मुसळधार नसतो. मात्र येथील पाऊस फार लहरी आहे. तो केव्हां येईल त्याचा नेम नसतो. थोडा वेळ त्याची रिमझिम चालते. त्यामुळें फक्त रेनकोटवर भागतें. हॅटसुद्धां लागत नाहीं. विद्यार्थी हॅट व छत्री वापरत नाहींत; वयस्कर लोक मात्र वापरतात. छत्री तुरळकच दिसते. रेनकोटांना आंतून लोकरीचें कापड असतें; त्यामुळें थंडीपासून संरक्षण होतें.

इकडे थंडी फारच असते. आपल्याकडे हिंवाळ्यांत फरशी गार होते म्हणून सपाता वापरतात; पण इकडे सपाताहि गार गार होतात म्हणून सर्व जण मोजे वापरतात. परवांच मीं एक ट्वीलचें जॅकेट घेतलें. चार पौंड सात शिलिंग किंमत पडली. चांगलें उबदार आहे. रंग विटकरी आहे व वर बारीक चौकड्या आहेत. आपल्याकडे असला कोट कोणीच वापरणार नाहीं. पण इकडे तोच फॅशनेबल समजला जातो. येथें कपड्यांविषयीं फारशी फिकीर कोणीच बाळगीत नाहीं. येथील प्राध्यापक तर एकच कोट व एकच पँट महिना–दोन महिने वापरतात. केसांचा भांगहि पाडलाच पाहिजे असें नाहीं. जितका गबाळा पोषाख तितका प्राध्यापक हुषार असें समजावें!

दुधाविषयीं एक गंमत पाहायला मिळाली. दूध बाटल्यांतून घरोघर येतें. एके दिवशीं दूध आल्यावर मिसेस् क्रॉसनीं तें तसेंच चहांत घालण्यासाठीं आम्हांस दिलें. मला नवल वाटलें. दूध उकळवीत कां नाहींत? मग हळूच माझा फ्रेंच दोस्त रॉजर याला विचारलें, तेव्हां कळलें कीं, इकडे दूध घरीं आल्यावर उकळावें लागत नाहीं. तत्पूर्वी कारखान्यांतच तें पाश्चराइज (जंतुविरहित) केलेलें असतें. दूध दाट व चांगलें असतें.

पोस्ट ऑफिसांत तिकिटें आणायला गेलों तों तिथें तिकिटें देणारें यंत्र पाहायला मिळालें. येथें पेनी व 'हे पेनी' (Half Penny चा हा उच्चार–हाफ् पेनी म्हटलें तर कोणाला कळणार नाहीं) हीं तिकिटें स्टेशनवरील प्लॅटफॉर्म तिकिटांप्रमाणें यंत्रानें आपोआप मिळतात. येथें पाकिटास अडीच पेन्स व कार्डास दोन पेन्स किंमतीचीं तिकिटें लावावीं लागतात. पाकीट अगर कार्ड तुमचें पाहिजे. ही फक्त तिकिटांची किंमत. पाकीट अगर कार्डासह तिकिट हवें असलें तर प्रत्येकीं अर्धा पेन्स जास्त आकार पडतो. अशी आपल्यापेक्षां निराळी पद्धत आहे.

पोस्ट ऑफिसच्या उल्लेखावरून एक गोष्ट आठवली. जिब्राल्टर मुक्कामीं मला बोटीवर मिळेल अशा बेतानें तुम्ही पुण्याहून विमानमार्गें पाठविलेलें पत्र माझी बोट जिब्राल्टर बंदरीं न थांबल्यामुळें मला मिळालें नाहीं. पण तें पत्र माझ्या मागोमाग प्रवास करीत, अनेक टक्केटोणपे (शिक्के) खात आज येथें आलें व माझ्या हातांत पडलें. जिब्राल्टरहून पत्र लंडनच्या ज्या टिलबरी नांवाच्या गोदींत आमची बोट थांबली होती तेथें गेलें. आम्ही बंदरांत

उतरण्यापूर्वी बोटीवरील अधिकाऱ्यांनीं आमचा लंडनचा पत्ता टिपून घेतला होताच. त्यामुळें कंपनीनें तें पत्र ज्या कानिटकरांच्या घरीं उतरलों होतों तेथें पाठविलें. पण तोंपर्यंत मी लंडन सोडून मँचेस्टरला गेलों होतों व कानिटकरांना माझा मँचेस्टरचा पत्ता माहीत नव्हता; म्हणून त्यांनीं तें मँचेस्टरच्या त्यांच्या एका मित्राच्या पत्त्यावर पाठविण्यास सांगितलें. सुदैवानें त्या मित्राजवळ माझा पत्ता होता. त्यानें तें क्रॉसबाईच्याकडे पाठविलें व अशा रीतीनें तें माझ्यापर्यंत आलें. इंग्लंडमधील पोस्टाच्या कार्यपद्धतीचें कौतुक वाटलें.

रस्त्यावरील रहदारीचें नियंत्रणसुद्धां आपल्यापेक्षां वेगळया रीतीनें होतें. मँचेस्टरला ट्रामगाड्या नाहींत. ट्रामचे रूळ आहेत, पण ट्राम्स् बंद केल्या आहेत. बसेस मात्र भरपूर आहेत. एकूण निरनिराळया १०५ नंबरांच्या बसेस आहेत. बसेस एका पाठोपाठ असतात. त्यामुळें रांकेंत फार वेळ मुळींच तिष्ठत राहावें लागत नाहीं. रस्त्यांत मोटारीहि खूप असतात; पण नियंत्रणासाठीं पोलीस लागत नाहीं. सर्वत्र रहदारीसाठीं दिवे (ट्रॅफिक लाइट्स) आहेत. विजेचे हिरवे व तांबडे सिग्नल्स असतात. त्यांचें कार्य स्वयंचलित (ऑटोमॅटिक) असतें. दर एक–दोन मिनिटांनीं हिरव्याचा तांबडा व तांबड्याचा हिरवा दिवा होतो. पादचारी लोक पद-पथावरून (फूटपाथवरून) चालतात. त्यांना रस्ता ओलांडण्यासाठीं ठराविक जागा (ट्रॅफिक आय्लंड्स) असतात. कांहीं ठिकाणीं विजेचीं बटणें ठेवलीं आहेत. तीं आपण दाबलीं कीं वाहतूक थांबण्यासाठीं असलेला तांबडा दिवा लागतो व वाहतूक थांबते. एक मिनिटानें तो दिवा आपोआप हिरवा होतो व वाहतूक सुरू होते. अशी मोठी छान सोय आहे.

हें पत्र तुझ्या हातांत पडेल तेव्हां दिवाळीची धामधूम असेल. सौ. आई गोडधोड करण्यांत गर्क असेल व तूं दिवाळी अंक वाचण्यांत गुंगली असशील. मींहि मँचेस्टरमधील माहितीचा हा एक छोटासा दिवाळी अंकच पाठविला आहे म्हणेनास! 'मँचेस्टर दिवाळी विशेषांक' संपादक, मुद्रक, प्रकाशक— सर्व कांहीं मीच!

ती. नाना व सौ. आई यांना शि. सा. नमस्कार.

तुझा,

भाऊ

* * *

# विभाग दुसरा

# विलायतेंतील कांहीं विशेष अनुभव

**पत्र ८ वें**

## ब्रिटिश पार्लमेंटची निवडणूक

॥ श्री ॥

मँचेस्टर, दि. २९ ऑक्टोबर, १९५१.

प्रिय उषास शुभाशीर्वाद.

सध्यां येथें **पार्लमेंटच्या निवडणुकींची गडबड** चालू आहे. दोन्ही बाजूंचा प्रचार वृत्तपत्रें व भाषणें यांच्या साहाय्यानें सुरू आहे. नभोवाणीवर चर्चिल, ॲटली, मॉरिसन् व ईडन यांचीं भाषणें मीं ऐकलीं. येथील ब्रिटिश कौन्सिल ही संस्था परदेशांतून आलेल्या विद्यार्थीना इंग्लंडविषयीं माहिती पुरविते. गेल्या मंगळवारीं या संस्थेंत मि. रॉस यांचें भाषण झालें. निवडणुका कशा होतात त्याचें तंत्र त्यांनीं समजावून सांगितलें. हिंदी मनुष्य येथें सहा महिने राहिला असेल तर त्याला मतदानाचा हक्क आहे. या निवडणुकींत मला फार वैशिष्टय वाटलें. कांहीं वेळां घरीं जाऊन प्रचार करतात, पण भित्तिपत्रकें चिकटवणें किंवा प्रचार-पत्रें वांटणें हा प्रकार मुळींच आढळत नाहीं. रस्त्यांतून मिरवणुकी व फेऱ्या काढणें आणि आरडाओरडा करणें हेंहि दिसत नाहीं. प्रत्यक्ष निवडणुकीच्या दिवशीं कोणतेंहि विद्यालय व एकहि कचेरी बंद नव्हती. नेहमींप्रमाणें सर्व व्यवहार चालू होते. सकाळीं सात ते रात्रीं नऊ ही निवडणुकीची वेळ ठरली होती. पण रस्त्यांतून फिरणाऱ्या एकाहि मोटारीवर प्रचाराची पाटी दिसली नाहीं. रस्त्यांत कोणी कुठें निवडणुकीची चर्चा करीत नव्हते. कॉलेजांतहि गप्पा अभ्यासाच्या, खेळण्याच्या-निवडणुकीच्या नाहींत. मतदानकेंद्रावर सुद्धां अगदीं सामसूम. लोक येतात व मत देऊन जातात. बाहेर 'पोलिंग स्टेशन' अशी पाटी असते म्हणून केवळ कळतें कीं, आंत मतदान चालू आहे. लोक रांगेनें येतात, तेथील अधिकाऱ्याला आपलें नांव सांगतात.

लगेच यादींतील त्या नांवावर अधिकारी फुली मारून मतदाराला मतदानाचा कागद देतो. मतदार मत–पेटींत आपला कागद टाकतो व वर एक थप्पड त्या पेटीला मारतो, (तशी येथें पद्धत आहे) व पुढें जातो. पोलिंग स्टेशनवर कोणत्याहि उमेदवाराचा प्रतिनिधि किंवा प्रचारक नसतो, कारण अशा प्रचाराचा उपयोग होत नाहीं. जवळ जवळ प्रत्येकाचें मत ठरलेलें असतें.

यानंतर रात्रीं नऊच्या पुढें मतमोजणी होते. जसजसे निकाल बाहेर येतील तसतसे ते रेडिओ व टेलिव्हिजन यांच्या द्वारां सांगितले जातात. बाहेर एक मोठा पडदा लावतात व त्यावर निरनिराळे निकाल टेलिव्हिजननें दिसतात. रस्त्यावर लोकांची गर्दी होते. आरडाओरडाहि किंचित् चालतो. आपल्या पक्षाचा उमेदवार निवडून आल्याचें कळतांच लोक आरोळ्या ठोकतात. पण दोन्ही पक्षांत राजकीय वैमनस्य दिसत नाहीं. मारामारी कुठेंच होत नाहीं.

परवांच्या निवडणुकींत मला एक गंमत आढळली. सरकारी पक्षाचे ३३९ सदस्य व विरोधी पक्षाचे २९३ सदस्य आहेत. पण देशांतील मतें पुढीलप्रमाणें पडलीं—

कॉन्झर्व्हेटिव्ह पक्ष—१, ३६, ६५, ५९५ मतें.
(२९१ कॉन्झर्व्हेटिव्ह उमेदवारांमध्यें)

लेबर पक्ष—१, ३८, ७७, ९२२ मतें.
(२७७ लेबर उमेदवारांमध्यें)

म्हणजे लेबर पक्षाला एकूण जास्त मतें पडूनहि त्याचें मंत्रिमंडळ नाहीं. देशांतील बहुसंख्य लोकांना लेबर पक्ष हवा; पण मंत्रिमंडळ मात्र कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षाचें झालें व त्या पक्षाचा विजय झाला. हीच का लोकशाही ? अशी मला शंका येते. असो.

रेझर ब्लेड्ससंबंधीं तूं आपल्या पत्रांतून चौकशी केली आहेस. इकडे हवा इतकी थंड असते कीं, दाढ्या ब्लेड्शिवायच होऊं शकतात. ब्लेडची आवश्यकताच भासत नाहीं. लोक तशीच दाढी करतात. थट्टा नाहीं, खरंच ! इलेक्ट्रिक शेव्हिंग मशिनच्या साहाय्यानें साबू व ब्लेड यांच्याशिवाय दाढी होते. हें मशीन साडेसहा पौंडांना मिळतें. त्यानें बिछान्यांत पडल्यापडल्या-देखील दाढी करतां येते व कापण्याची अजीबात भीति नाहीं. मात्र नेहमींच्या

दाढीपेक्षां जरा जास्त वेळ लागतो. मी मात्र हें यंत्र वापरीत नाहीं. होनच्या साहाय्यानें एक ब्लेड खूप दिवस टिकते. दाढी रोज करावी लागते.

पुढील महिन्यांत येथें दोन चांगले कार्यक्रम होणार आहेत. त्यांची माहिती पुढील पत्रांतून कळवीन.

ती. नाना व सौ. आई यांना शि. सा. नमस्कार.

तुझा,
**भाऊ**

* * *

पत्र ९ वें

## गाय फॉक्स डे आणि इंग्लंडच्या राणीचें दर्शन

॥ श्री ॥

मँचेस्टर, दि. १७ नोव्हेंबर, १९५१.

प्रिय उषा,

या महिन्याच्या ५ दिनांकाला एक गमतीदार कार्यक्रम पाहायला मिळाला. काय असेल ओळख पाहूं ! ५ नोव्हेंबर १६०५ रोजीं **गाय फॉक्सनें** पार्लमेंट उडवून लावण्याचा कट केला होता, पण तो उघडकीस आला वगैरे इतिहास तुला माहीत असेलच. हा **दिवस** येथें मोठ्या उत्साहानें साजरा करतात. शहरांत ठिकठिकाणीं होळ्या पेटवतात. आपल्याकडील होळी पौर्णिमेची मला आठवण झाली. येथें शहरांतून जागजागीं उद्यानें ( पार्क्स ) असतात. लोक त्यांतील झाडें किंवा फांद्या तोडून पळवितात व त्यांचा उपयोग बॉन फायर ( होळी ) करण्यासाठीं करतात. या वेळीं तर लोकांनीं इतक्या फांद्या पळविल्या कीं उद्यानांतून पोलीसपहारा ठेवावा लागला. अशा या होळींत गाय फॉक्सची कापडाची मूर्ति करून ती जाळायची अशी प्रथा आहे. फटाके, फुलबाजे, सुरनळे वगैरे दारू आपण दिवाळींत उडवितों तशीच येथेंहि उडवितात. मींसुद्धां एके ठिकाणीं जाऊन या बॉन फायरमध्यें भाग घेतला, फटाके उडविले. आणखी एक पद्धत असते. प्रत्येकानें घरांतून बटाटे आणायचे व ते होळीवर भाजून खायचे. मिसेस् क्रॉस यांच्याकडून मीं एक बटाटा नेला होता, पण होळींत भाजण्यासाठीं टाकलेले कांहीं बटाटे करपून गेले, त्यामुळें

मला खातां आला नाहीं. तसेंच या वेळीं टॉफीसुद्धां वाटतात, खूप आरडा-ओरडा करतात व एक रात्र मजेंत घालवितात.

कालचा दिवस आणखी एका कारणाकरितां माझ्या लक्षांत राहील. काल **इंग्लंडच्या राणीला** पाहण्याचा सुयोग लाभला. येथें 'ट्रेड हॉल' म्हणून एक मोठा हॉल आहे. तेथें पूर्वी वृन्दवादनाचे ( ऑर्केस्ट्राचे ) कार्यक्रम होत असत. गेल्या युद्धांत जर्मन लोकांनीं तो हॉलच उध्वस्त करून टाकल्यामुळें इतके दिवस तेथील कार्यक्रम बंद होते. आतां पुन्हां त्या ठिकाणीं उत्तम हॉल बांधण्यांत आला आहे. त्याचा उद्‌घाटन—समारंभ राणीच्या हस्तें काल झाला. समारंभ फक्त निमंत्रित लोकांसाठीं होता, त्यामुळें मला जातां आलें नाहीं. परंतु राणी एका विशिष्ट रस्त्यानें दुसऱ्या एका कार्यक्रमासाठीं जाणार होती. तो रस्ता आमच्या विद्यापीठावरूनच जातो. तेव्हां इंग्लंडची राणी बघण्याच्या उद्देशानें मी रस्त्यावर आलों. आपली राणी रस्त्यानें जात असतां इंग्रज लोक कसे वागतात हें जाणण्याची उत्कंठा माझ्या मनांत होती. रस्त्याच्या दुतर्फा लोक अगदीं शांतपणानें हातांत युनियन जॅक्स् घेऊन उभे होते. दंगा नाहीं, घोपा नाहीं, धक्काबुक्की नाहीं, आरडाओरडा नाहीं. राणीची मोटार रस्त्यानें जात होती तेव्हां युनियन जॅक्स् हालवून अगर हात हालवून लोकांनीं तिच्या-विषयींचा आपला आदरभाव व्यक्त केला. मोटार निघून जातांच लोक शांत चित्तानें आले तसे परत निघून गेले. मोटारीभोंवतीं जमणें, मोटार थांबवून पुढें जाऊं न देणें, मोटारीमागें धांवत जाणें अगर आरडाओरडा व धक्काबुक्की करून पुढें घुसणें यांतला कोणताच प्रकार आढळला नाहीं. या शिस्तबद्धतेमुळें सर्वांना राणीला व्यवस्थित बघतां आलें, शुभेच्छा ( ग्रीटिंग्ज ) व्यक्त करतां आल्या. आपल्याकडे अगदीं विरुद्ध वातावरण दिसतें, नाहीं ?

पाऊस येथें सारखा असतो. हवा इतकी दमट असते कीं, रस्ते सहसा वाळतच नाहींत. थंडी आहेच; पण बर्फ अजून पहायला मिळालें नाहीं.

माझी काळजी करूं नये. ती. नाना व सौ. आई यांना माझे शिर-साष्टांग नमस्कार.

तुझा,

**भाऊ**

* * *

पत्र १० वें

# इकडील सिनेमा आणि शिस्त

॥ श्री ॥

मँचेस्टर, दि. २८ नोव्हेंबर, १९५१

चि. उषास सप्रेम आशीर्वाद.

गेल्या शनिवारीं मी सिनेमाला गेलों होतों. येथील **सिनेमा दाखविण्याची पद्धत** आपल्याकडील पद्धतीपेक्षां खूपच वेगळी आहे. इकडे सिनेमा व नाटकें यांसाठीं गल्लोगल्लीं नाट्यगृहें आहेत. गर्दी आपल्याकडे असते तशीच. बहुतेक इंग्रजी व कांहीं फ्रेंच चित्रपट येथें लागतात. साधारणपणें दुपारीं बारा-साडेबारा वाजतां नाट्यगृह जें उघडतें तें रात्रीं साडेअकरा-बारापर्यंत चालू असतें. नाट्यगृह उघडल्यापासून न्यूज, सिनेमा-न्यूज, सिनेमा असें सारखें ओळीनें चालू असतें. एक खेळ ( शो ) संपल्यावर पहिल्या लोकांनीं बाहेर जायचें व नव्या प्रेक्षकांनीं आंत शिरायचें अशी येथें पद्धत नाहीं. नाट्यगृह उघडल्यापासून तों तें बंद होईपर्यंत आपण केव्हांहि आंत जाऊं शकतों. व केव्हांहि बाहेर येऊं शकतों. सिनेमा सारखा चालूच असतो. साधारणपणें कोणत्या वेळेस बातम्या संपून खेळाला आरंभ होतो हें जाहीर केलेलें असतें. पण आपण त्याच वेळीं गेलें पाहिजे असा निर्बंध नसतो. पहिल्या खेळाच्या वेळीं आपण मध्यंतरींच उठून गेलों तरी दुसऱ्या खेळाला त्यापुढील कथाभाग जेव्हां सुरू होईल तेव्हां गेलें तरी चालतें. इतकेंच नव्हे तर तोच खेळ दुसऱ्यांदा पाहण्यासहि हरकत नसते. मीं ‘ दि रेड शूज ’ हा सिनेमा पाहिला. तो सप्तरंगी ( टेक्निकलर ) होता. नृत्याचाच भाग त्यांत जास्त होता. पण अभिनय, दिग्दर्शन वगैरे अनेक दृष्टींनींहि तो मला आवडला. दुपारीं लंच झाल्यावर सव्वादोन वाजतां आम्ही गेलों व सायंकाळीं सहा वाजतां परत आलों.

सिनेमाचें आणखी एक वैशिष्ट्य असें कीं, कांहीं ठिकाणीं प्रत्यक्ष सिनेमा असा दाखवतच नाहींत. बातम्या, देशांतील विविध घडामोडी, गाण्याचे व नृत्याचे कार्यक्रम असे इतर कार्यक्रमच होतात. दुपारीं बारापासून रात्रीं दहापर्यंत एकापाठोपाठ एकेक कार्यक्रम तास-दीड-तास चालू असतात.

नंतर तेच कार्यक्रम पुन्हा सुरू होतात. असें क्रमशः चालतें. आपण केव्हांहि जावें व केव्हांहि बाहेर यावें. दर एक शिलींग असतो. एक शिलिंगांत तास दीड तास चांगली करमणूक होते. कंटाळा आला तर आधींच उठून यावें. एखादा कार्यक्रम विशेष आवडला, जास्त वेळ थांबावें. काल रात्रीं घरीं कंटाळल्यासारखें झालें, म्हणून आम्ही कांहीं मित्र अशाच एका थिएटरांत गेलों होतों.

थिएटरमध्यें केव्हांहि येऊन बसावें आणि केव्हांहि उठून जावें अशी पद्धत असली तरी ही ये–जा देखील शांतपणानें चाललेली असते. गडबड किंवा गोंगाट मुळींच होत नाहीं. आपले सर्व सामाजिक व्यवहार शिस्तीनें व सचोटीनें करण्याचें इंग्रज नागरिकाला बाळकडूच मिळालेलें असतें. घराबाहेर पडलें कीं याचीं अनेक प्रत्यंतरें येतात. मुंबईतील बसेसप्रमाणें येथील बसेस-सुद्धां दुमजली आहेत. पण येथें मात्र दोन्ही मजल्यांवरील प्रवाशांसाठीं एकच कंडक्टर असतो. तोच सर्वांना तिकिटें देतो. पण त्याची नजर चुकवून कोणी तिकिटाविना प्रवास करीत नाहीं. पैसे मागण्यासाठीं कंडक्टर आपल्याजवळ आला नाहीं तर उतरण्यापूर्वी प्रवासी आठवणीनें त्याचेजवळ पैसे देतात. आपणांस कोठें उतरायचें हें माहीत असेल तर कंडक्टरला तें ठिकाण सांगायचेंहि कारण नाहीं. दोन पेन्स, तीन पेन्स असें नुसतें सांगितलें कीं कंडक्टर त्या दराचें तिकीट देतो. ‘ट पेन्स प्लीज’ असें फक्त म्हणायचें. ( Two pence चा उच्चार ‘ट पेन्स’ असा करतात. ) रस्त्यांत खूप गर्दी असली तरी मोटारी कर्णे ( हॉर्न्स ) वाजवत नाहींत. तशी गरजहि भासत नाहीं. कर्णा वाजविणारा ड्रायव्हर नवशिका समजला जातो. बसमध्यें किंवा आगगाडींत लोक गोंगाट करत नाहींत. केवळ शेजाऱ्यास ऐकूं जाईल इतकें हळू बोलतात. विद्यापीठाच्या आवारांतील हॉटेलांत आम्ही दुपारीं जेवतों. तेथें दीड-दोनशें विद्यार्थी असतात. प्रत्येक जण दुसऱ्याशीं बोलतो; पण तें तिसऱ्याला ऐकूं जाणार नाहीं इतकें खालच्या आवाजांत. एका टोंकापासून दुसऱ्या टोंकास आपल्या मित्राला कोणीच हांक मारत नाहीं. इतकी शांतता पाहून आश्चर्य वाटतें.

अशीच **शिस्त** बँकेंत व ग्रंथालयांतहि दिसून येते. बँकेंत माझें खातें आहे, पण खातें–पुस्तक ( अकाउंट बुक ) नाहीं. रक्कम भरायची असेल तेव्हां ती फक्त कारकुनाजवळ द्यायची. भरणा केल्याची पावतीहि मिळत नाहीं. तिची जरुरीहि नसते. मात्र आपल्या खात्यावर एकूण किती पैसे आहेत, किती

पैसे आपण काढले याचा माझा मीच घरीं हिशेब ठेवतों. पैसे काढतांना चेक लिहून तो काउंटरवर द्यायचा व पैसे मागायचे. पण चेकवरचा नुसता आंकडा पाहून तेवढे पैसे मीं सही करायच्या आंत कारकून मोजून ठेवतो. सही बरोबर आहे कीं नाहीं, मीं मागणी केली तेवढे पैसे माझ्या खात्यावर शिल्लक आहेत कीं नाहीं हें तो कांहींसुद्धां बघत नाहीं. एका हातानें चेक आंत सारायचा व दुसऱ्या हातानें पैसे घ्यायचे अशी पद्धत असते. एवढी सचोटी पाहून खरोखरच नवल वाटतें. शिवाय बँकेंतील कामें फार जलद होतात. कितीहि गर्दी असली तरी पांच मिनिटांपेक्षां जास्त वेळ बँकेंत कधींहि तिष्ठत राहावें लागत नाहीं.

हीच गोष्ट ग्रंथालयाची. सारीं पुस्तकें उघड्या शेल्फवर ठेवलेलीं असतात. कपाट नाहीं कीं कुलुपहि नाहीं. विद्यार्थ्यानें कोणत्याहि शेल्फजवळ जावें, हवें तें पुस्तक चाळावें व लागेल तें पुस्तक घ्यावें. काउंटरजवळ जाऊन स्लिप् भरावी व पुस्तक दाखवून स्लिप् तेथें द्यावी. एक मिनिटाचें काम. हा विद्यार्थी आहे कीं कोणी उपरा मनुष्य आहे हेंहि कोणी पहात नाहीं. मी इतका नवखा माणूस पण “ तुम्ही विद्यार्थी आहां काय ? तुमचें कार्ड कोठें आहे ? ” असे प्रश्न विचारून ग्रंथालयांत मला कोणींहि अडविलें नाहीं. असो. कुसुमनें पाठविलेला स्वेटर कालच मिळाला. हिंवाळ्यांत पडणाऱ्या थंडीला तोंड द्यावयाची ही तयारीच आहे म्हणना. स्वेटर चांगला झाला आहे हें नव्यानें सांगायला नको. तशी ती खूप वाकबगार आहेच मुळीं.

ती. नानांचें बरेच दिवसांत पत्र आलें नाहीं. त्यांच्या पत्राची मी वाट पाहत आहें. त्यांना व सौ. आईला शि. सा. नमस्कार.

तुझा,

**भाऊ**

* * *

पत्र ११ वें

# मँचेस्टर विद्यापीठ

॥ श्री ॥

मँचेस्टर, दि. २२ डिसेंबर, १९५१.

ती. नानांना शि. सा. नमस्कार, वि. वि.

तुमचें पत्र दि. १७ रोजीं मिळालें. सर्वांची खुशाली कळल्यामुळें खूप आनंद झाला.

या पत्रांत माझ्या **अभ्यासाविषयीं** सविस्तर **माहिती** लिहिण्याचें योजिलें आहे.

मला येथें येऊन पावणेदोन महिने झाले; पण पीएच्. डी. ला मला प्रवेश दिल्याचें मँचेस्टर विद्यापीठाकडून आज पत्र आलें आहे. ' पीएच्. डी.ः संख्याशास्त्र ' या पदवी-परीक्षेचा अभ्यास करण्याची परवानगी मिळावी असा अर्ज मीं पुण्याहून मँचेस्टर विद्यापीठाकडे पाठविला होता. " मुंबई विद्यापीठाची एम्. ए. ची परीक्षा एकदां गणित घेऊन व पुन्हां संख्याशास्त्र घेऊन मी उत्तीर्ण झालों आहें; आणि दोन्ही वेळां मीं प्रथम श्रेणींत पहिला क्रमांक मिळविला होता " वगैरे माहिती मीं माझ्या अर्जांत लिहिली होती. त्या अर्जाचा विचार प्रथम १८ ऑक्टोबर १९५१ रोजीं या विद्यापीठाची ' पीएच्. डी. कमिटीची ' बैठक झाली तींत करण्यांत आला व माझी शैक्षणिक लायकी ( Qualifications ) पीएच्. डी. स प्रवेश देण्याच्या दृष्टीनें अपुरी आहे असें कमिटीचें मत पडलें. पीएच्. डी. ला येण्यापूर्वी कांहीं तरी संशोधनकार्याचा अनुभव ( Research experience ) व त्यावरील स्वतःचीं प्रकाशनें ( Publications ) यांची आवश्यकता असते. येथें सामान्यतः अशी प्रथा आहे कीं, ऑनर्स कोर्स झाल्यानंतर संशोधनात्मक प्रबंध लिहून एम्. एस्सी. ( M. Sc. by research ) होण्याच्या कोर्सला प्रवेश दिला जातो. येथें माझ्याबरोबर आलेले इतर तिघे विद्यार्थी प्रथम ' एम्. एस्सी. बाय् पेपर्स ' झाले. नंतर त्यांनीं इतरत्र संशोधनकार्याचा दोन-दोन वर्षें अनुभव घेतला, आणि मगच त्यांना या विद्यापीठांत पीएच्. डी. ला प्रवेश मिळाला आहे.

नुसतें एम्. ए. किंवा एम्. एस्सी. होऊन माझ्याप्रमाणें एकदम कोणीच आलेले नाहींत. कमिटीनें माझी केस पूर्णपणें निकालांत काढली नव्हती. "डिसेंबरच्या बैठकींत तुमच्या अर्जाचा फेरविचार करून तुम्हांला अंतिम निर्णय कळवूं, तोंपर्यंत तुम्ही प्रा. बार्टलेट यांच्या हाताखालीं तुमचें संशोधनाचें काम चालू ठेवा" असें मला कळविण्यांत आलें होतें. त्याप्रमाणें मँचेस्टर विद्यापीठाचें आजच मला पत्र आलें आहे. एम्. एससी. कडून मला पीएच्. डी. स प्रवेश दिल्याचें त्यांनीं कळविलें आहे. माझा प्रबंध दोन वर्षांत पूर्ण होऊं शकला तर पीएच्. डी. ही पदवी मला दोन वर्षांनीं मिळूं शकेल. अर्थात् ही परवानगी माझी मुंबई विद्यापीठांतील प्रगति ( करिअर ) पाहून देण्यांत आली नाहीं, तर केवळ गेल्या दीड–दोन महिन्यांत मीं येथें जें काम केलें त्यावरून हा निर्णय विद्यापीठानें घेतला आहे. येथें नुसत्या पदव्यांना महत्त्व नसतें. पीएच्. डी. ला प्रवेश देण्यापूर्वीं निदान एक वर्षाचा संशोधनकार्याचा अनुभव पाहिजे हा नियम कटाक्षानें पाळण्यांत येतो. विद्यार्थ्याची संशोधन करण्याची पात्रता आहे हें प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय कोणालाच पीएच्. डी. ला प्रवेश दिला जात नाहीं.

येथील शिक्षणाची पातळी आपल्याकडे मिळणाऱ्या शिक्षणापेक्षां बरीच उंच आहे. मी एम्. ए. ला जें गणित शिकलों तें सर्व येथें बी. ए. ( ऑनर्स ) च्या कोर्सला नेमलेलें आहे. त्याशिवाय मी एम्. ए. होईपर्यंत ज्या गोष्टी शिकलों नाहीं त्यांपैकीं अनेक गोष्टी येथें बी. ए. च्या विद्यार्थ्यांना अभ्यासाव्या लागतात. संख्याशास्त्र घेऊन मी एम्. ए. ला पुन्हां बसलों होतों तेव्हां जो भाग शिकलों तो मात्र येथें बराच उपयोगी पडतो. पण त्याच्या अधिक समतोल अभ्यासासाठीं आवश्यक असलेली गणिताची बैठक अपुरी भासते. याचें कारण असें कीं, येथें पीएच्. डी. साठीं प्रबंध लिहिणाऱ्या विद्यार्थ्याकडून विद्यापीठाच्या फार मोठ्या अपेक्षा असतात. साधासुधा प्रबंध लिहून पीएच्. डी. मिळत नाहीं.

**मँचेस्टर विद्यापीठांतील** गणित–शाखा फार मोठी आहे. तीन मजली इमारत आहे. प्रा. बार्टलेट यांच्या मार्गदर्शनाखालीं माझा संख्याशास्त्रांतील संशोधनात्मक अभ्यास चालू आहे. इकडे येण्यापूर्वी संशोधनकार्याची मूलभूत कल्पना यावी व तद्विषयक थोडाफार अनुभव मिळावा

म्हणून मीं दिल्लीस तीन महिने राहून अभ्यास केला होता. पण दिल्लीला असतांना मला संख्याशास्त्रांतील Stochastic Process चा अभ्यास मुळींच करतां आला नव्हता. त्यामुळें येथें तो विषय घ्यायला परवानगी मिळेल कीं नाहीं ही शंका होती. पण तो विषय घेण्यास मला प्रा. बार्टलेट यांनीं परवानगी दिली. सध्यां माझें त्या विषयाचें प्राथमिक वाचन चालू आहे. पण गणिताचा परिचय वाढविण्यासाठीं गणिताचीं पांच व्याख्यानें मला आठवड्यांतून ऐकावीं लागतात. त्यांपैकीं तीन व्याख्यानें डॉ. रूटर यांचीं असतात. विद्यार्थी आम्ही तिघेच आहोंत. परंतु गणितशाखेमधील अध्यापकवर्गापैकीं (स्टाफपैकीं) दहा–बारा प्राध्यापक या व्याख्यानांना बसतात व आम्हां विद्यार्थ्यांप्रमाणें टिपणेंहि घेतात. या प्राध्यापकांपैकीं सात-आठ जण गणित विषयाचे पीएच्. डी. आहेत. विशेष म्हणजे मी ज्यांच्या हाताखालीं काम करतों ते प्राध्यापक बार्टलेट हेसुद्धां नियमितपणें या तासांना येऊन बसतात. यावरून येथील व्याख्यानें कोणत्या दर्जाचीं होत असतील याची कल्पना येईल. अधेंमधें एखादी लहान–मोठी सुटी आली तरी सुटी संपतांच अगदीं पहिल्या दिवसापासून विद्यापीठाचें काम सुरू होतें व तेंहि अगदीं व्यवस्थित. सुटीनंतरच्या पहिल्या दिवसाचा पहिला ताससुद्धां नेहमींच्या गांभीर्यानें सुरू होतो. आपल्याकडे उन्हाळ्याच्या किंवा दिवाळीच्या सुटीनंतर कॉलेजमधील पहिला दिवस म्हणजे लहान मुलांच्या खेळांतील लिंबलोणचेंच असतें. तासांना बसायच्या तयारीनें एखादाच विद्यार्थी येत असेल किंवा नसेल ! विटीदांडूच्या खेळांत सुरवातीला मार्क मिळाले कीं 'पहिलें दान देवाला' म्हणून खेळाडू तें उदारपणानें सोडून देतात. सुटी संपल्यावर पहिल्या दिवशीं कॉलेजांतील विद्यार्थ्यांची भूमिका आपल्याकडे या मुलांसारखीच असते. येथें मात्र तसें मुळींच नाहीं. आपआपल्या कार्यांत जो अभिरत असतो त्याला संसिद्धि लाभते हें गीतेंतील वचन इंग्रजांनीं अक्षरशः सर्व व्यवहारांत उतरविलें आहे.

संख्याशास्त्रांतील संशोधनाकरितां आम्ही एकंदर चौघे विद्यार्थी आहोंत. त्यांपैकीं एकाचा प्रबंध पुरा झाला आहे. दोघांचें एकेक वर्ष झालें आहे. यंदांचा नवीन विद्यार्थी असा मी एकटाच आहें. आम्हां चौघांना गेल्या रविवारीं प्रा. बार्टलेट यांनीं आपल्या घरीं रात्रीं आठ वाजतां जेवायला

बोलाविलें होतें. खूप मोकळेपणानें ते सर्वांशीं बोलले. रात्रीं अकरापर्यंत आम्ही त्यांच्या घरीं थांबलों होतों.

येथें आल्यानंतर मीं विद्यापीठांत माझें नांव लगेच नोंदविलें होतें. प्राथमिक फी, अध्ययन फी, विद्यार्थी-संघाची फी मिळून दहा पौंड (सुमारें १४० रुपये) भरावे लागले. आतां या वर्षी मला पुन्हां अध्ययन फी भरावी लागणार नाहीं.

विद्यापीठामार्फत फेब्रुवारी महिन्यांत सर्व विद्यार्थ्यांच्या छातीचे 'एक्स् रे'चे फोटो विनामूल्य काढणार आहेत. इकडे वैद्यकीय मदत (हेल्थ सर्व्हिस) फुकट असते. साधा ताप आला तरी डॉक्टर फुकट घरीं येऊन तपासतात व औषधहि मोफत देतात. मोठमोठीं ऑपरेशन्स फुकट करतात. चष्मे, दांतांच्या कवळ्या, कानांचीं ऐकूं येण्याचीं यंत्रें (इअर ट्रम्पेट्स), कृत्रिम अवयव ह्या जिनसा नागरिकांना फुकट मिळतात. राष्ट्रीय वैद्यकीय मदत योजनेप्रमाणें (नॅशनल हेल्थ स्कीमप्रमाणें) सरकार हा सर्व खर्च करतें.

माझें वजन तीन पौंड वाढलें आहे. प्रकृति सुधारत आहे. काळजी नसावी. पुढील पत्र २ जानेवारीस (म्हणजे पुढील वर्षी) पाठवीन.

सौ. आईस शि. सा. नमस्कार, चि. उषास अनेक आशीर्वाद.

आपला,

**वसन्त**

* * *

पत्र १२ वें

## नाताळचा आनंद

॥ श्री ॥

मँचेस्टर, दि. २ जानेवारी, १९५२.

प्रिय उषास सप्रेम आशीर्वाद.

तुला बालकवि ठोमरे यांची गोष्ट माहीत आहे? बालकवि नाशकास रे. टिळक यांच्याकडे राहत होते. तारा या नांवाच्या टिळकांच्या छोट्या मुलीचें एकदां बालकवींना पत्र आलें. तिचें म्हणणें कीं, तुम्ही मला एक खूप मोठें पत्र पाठवा. बालकवींनीं तिला खरोखरीच 'मोठें' पत्र पाठविलें. त्यांनीं एक गंमत

केली. त्यांनीं दोन–तीन इंच रुंदीचे कागदाचे बरेच कोरे कपटे तयार केले. ते एकाखालीं एक असे चिकटवून पतंगाच्या शेपटीसारखी त्यांची एक भली मोठी सुरळी तयार केली. त्या मुलीच्या पायापासून डोक्यापर्यंत पुरेल इतका लांबलचक कागद तयार झाला. त्यावर बालकवींनीं एक कहाणीवजा पण अत्यंत विनोदी व खुसखुशीत पत्र लिहिलें व तिला तें पाठविलें. खूप मोठें पत्र हवें ना? हें घे मोठें पत्र!

आज मीहि तुला असेंच लांबलचक पत्र लिहीत आहें. मात्र मी तें पतंगाच्या शेपटीवर लिहिणार नाहीं. घाबरूं नकोस! नेहमींचाच साधा कागद हातीं घेतला आहे.

मोठें पत्र पाठवायचें कारण असें कीं, येथें तसाच मोठा सण मला पहायला मिळाला. गेल्या आठवड्यात इंग्लंडमध्यें **नाताळचा सण** साजरा करण्यांत आला. त्या वेळीं मीं अनेक गोष्टी पाहिल्या, पुष्कळ गोष्टी अनुभवल्या, खूप खूप मजा वाटली. ही सारी गंमत तुला सविस्तर कळविलीच पाहिजे.

आपल्याकडील सणांच्या मानानें इकडे सण एकंदरीनें कमीच असतात. ख्रिसमस व ईस्टर हेच प्रमुख सण. विशेषतः ख्रिसमस आपल्याकडील दिवाळी-प्रमाणेंच इकडे फार उत्साहांत व आनंदांत साजरा करतात.

दि. २५ डिसेंबर हा सर्वांत प्रमुख दिवस. तो येसू ख्रिस्ताचा जन्मदिवस. दि. २४ ची संध्याकाळ म्हणजे नाताळची सायंकाळ–ख्रिसमस ईव्ह. तेव्हां-पासून खरा ख्रिसमस सुरू होतो. त्यानंतर दि. २६ हा बॉक्सिंग-डे—म्हणजे त्या दिवशीं एकमेकांना बक्षिसें द्यावयाचीं. त्यानंतरची ३१ डिसेंबरची रात्र व १ जानेवारी हे दिवस जुन्या वर्षाचा शेवट व नव्या वर्षाचा आरंभ म्हणून साजरे करतात. नाताळचे हे सर्व प्रमुख दिवस होत.

नाताळची तयारी दोन-दोन महिने आगाऊ सुरू होते. लोक आपलीं घरें धुऊन–झाडून स्वच्छ करतात व नंतर विविध प्रकारांनीं सजवितात. पताका, फुगे सर्वत्र दिसूं लागतात. बाजारांत शुभेच्छा-पत्रकें (ग्रीटिंग्ज्-कार्ड्स्) घेण्यासाठीं व आपल्या इष्टमित्रांना आणि नातेवाइकांना द्यावयाच्या नाताळच्या भेटी निवडून घेण्यासाठीं ही गर्दी उसळते! नाताळ जसजसा जवळ येतो तसतसा सर्वांच्या चेहऱ्यांवर आनंद दिसूं लागतो. खाण्यापिण्याची चंगळ उडूं लागते. पोस्टात भेटीचीं कार्डें पाठविण्याची गर्दी उडते.

बक्षिसें देण्याचा हा कार्यक्रम घरोघर चालतो. यांत कल्पना अशी असते कीं, ख्रिसमसबाबा म्हणजे 'सांटा क्लॉज' या नांवाचा तांबडें वस्त्र परिधान केलेला व पांढरीशुभ्र दाढीमिशा असलेला म्हातारा माणूस रेनडीयरच्या गाडींतून रात्रीं येतो व घराच्या धुराड्यांतून खालीं घरांत उतरतो. लहान मुलें झोंपतात त्या पलंगाला एक पायमोजा लावून ठेवलेला असतो, त्यांत तो बक्षिसाच्या वस्तु टाकतो. सकाळीं मुलें उठतात तेव्हा त्यांना आपलें बक्षीस सांपडतें व आनंद होतो. अर्थात् घरांतील मोठीं माणसेंच रात्रीं मुलें झोपल्यानंतर त्या मोज्यांत हीं बक्षिसें टाकून ठेवतात. कधींकधीं घरामध्यें नाताळचें झाड ख्रिसमस-ट्री म्हणून एक कृत्रिम झाड उभारून त्यावर दिव्यांची आरास करतात व त्यावर हीं बक्षिसें लोंबत ठेवलेलीं असतात.

नाताळचा विशेष कार्यक्रम येथील ब्रिटिश कौन्सिल या संस्थेनें केला. मूळ हेतु असा कीं, मँचेस्टरमध्यें जे परकीय विद्यार्थी आहेत त्यांना इंग्लंडमध्यें नाताळचा सण कसा साजरा करतात याची कल्पना यावी.

नाताळची सुरवात दि. १९ डिसेंबर १९५१ रोजीं सायंकाळीं ख्रिसमस पार्टीनें झाली. पंचवीस मुलगे व मुली एवढे आम्ही सायंकाळीं साडेसात वाजतां ब्रिटिश कौन्सिलच्या इमारतींत जमलों. प्रत्येक मुलानें लॉटरीप्रमाणें एक क्रमांक उचलायचा. मला ९ हा क्रमांक आला. त्याप्रमाणें मुलींतहि एकीला ९ हा क्रमांक आला. तेव्हां आम्ही दोघे जण भिडू झालों. प्रत्येक क्रमांकाला एकेक गमतीदार नांव दिलेलें होतें.

मला व माझ्या भिडूला 'होली' असें नांव आलें. पुढें आम्ही मिस्टर व मिसेस् होली या नांवानेंच संबोधले गेलों. अशा रीतीनें प्रत्येक मुलगा व मुलगी अशा जोड्या झाल्या. माझी भिडू मिसेस् जीन्स लॉज ही एकवीस वर्षांची मुलगी आहे व नुकतेंच तिचें लग्न झालेलें आहे. तिचे पतीहि उपस्थित होते. त्यांच्या वांटणीला मात्र दुसरी मुलगी आली होती. नंतर चार मोठ्या दिवाणखान्यांत पंधरा विचित्र वस्तु ठेवल्या होत्या—चटकन् नजरेस पडणार नाहींत पण काळजीपूर्वक पाहिल्या तर दिसतील अशा. उदाहरणार्थ, पोस्टाचें जुनें तिकिट एका मोठ्या चित्राला अगदीं कोंपऱ्यांत चिकटविलेलें होतें. रेल्वेचें तिकिट छताला लावलें होतें. ख्रिसमस-ट्रीच्या एका पानावर एक छोटें नाणें होतें. पताकांना एक निब् होतें. प्रत्येक जोडीनें या जिनसा शोधून काढायच्या.

कोणती जोडी कमींत कमी वेळांत सर्व वस्तु शोधून काढील अशी पैज होती. लगेच आम्हीं त्या वस्तु शोधायला आरंभ केला. मी व जीन्स हातांत हात घालून सर्वत्र हिंडलों. एखादी वस्तु मला दिसल्यास मी तिला सांगें. परंतु आसपास इतर जोड्या फिरत होत्या, त्यांना तर ऐकूं जाऊं नये म्हणून जीन्स मला लगेच दाबे व म्हणे, मोठ्यानें बोलूं नका. ती पटकन् मला खेटून उभी राही व माझ्या खांद्यावर हात टाकून कान माझ्या तोंडाजवळ आणून म्हणे, ' हं, आतां सांगा. ' एक विवाहित स्त्री–जिला मीं पूर्वी कधींच पाहिलेली नाहीं ती–इतक्या सलगीनें वागतांना पाहून फार चमत्कारिक वाटलें. पण यांत वाईट भाग अगदीं यत्किंचितहि नसतो. केवळ मित्र हीच भावना असते.

तासाभरानें आम्हां सर्वांना एकत्र बोलावून आमचे कागद गोळा करण्यांत आले. जास्त वस्तु ओळखणाऱ्या जोडीला बक्षीस मिळणार होतें. पंच सर्वांचे कागद चाळून कोणाचा पहिला क्रमांक लागतो तें पाहत होते. थोड्या वेळानें निकाल तयार झाल्यावर पंच उभे राहिले व म्हणाले, " मिस्टर व मिसेस् होली यांनीं पहिला क्रमांक पटकाविला आहे! पहिलें बक्षीस त्यांना देण्यांत येईल." आमचा आनंद गगनांत मावेनासा झाला. जीन्सनें तर उडी मारून पटकन् माझा हात पकडून जोरानें हस्तांदोलन केलें. हातांत हात घालून आम्ही टाळ्यांच्या गजरांत बक्षीस घेण्यास गेलों. पंचांनीं माझ्या हातांत दोन वस्तु दिल्या. त्या कागदांत गुंडाळलेल्या असल्यामुळें आंत काय होतें तें कळलें नाहीं. मीं दोन्ही पुड्या जीन्ससमोर धरल्या. मोठी पुडी होती ती तिनें उचलली व मला लहान ठेवली. तिच्या पुडींतून एक लहानसें नोट-बुक निघालें. माझ्या छोट्या पुडींतून प्रॉपेलिंग पेन्सिल निघाली.

नंतर एक छोटेंसें नाटक अर्धा तास झालें. इंग्लंडला आलेला नवीन विद्यार्थी प्रथमतः कसा वागतो व गांगरतो व पुढें कसा हुषार बनतो वगैरे भाग त्यांत विनोदी पद्धतीनें रंगविला होता.

मग आम्ही एका हॉलमध्यें गेलों. तेथें ख्रिसमस-ट्री उभारलें होतें. त्याच्यावर प्रत्येकाला देण्यासाठीं देणग्या बांधलेल्या होत्या. एक गृहस्थ ख्रिसमसबाबाचा वेष घेऊन आले–तांबडा झगा व कापसाची पांढरीशुभ्र दाढी. टाळ्यांच्या गजरांत त्यांचें स्वागत झालें. ते ख्रिसमस–ट्रीजवळ गेले व

त्यांनीं एकेकाला बोलावून बक्षिसें दिलीं. मला किल्ल्या ठेवण्याची सुरेखशी रिंग मिळाली. नंतर आम्ही सर्व जण फराळास गेलों. कॉफी, बिस्किटें, केक्स, सँडविचेस वगैरे पदार्थ होते. गप्पा मारीत अर्धा तास फराळ चालला होता.

पुढें नृत्याचा कार्यक्रम. आपल्या भिडूबरोबरच नृत्य करायचें. अर्थात् मला नाचतां येत नाहीं, त्यामुळें जीन्सची फार निराशा झाली. इंग्लंडच्या सामाजिक जीवनांत नृत्याचें फार मोठें स्थान आहे. जीन्स मला म्हणाली, " या, मी तुम्हांला नृत्य शिकवितें." पण नाचणें तितकेंसें सोपें नाहीं. कारण त्याला आंग्ल संगीत शिकावें लागतें. हॉलहि अतिशय चांगला होता, त्यामुळें अंगण वांकडें आहे, असें म्हणायचीहि सोय नव्हती ! त्या अर्ध्या तासांत जीन्सला माझ्या लाथांचा खूप प्रसाद मिळाला !

त्यानंतर खेळ झाले. त्यांत बरेच विविध प्रकार होते. पुरुषानें फुगा फुगवायचा, स्त्रीनें तो दोरीनें बांधायचा; मग फुगा खुर्चीवर ठेवून स्त्रीनें त्या फुग्यावर बसून तो फोडायचा; असा गमतीदार खेळ झाला. थोड्या वेळानें एका वर्तुळांत सर्व जण उभे राहिले. एक मुलगा व मुलगी असे आलटून पालटून; म्हणजे प्रत्येक मुलाच्या दोन्ही बाजूंस दोन मुली व प्रत्येक मुलीच्या दोन्ही बाजूंस दोन मुलगे. मग शेजारच्या मुलीचे हात धरून सर्वांनीं मोठ्यानें गाणीं म्हणायचीं. रात्रीं बरोबर बारा वाजतां हा कार्यक्रम आटोपला.

नाताळचा मुख्य दिवस २५ डिसेंबर. तो दिवस आम्हांला एखाद्या परकीय इंग्रज कुटुंबांत काढतां यावा म्हणून ब्रिटिश कौन्सिलनें एक योजना आंखली होती. आमच्यापैकीं प्रत्येकाला एकेक कुटुंब वांटून दिलें. त्या घरीं आम्हीं २५ डिसेंबर रोजीं जाऊन तेथें पांच-सहा तास घालवून ब्रिटिश जीवनाचा परिचय करून घ्यायचा, ओळखी करून घ्यायच्या, गप्पा मारायच्या, खेळ खेळायचे, खाणेंपिणें करायचें व अशा रीतीनें इंग्रजी राहणी अगदीं जवळून पाहायची अशी ती योजना होती. माझ्या वांटणीला येथून दहा मैलांवर असलेल्या ब्रॅम्हॉल या खेड्यांतील लँग कुटुंबाचें घर आलें. परंतु माझा व त्यांचा पूर्वपरिचय मुळींच नव्हता. दि. २० रोजीं रात्रीं आठ वाजतां आम्ही परदेशीय विद्यार्थी व ज्यांच्या घरीं आम्ही जाणार होतों त्या कुटुंबांतील प्रमुख मंडळी ब्रिटिश कौन्सिलमध्यें जमणार होतों. त्याप्रमाणें लँग कुटुंब हें मला त्या दिवशीं भेटलें. कॉफी, गप्पा व ओळखी झाल्या. ख्रिसमस डेला आमच्या

घरीं जरूर या असें जिव्हाळ्याचें निमंत्रण त्यांनीं मला दिलें. हा परिचयाचा व निमंत्रणाचा कार्यक्रम रात्रीं साडेनऊ वाजतां संपला. ख्रिसमस म्हणजे ख्राइस्टचा जन्मोत्सव. ख्राइस्ट व ख्रिसमस यांच्याविषयीं पुष्कळ प्रार्थनागीतें आहेत. या कविता सर्वांनीं एकत्र जमून म्हणावयाच्या. त्यांना कॅरोल म्हणतात. कांहीं वेळां रस्त्यांतून मुलांमुलींची टोळी हीं गाणीं म्हणत जातांना आढळेल, किंवा खाजगी जागेंत जमून मित्रमंडळी गाणीं म्हणतील किंवा गांवांतील सर्व लोक चर्चमध्यें जमून हीं गाणीं म्हणतील. येथून चार मैलांवर चीड्ल् म्हणून एक खेडें आहे. त्या ठिकाणीं एक चर्च आहे. त्या चर्चमध्यें अशा तऱ्हेची कॅरोल सर्व्हिस रविवारीं दुपारीं तीन वाजतां होती. ती मजा पाहण्यास मी गेलों होतों. चर्चमध्यें जाण्याचा हा पहिलाच प्रसंग. खूप गंभीर वातावरण होतें. आम्ही गेल्यावर प्रत्येकाला एकेक प्रार्थना–पुस्तक देण्यांत आलें. मलाहि मिळालें. चर्चमध्यें फुलें लावून अगदीं साधी सजावट केली होती. प्रथम आम्ही खुर्च्यांवर बसून राहिलों होतों. मग धर्मगुरूनें उठून सांगितलें, "आतां आपल्याला प्रार्थना म्हणायची आहे." मग सर्व जण उभे राहिले व प्रार्थना म्हणूं लागले. मागें पियानो वाजत होता. सर्वांचा अगदीं एक सूर. जवळजवळ चार–साडेचारशें मंडळी होती. एक कविता म्हणून झाली कीं एकदां खालीं बसायचें. अशा पांच-सहा कविता सर्वांनीं मिळून म्हटल्या. त्यानंतर मुलांनीं ख्राइस्टच्या चरित्रांतील आठवणी सांगितल्या. दीड तास हा कार्यक्रम चालला होता. चर्चमधील शांतता, शिस्त व गांभीर्य पाहून नवल वाटलें.

या चर्चमध्यें एक नवीन ओळख झाली. माझ्या शेजारीं एक इंग्रज गृहस्थ बसले होते. त्यांनीं मला सहज विचारलें, "तुम्ही कोठून आलां?" मीं म्हटलें, "भारतांतून." त्यांचा पुढचा प्रश्न—"तुम्ही ख्रिश्चन आहां काय?" मीं म्हटलें, "नाहीं, मी हिंदु आहें." नंतर थोड्या इतर गप्पा झाल्या व शेवटीं ते म्हणाले, "बुधवारीं तुम्ही आमच्याकडे चहाला याल का?" नवीन ओळखीची संधि मी कधींच घालवीत नाहीं. एका क्षणाचाहि विचार न करतां मीं साभार होकार दिला. मीं त्यांना त्यांचा पत्ता विचारला. ते म्हणाले, "तसें नकोच. माझें घर मँचेस्टरहून लांब आहे. कदाचित् तुम्हांला तें सांपडणार नाहीं. तेव्हां तुमचा पत्ता मला द्या. माझी मोटार घेऊन मी बुधवारीं अडीच वाजतां तुमच्या घरीं येईन व तुम्हाला माझ्या घरीं घेऊन जाईन."

सोमवार, दि. २४ डिसेंबर हा खरेदीचा शेवटचा दिवस. खिसमसमध्यें दुकानें बंद असतात म्हणून दि. २४ ला दुकानांतून फारच गर्दी असते. घरांमध्यें रंगीबेरंगी कागद, फुलें, पताका, फुगे वगैरेंनीं सजावट करण्यांत लोक गुंग होते. भेटीदाखल आलेलीं खिसमस–कार्डें टेबलावर, कोनाड्यांतून, आरशांवर मुद्दाम लावलेलीं होतीं. नाताळच्या भेटी एका स्वतंत्र टेबलावर ठेवलेल्या होत्या. असा देखावा प्रत्येक घरीं दिसून येत होता.

मंगळवार दि. २५ डिसेंबर हा तर प्रमुख दिवस. या एका दिवसांत मी पुष्कळ नवीन गोष्टी शिकलों. एक इंग्रज कुटुंब अगदीं जवळून पाहायला मिळालें. त्या दिवशीं सकाळीं मी नेहमींप्रमाणेंच उशिरां (म्हणजे सकाळीं नऊ वाजतां—सुटीच्या दिवशीं मी उशिरां उठतों) उठलों. गरम पाण्यानें स्नान केलें. उत्तम कपडे घालून न्याहारीला गेलों. आमच्या घरमालकिणीनें जेवण-घर खूपच सजविलें होतें. फुलांच्या सुवासानें खोली दरवळून गेली होती. नभोवाणीवर खास नाताळचा कार्यक्रम चालू होता. घरमालकीण मिसेस् क्रॉस व मिस् मेरी या उत्तम पोषाख करून माझी वाट पहात होत्या. मी खालीं गेल्यावर दोघींनींहि हस्तांदोलन करून 'मेरी खिसमस' म्हटलें. नंतर गप्पा-गोष्टींमध्यें न्याहारी आटोपली. इंग्रज लोकांचा हा फार मोठा सण आहे. सर्व आनंदित असतात. हल्लीं इकडे महागाई खूप वाढत आहे. अन्नाचें नियंत्रित वांटप (रेशनिंग) आहे. बेकारीहि आहे. तरी पण या सणांत सर्व जण झेपेल असा खर्च करून आनंदीआनंद करतात. मिसेस् क्रॉसनें मला भारीपैकीं साबण, सुगंधी तेल वगैरे वस्तु भेट म्हणून दिल्या. दुपारीं दोन वाजतां ब्रॅम्हॉल येथें लँग या इंग्रज कुटुंबाकडे मला जायचें होतें. तत्पूर्वीं एक वाजतां मिसेस् क्रॉस या खास नाताळची मेजवानी मला देणार होत्या.

नाताळांतील मुख्य पक्वान्न म्हणजे टर्की. हा बदकासारखाच एक पक्षी असतो. आपल्याकडे श्रीखंड किंवा बासुंदी त्याप्रमाणें इंग्रजांचा हा टर्की. त्याचें मांस फार छान लागतें; पण फार महाग. आठ शिलिंगांस एक पौंड (म्हणजे सुमारें बारा रुपयांस एक शेर). म्हणून लोक टर्की फक्त खिसमसमध्येंच खातात–अगदीं आवडीनें खातात.

जेवण आटोपून मी बसनें ब्रॅम्हॉलला जाण्यास निघालों. बरोबर तीन वाजतां लँग यांच्याकडे पोंचलों. मिस्टर व मिसेस् लँग यांचें स्वतःचें टुमदार

छोटें घर आहे. भोंवतालीं बगीचा आहे. वातावरण शांत आहे. त्यांना फक्त एक मुलगीच आहे. तिचें नांव स्ट्रोमा. तिचें वय २० वर्षें आहे. सर्वांनीं माझें स्वागत मोठ्या आनंदानें केलें. माझें नांव वसंत. तें उच्चारण्यास त्यांना त्रास पडूं लागला. परंतु त्याचें इंग्रजी भाषांतर करून स्प्रिंग असें सांगितलें. सर्वांना तें नांव फार आवडलें. प्रथमतःच त्यांनीं मला सांगितलें, "येथें अगदीं परकेपणा मानूं नकोस. घरच्यासारखाच वाग. इंग्रजी रीतीभाती वगैरे कांहीं न पाळतां तूं हिंदी पद्धतीनें वागलास तरी हरकत नाहीं. उलट त्यायोगें आम्हांला हिंदी पद्धति कळतील."

इतका आपलेपणा दाखविणारें मला भेटलेलें हें पहिलेंच इंग्रज कुटुंब. स्ट्रोमा ही माझ्यापेक्षां थोडी लहान, तेव्हां तिची व माझी गट्टी चांगलीच जमली. माझ्या कोचावर माझ्या शेजारीं बसून तिनें मला प्रश्नांच्या सरबत्तीनें गांगरून टाकलें. "तूं कसला अभ्यास करतोस? येथें किती वर्षें राहणार आहेस? तुला भाऊ किती? बहिणी किती? वडील काय उद्योग करतात?" एक ना दोन, अनेक प्रश्न एकामागून एक विचारले. तेवढ्यांत तिची नजर माझ्या घड्याळाकडे गेली आणि "असें कसें घड्याळ बांधलेंस!" असें ती म्हणाली. मला कळेच ना कीं, घड्याळ बांधण्यांत माझी काय चूक झाली! तिनें मला तिचें स्वतःचें घड्याळ दाखविलें, तेव्हां सारा प्रकार माझ्या ध्यानांत आला. आपण घड्याळ मनगटावर बांधतों तेव्हां तें आंतल्या बाजूस घेतों तर इकडे सर्व जण घड्याळ बांधतांना तें बाहेरच्या बाजूस घेतात. मीं त्यांना सांगितलें कीं, आम्ही सर्व जण असेंच बांधतों आणि संरक्षण व सोय या दृष्टींनीं असेंच बांधणें योग्य होय. ही आपली पद्धत त्या सर्वांना फार आवडली व मग लगेच सगळ्यांनीं आपापलीं घड्याळें माझ्याप्रमाणें बांधलीं.

नंतर चहा झाला. केक्स, बिस्किटें, होतींच. मीं त्यांना सांगितलें कीं, आम्ही चहा बशीनें पितों. प्रथम त्यांचा विश्वासच बसेना. मग मीं त्यांना प्रात्यक्षिक करून दाखविलें. फार गंमत वाटली त्यांना. नंतर पत्ते खेळायचें ठरलें. हो, पण एक गोष्ट सांगायची विसरलोंच. स्ट्रोमाचा वाङ्निश्चय झाला आहे. तिचा भावी पति पीटर हाहि तिथेंच होता. मी पत्ते हातांत घेऊन पिसूं लागलों तेव्हां सर्व जण हंसूं लागले. मला कळेचना! मग स्ट्रोमानें मला इंग्रज लोक पत्ते कसे पिसतात तें दाखविलें. पण आपली पद्धत अधिक कलात्मक

आहे हें त्यांनीं कबूल केलें. नंतर मी गुलाम भिड्डू करूं लागलों, तर पुन्हा हंशा! इकडे पार्टनर्स ठरवितांना गुलाम भिड्डू करीत नाहींत. प्रत्येकानें एकेक पान उचलायचें व ज्या दोघांना वरचीं पानें आलीं असतील ते भिड्डू. मी व स्ट्रोमा भिड्डू झालों.

नंतर सहा वाजतां आम्ही ख्रिसमस डिनरला गेलों. प्रथमच त्यांनीं मला सांगितलें, "तुला आवडतील तेच पदार्थ खा. न आवडणारे पदार्थ पानांत टाकलेस तरी हरकत नाहीं. कांटे-चमचे टाकून हातांनीं तुमच्या पद्धतीनें जेवलास तरी हरकत नाहीं." खरोखरच मला त्या कुटुंबाबद्दल फार कौतुक वाटलें. जेवतांना स्ट्रोमा माझ्याजवळ बसली व काय हवें-नको तें पाहूं लागली. तासभर जेवण मोठें रंगांत झालें. हरतऱ्हेचे खूपच पदार्थ होते. एकेक पदार्थ काय तें मला ती समजावून सांगे. मींहि आपले जेवणाचे पदार्थ-जिलबी, बासुंदी, श्रीखंड, पुऱ्या, भात, करंज्या, पापड, कोशिंबिरी, भजीं, आमटी इत्यादि व आपली जेवण्याची पद्धत-ताटें, पाट, रांगोळ्या, उदबत्त्या, केळीचीं पानें इ० त्यांना समजावून सांगितली. त्यांना खूप मजा वाटली. इकडे अशी पद्धत आहे कीं, एका बशींतील पदार्थ खाऊन संपला कीं ती बशी बाजूला सारून दुसरी बशी घ्यायची व तींत दुसरा पदार्थ घ्यायचा. मीं त्यांना सांगितलें कीं, आम्ही एकच ताट घेतों व एक पदार्थ संपला कीं दुसरा त्याच ताटांत घेतों. त्यामुळें बशा कमी घांसावयास लागतात. लगेच त्यांनीं ती पद्धत अमलांत आणून पाहिली—गंमत म्हणून.

नंतर एक मोठा ख्रिसमस केक आणण्यांत आला. आठ इंच लांब, आठ इंच रुंद व चार इंच जाड, एवढा मोठा केक होता तो. ख्रिसमस डिनरसाठीं हा मुद्दाम तयार करतात. त्या केकमध्यें तीन पेन्सचीं कांहीं नाणीं बेदाण्यासारखीं पण आंतमध्यें विखरून घातलेलीं असतात. बाहेरून तीं दिसत नाहींत. सर्व केक एका बैठकींत संपणें शक्य नसतें म्हणून त्याचा छोटा भाग कापून तो प्रत्येकास देतात; आणि ज्याला तें तीन पेन्सचें नाणें येईल तो पुढें खूपच श्रीमंत होणार अशी त्यांची समजूत असते. प्रत्येक जण तीन पेन्सचें एखादें नाणें आपल्याला आलें काय तें पाहूं लागला. आणि तेवढ्यांत मी त्या केकचा एक तुकडा खात असतांना एक नाणें माझ्या दांताखालीं आलें! मीं तें बाहेर काढून सर्वांना दाखविलें. सर्वांनीं आनंदानें टाळ्या पिटल्या. तें नाणें अर्थात् माझें झालें.

त्यानंतर कागदाच्या मजेदार टोप्या केलेल्या असतात त्या प्रत्येकानें घालायच्या. एव्हांना मी त्या कुटुंबांत खूप रुळलों होतों. सगळ्यांच्या डोक्यांवर मींच टोप्या ठेवल्या. अशा रीतीनें मोठ्या आनंदांत जेवण झालें. त्यानंतर क्रॅकर्सचा खेळ झाला. उदबत्तीच्या पुड्याप्रमाणें एक पुडा असतो. त्याच्या दोन्ही बाजूंस रबराची एक पट्टी असते. दोन बाजूंनीं दोघांनीं ओढायचें. एकाच्या हातांत पुडा येतो, दुसऱ्याच्या हातांत रबराची पट्टी येते. एका बाजूनें मीं ओढलें, दुसऱ्या बाजूनें स्ट्रोमानें. अर्थात् मीच जिंकलों. आंत एक डर्बी रेसचा घोडा व एक जॉकी असें खेळणें निघालें. लँग कुटुंबाची आठवण म्हणून मी तें जपून ठेवणार आहे.

त्यानंतर 'ट्रेझर हंट' (खजिन्याचा शोध) हा खेळ झाला. मिसेस् लँग म्हणाल्या, 'घरांतल्या तीन खोल्यांत कुठें तरी प्रत्येकासाठीं त्याचें नांव घालून एकेक वस्तु कागदांत गुंडाळून ठेवली आहे. ती वस्तु प्रत्येकानें शोधून काढायची. स्ट्रोमानें आमच्या वस्तु लपवून ठेवल्या होत्या व तिची वस्तु तिच्या आईनें लपवून ठेवली होती. त्यामुळें प्रत्येकाला या कार्यक्रमांत भाग घ्यावा लागला. मिस्टर लँग हे पन्नाशी उलटलेले गृहस्थ, पण तेसुद्धां शोधूं लागले. प्रत्येकाच्या डोक्यावर ती विक्षिप्त टोपी होतीच. मला फ्लॉवर पॉटमध्यें फुलांच्या आंत दडवून ठेवलेलें फाउंटन पेन मिळालें. अर्थात् लँग कुटुंबाची ती मला नाताळची देणगी होती. स्ट्रोमाला अत्तराची बाटली, तिच्या आईला स्नो पावडरचा डबा, तिच्या वडिलांना गार्टर्स आणि पीटरला चॉकोलेटची पेटी हीं बक्षिसें मिळालीं.

हो, एक गोष्ट सांगायची राहिलीच. जेवणानंतर दारूचा कार्यक्रम असतो. अशा उत्तम जेवणानंतर दारू पिण्याची पद्धत इकडे आहे. आपल्याकडे दारू म्हणजे बाटल्यांवर बाटल्या फस्त होतात (—असें ऐकतों); पण इकडे जेवल्यावर टॉनिकप्रमाणें फक्त छोटा अर्धा ग्लास दारू प्रत्येक जण पितो; त्यामुळें दारू चढत नाहीं. मी दारू घेत नाहीं असें सांगितल्यावर त्यांनीं मला लिंबाचें सरबत दिलें. असो. याप्रमाणें रात्रीं अकरा वाजेपर्यंत मीं तेथें होतों. नंतर आइस्क्रीमचा कार्यक्रम झाला व मिस्टर लँग यांनीं मला त्यांच्या मोटारींतून घरीं पोहोंचविलें. या कुटुंबाशीं माझा पुढें फारच दाट परिचय झाला.

बुधवार दि. २६ डिसेंबर हा बॉक्सिंग डे. त्याची मूळ कल्पना म्हणजे

त्या दिवशीं एकमेकांनीं एकमेकांना बक्षिसें द्यायचीं. पण लोकांना धीर थोडाच निघणार! म्हणून बहुधा ख्रिसमसडेच्याहि आधीं हीं बक्षिसें दिलीं जातात. बुधवारीं दुपारींच मला चर्चमध्यें भेटलेल्या गृहस्थाकडे जायचें होतें. बरोबर अडीच वाजतां आमच्या दारांत एक मोटार उभी राहिली. मीहि तयार होतोंच. ते गृहस्थ ठरल्याप्रमाणें वेळेवर आले. आम्हांला तोंपर्यंत परस्परांचें नांवहि माहीत नव्हतें. त्यांचें नांव ल्यूईस. एक मोठे व्यापारी आहेत ते. त्यांच्या घरांत एकूण माणसें चार. ते, त्यांची पत्नी, १३ वर्षांचा एक मुलगा व १७ वर्षांची एक मुलगी. मुलगी कोठें सहलीला गेली होती. मिस्टर ल्यूईस हे व्यापारासाठीं भारतांत १९२५ ते १९३५ या काळांत होते. मिसेस् लुईस यांचा जन्म गुजरातेंत बलसाड येथें झाला आहे. मुलीचा जन्म बंगलोरला झाला. हिंदुस्थानांतील बहुतेक प्रांतांत हें कुटुंब जाऊन आलें आहे. पुणेंहि त्यांनीं पाहिलें आहे. त्यांच्या घरांत हिंदुस्थानविषयक किती तरी छायाचित्रें आहेत. भारतांतील अनेक गांवांची आठवण म्हणून त्यांच्या घरांत कांहींना कांहीं वस्तु आहे. गया, अलाहाबाद, मद्रास, कलकत्ता व दार्जीलिंग येथें काय काय पाहण्यासारखें आहे तें त्यांनीं मला सांगितलें. १९२५ ते १९३५ या दहा वर्षांतील हिंदुस्थानांतील घडामोडी त्यांनीं मला बारकाईनें सांगितल्या; व आतां कसकसा बदल झाला आहे तें आस्थेनें विचारलें. त्यांनीं मला एक हिंदी पुस्तक व कांहीं हिंदी चित्रें भेट दिलीं आहेत. नंतर जेवण झालें. त्यानंतर भारतभर ते ज्या ज्या ठिकाणीं हिंडले त्या त्या ठिकाणांची त्यांनीं फिल्म घेतली आहे ती छोट्या सिनेमा-यंत्रावरून त्यांनीं मला दाखविली. मुंबई, दिल्ली, कानपूर, मद्रास, मदुरा वगैरे भाग त्या फिल्ममध्यें होता. दीडदोन तास चांगली करमणूक झाली. एव्हांना साडेसात वाजले होते. रात्रीं आठ वाजतां ब्रिटिश कौन्सिलमध्यें एका कार्यक्रमासाठीं मला जायचें होतें. म्हणून मिस्टर ल्यूईस यांनीं मला मोटारींतून परत मँचेस्टरला पोंचविलें.

शुक्रवार दि. २९ डिसेंबर रोजीं थोडा वेगळा कार्यक्रम होता. इतके दिवस आम्हीं पाहुणे म्हणून खूप मेजवान्या झोडल्या. आतां मात्र आमची भूमिका बदलली. ज्यांच्या घरीं आम्ही नाताळांत गेलों होतों त्यांना आम्हीं चहाला ब्रिटिश कौन्सिलमध्यें आमंत्रण दिलें होतें. शुक्रवारीं संध्याकाळीं तीन ते सहा लहान मुलांना व शनिवारीं रात्रीं मोठ्या माणसांना.

शुक्रवारीं तीन वाजतां सुमारें ४० मुलें जमलीं. त्यांचीं वयें ३ ते १० पर्यंत होतीं. मुलें मोठ्या आनंदानें व उत्साहानें खेळलीं. नंतर चहाचा कार्यक्रम. चहा, बिस्किटें, केक्स, सँडविचेस्, जेली, आइस्क्रीम वगैरे खूप पदार्थ होते. आम्ही मुलांबरोबर खात नव्हतों. आम्ही यजमान. प्रत्येकाला काय हवें, नको तें आस्थेनें विचारीत होतों व त्यांच्याशीं गप्पा मारीत होतों.

नंतर त्या बालकांना नाताळच्या भेटी देण्याचा कार्यक्रम झाला. एक ख्रिसमस ट्री उभारण्यांत आलें होतें. भेट देण्याच्या वस्तु त्या झाडाला टांगून ठेवल्या होत्या. प्रत्येकाला ओळीनें बोलावून त्या वस्तु देण्याची कामगिरी माझ्यावर सोंपविण्यांत आली होती. एकेक जण ओळीनें पुढें येई. झाडावरची आपल्याला हवी असेल ती वस्तु त्यानें दाखवायची व मीं ती त्यांना काढून द्यावयाची. अर्थात् सर्व वस्तु कागदांत गुंडाळलेल्या असल्यामुळें वस्तु काय आहे तें बाहेरून मुलांना समजत नसे. वस्तु दिल्यानंतर नांव विचारायचें व पाठीवरून हात फिरवून त्या मुलाला किंवा मुलीला निरोप द्यावयाचा.

सोमवार दि. ३१ डिसेंबर हा चालू वर्षाचा शेवट व नव्या वर्षाचा प्रारंभ म्हणून साजरा करतात. सर्व रात्र मजेंत, चैनींत घालवून नवें वर्ष सुरू झालेलें पाहायचें व मग झोंपायचें अशी प्रथा आहे. रात्रीं बारा वाजतां चर्चमधल्या सर्व घंटा वाजवून नव्या वर्षाचें आगमन जाहीर करतात. मोठमोठ्या चौकांत लोक जमतात. येथें टाउन–हॉलवर खूप मोठें घड्याळ आहे. बरेच लोक तेथें जमले. त्यांनीं त्या घड्याळाचे रात्रीचे बाराचे ठोके ऐकले, खूप मोठा जयघोष केला व मग ते झोंपायला गेले.

मी मात्र ब्रिटिश कौन्सिलमध्यें न्यू इयर्स इव्ह पार्टीला गेलों होतों. निरनिराळ्या प्रकारचे खूप खेळ झाले. नंतर अडीच तास ‘ गुडबाय मिस्टर चिप्स् ’ हा बोलपट दाखविण्यांत आला. एक शिक्षक या बोलपटांतील कथानकाचा नायक आहे. आपल्या नानांचा हा आवडता बोलपट आहे. त्यांनीं तो किती तरी वेळां पाहिला आहे. असो. त्यानंतर फराळ व नृत्य. बारा वाजेपर्यंत हा कार्यक्रम चालला होता. सर्वांनीं मिळून गाणीं म्हणून नव्या वर्षाचें स्वागत केलें.

ही झाली नाताळची हकीगत. आतां या देशांतील नाताळविषयक कांहीं लोकभ्रम व समजुती—

सर्वांत मजेशीर समजूत मिसलटोविषयीं. नाताळच्या सजावटीचा हा प्रमुख भाग. प्रत्येक घरांत नाताळमध्यें मिसलटोची फांदी छतावर टांगून ठेवण्यांत येते. आणि मजा अशी कीं, या मिसलटोच्या खालीं जर एखादी परकी स्त्री उभी असेल—मग ती ओळखीची असो वा अनोळखी असो, विवाहित असो वा कुमारिका असो, म्हातारी वा तरुण, गरीब वा श्रीमंत असो—तर त्या स्त्रीचें चुंबन कोणालाहि घेतां येतें! कोणाहि पुरुषास मिसलटोखालीं एखादी स्त्री आढळली व त्यानें तिचें चुंबन घेतलें तर तिला विरोध करतां येत नाहीं! — मग ती प्रत्यक्ष राजकन्या असली तरी हरकत नाहीं! त्या चुंबनास विरोध करणें हें अशिष्ट समजलें जातें. अर्थात् स्त्रिया सहसा मिसलटोखालीं उभ्या राहत नाहींत ; त्या तें चुकवितात. पण गफलतीनें जर अशी स्त्री उभी राहिली तर सहसा ती संधि कोणी सोडीत नाहीं.

जर्मनींत या बाबतींत थोडी निराळी समजूत आहे. त्या मिसलटोवर जितकीं फळें असतील तितकीं चुंबनें घेतां येतात! एक चुंबन घेतलें कीं एक फळ तोडून टाकायचें. आणि ज्या मुलीला मिसलटोखालीं कोणी चुंबीत नाहीं तिचें त्या वर्षी लग्न होत नाहीं.

२५ डिसेंबरला पौर्णिमा आली तर अशुभ. पण २५ डिसेंबरला खूप वारें सुटलें तर तो शुभशकुन समजतात.

ख्रिसमस डे ( २५ डिसेंबर ) पासून १२ व्या दिवशीं पाऊस पडला तर पुढील वर्षांत खूप पाऊस पडेल असें समजतात.

ख्रिसमस डेला जीं मुलें जन्मतात त्यांच्या स्पर्शानें युद्धांत घायाळ झालेले सैनिक बरे होतात!

ख्रिसमस डेला जन्मलेलीं मुलें पुढें धर्मगुरु होतात व मुली परिचारिका होतात.

घरांत शोभा आणण्यास, आपल्याकडील आंब्याच्या डहाळीप्रमाणें होली या झाडाचीं पानें टांगतात. १२ दिवसपर्यंत तीं पानें घरांत ठेवायचीं. आधीं काढल्यास अपशकुन समजतात. हीं पानें २४ डिसेंबर या दिवशींच टांगायचीं. तत्पूर्वी टांगल्यास घरांत भांडण! कांहीं होलींना कांटे असतात, कांहींना नसतात. घरांत प्रथम कांटेरी होली आणली तर पुरुषाचा वरचष्मा होतो. बिनकांटेरी होली प्रथम आणली तर स्त्रीचा.

फ्रान्समध्यें जर एखाद्या मुलीला आपल्या भावी पतीचें नांव माहीत करून घ्यायचें असेल तर खिसमस ईव्हच्या म्हणजे २४ डिसेंबरच्या दिवशीं रात्रीं जो पहिला पुरुष भिकारी भेटेल त्याला भिक्षा घालायची व नंतर त्याला त्याचें नांव विचारायचें. तेंच नांव तिच्या भावी पतीचें असतें.

शेवटची पण गमतीदार समजूत नव्या वर्षाची. सामान्यपणें इकडे अशी पद्धत आहे कीं, "माझ्याशीं लग्न करशील का?" म्हणून मुलानें मुलीस विचारायचें; मुलीनें नाहीं. पण लीप इयरमध्यें मात्र मुलींनीं मुलांना लग्नाविषयीं विचारायला हरकत नसते; आणि लीप इयरमध्यें जर एखाद्या मुलीनें मुलाला तसें विचारलें व त्यानें लग्नाला नकार दिला तर त्या मुलाचें लग्न हातमोज्यांशीं होतें अशी समजूत आहे! म्हणून मुलें सहसा नकार देत नाहींत. १९५२ हें लीप इयर आहे हं! मुलांनीं सांभाळून असलें पाहिजे.*

असो. बालकवींनीं पतंगाच्या शेपटीएवढेंच मोठें पत्र पाठविलें होतें. माझें हें पत्र मात्र एवढें लांबलें आहे कीं, त्याला लागलेल्या कागदांचा सबंध पतंगसुद्धां तयार झाला असता! बालकवि पतंगाच्या शेपटीवर घसरले; मी मात्र मारुतीच्या शेपटासारखी या पत्राची लांबण लावली आहे. तेव्हां आतां इथेंच पुरें करतों.

ती. नाना व सौ. आई यांना शि. सा. नमस्कार.

तुझा,
**भाऊ**

* * *

* नाताळसंबंधींचें हें पत्र प्रथम 'स्त्री' मासिकाच्या डिसेंबर १९५२ च्या अंकांत छापलें होतें.

पत्र १२ वें

## हिमवृष्टि

॥ श्री ॥

मँचेस्टर, दि. २६ जानेवारी, १९५२.

प्रिय उषा,

तुझें दि. २१ चें पत्र २४ ला मिळालें. दोन दिवस पत्र पाठविण्यास सवडच झाली नाहीं.

येथें आल्यापासून **हिमवृष्टि** केव्हां पाहायला मिळेल अशी उत्सुकता वाटत होती. तो योग चार दिवसांपूर्वी आला. सकाळीं उठल्यावर खिडकीचा पडदा बाजूस सारला तों काय? सर्वच पांढरें शुभ्र ! त्या रात्रीं बर्फ पडलें होतें. पाढरें शुभ्र पीठ–अगर बारीक पांढरें मीठ म्हणा ना–सर्वत्र पसरलेलें–जमिनीवर, रस्त्यांवर, झाडांवर, घरांवर–बर्फाचे थर ! खूपच मजा वाटली, कारण बर्फ पाहण्याचा पहिलाच प्रसंग. नंतर न्याहारी करून विद्यापीठांत जाण्यास निघालों तों परत बर्फ पडण्यास सुरवात झाली. कापूस पिंजून आकाशांतून कोणी तरी टाकीत आहे असेंच वाटलें ! गर्द–निळा ओव्हरकोट. पण थोड्याच वेळांत बर्फाच्या आच्छादनानें पांढरासफेत झाला ! पण कां कुणास ठाऊक–बर्फ पडतें तेव्हां थंडी बिलकुल भासत नाहीं. उलट उबदारच वाटतें. बर्फानें भरलेला ओव्हरकोट तसाच अंगावर ठेवून विद्यापीठांत गेलों. उष्णताजनक रचनेमुळें ( Heating arrangement ) तेथें बर्फ वितळून ओव्हरकोटावर दंवबिंदूंचे ठिपके दिसूं लागले व खूप मजा वाटली.

काल रात्रीं पुन्हा बर्फवृष्टि झाली. ब्रिटिश कौन्सिलमध्यें ' नील दीप ' ( The Blue Lamp ) हा बोलपट होता. तो पाहून रात्रीं अकरा वाजतां आम्ही परत यावयास निघालों. मी, माझा फ्रेंच मित्र रॉजर व दोन जर्मन मुली रूथ आणि ॲलिस. आम्ही एकाच भागांत राहतों म्हणून बरोबर निघालों. बसस्टॉपपर्यंत दोन फर्लांग चालत जायचें होतें. बर्फ थोडा थोडा पडतच होता. रस्त्यावर बर्फाचा अर्धा इंच थर होता. सर्वत्र पांढरें शुभ्र ! रस्त्यांत अगदीं सामसूम. रहदारी थांबली होती. तेवढ्यांत रूथ म्हणाली, " आपण बर्फाची

मारामारी करूं या!" अर्थात् हा खेळ येथें फार लोकप्रिय आहे. हिम-कंदुक (Snow-balls) तयार करायचे व एकमेकांच्या अंगावर फेंकून मारायचे. बर्फ भुसभुशीत असल्यामुळें लाडू पटकन् तयार होतात व मारामारी करतांना ते मुळींच लागत नाहींत. उलट ते तोंडावर आपटल्यावर फुटतात. मी व रॉजर एका बाजूला; रूथ व ॲलिस दुसऱ्या बाजूला. हा खेळ १५-२० मिनिटें चालला होता. इकडच्या मुली बऱ्याच दणदाकट असतात. त्या दोघींनीं बराच टिकाव धरला.

बर्फासंबंधीं हा चांगला भाग झाला. परंतु एकदां का रस्त्यावरचा बर्फ वितळूं लागला कीं सर्वत्र चिखल होतो—अगदीं पुण्यांत पावसाळ्यांत होतो तसा! बुटाचा एकेक पाय उचलून टाकावा लागतो; व बाहेर पडणें नकोसें होतें. त्यांत परत फ्रॉस्ट पडल्यास विचारायलाच नको. रस्ते खूप चिकट होतात व माणसें घसरून पडतात. पदपथावर (फूटपाथवर) इतका चिकटपणा नसतो. पण रस्त्यांत फार होतो. प्रथम मला हें माहीत नव्हतें. मी ऐटींत रस्ता ओलांडूं लागलों तों पाय घसरून सपशेल आडवाच झालों. मात्र येथें लोक हंसत नाहींत, उलट उठण्यास मदत करतात व 'इजा झाली काय?' अशी चौकशी करतात. कारण हा अनुभव नित्याचा आहे. मी उठून चालूं लागलों. तेवढ्यांत एक वीस-बावीस वर्षांची मुलगी माझ्या शेजारींच पडली. तिला आधार देऊन मीं उठविलें व परत आम्ही चालूं लागलों. बस्स्, तेवढीच ओळख! परंतु लगेच गप्पांना सुरवात झाली. ती आयरिश होती व शिवण-कला शिकण्यास तेथें आली होती. मला तिनें हिंदुस्थानविषयीं खूप विचारलें. मींहि तिला माहिती विचारली. मधून मधून तिचा पाय घसरे तर लगेच माझा हात धरून ती आधार घेई व पुन्हां चालूं लागे. हें सर्व सांगण्याचें कारण एवढेंच कीं, येथील सामाजिक जीवन निराळें असतें. विद्यापीठाजवळ आल्यावर मीं तिचा निरोप घेऊन आपल्या कामास लागलों. ओळख येथेंच संपली. पुन्हां ती भेटली नाहीं कीं कांहीं नाहीं.

इकडे कडाक्याची थंडी आहे, पण बर्फाचा थर सध्यां तरी कमी आहे. जेमतेम दहा दिवसच बर्फ टिकलें. मात्र एके दिवशीं १७° पर्यंत उष्णतामान उतरलें होतें. गेल्या कित्येक वर्षांत इतकें कमी झालें नव्हतें. सर्व मोऱ्या तुंबून गेल्या, कारण आंत पाणी गोठून बसलें होतें. परंतु ही थंडी एकच

दिवस टिकली. एकंदरींत पाहतां थंडी सौम्य होती असें सर्व जण म्हणतात. रस्त्यांतील बससकट सर्व रहदारी थांबेपर्यंत धुकें अजूनहि पाहायला मिळालें नाहीं. तीनचार यार्डांपर्यंतचेंच दिसेल इतकें धुकें होतें. पण कांहीं वेळां तोंडासमोर हात धरला तरी दिसत नाहीं असें म्हणतात. मला तो अनुभव अद्यापि आला नाहीं.

सौ. आईला सांग थंडीची प्रकृतीला जप. तिला व ती. नानांना शि. सा. नमस्कार.

तुझा,
**भाऊ**

* * *

**पत्र १४ वें**

# इंग्लंडच्या राजाचा मृत्यु

॥ श्री ॥

मँचेस्टर, २० फेब्रुवारी, १९५२.

चि. उषास शुभाशीर्वाद.

तुझें सविस्तर हकीकतीचें पत्र दि. १८ रोजीं मिळालें. तिकडील सर्वांची खुशाली कळल्यामुळें बरें वाटलें. एवढ्या लांब आल्यावर आपल्या घरचें पत्र आलें कीं केवढा विलक्षण आनंद होतो म्हणून सांगूं !

दहा दिवसांपूर्वी इंग्लंडच्या इतिहासांतील एक महत्त्वाची घटना घडली—**राजे सहावे जॉर्ज यांचें** दि. १० फेब्रुवारीस आकस्मिक **निधन** झालें.

**राजाचें निधन !** इंग्लंडच्या इतिहासांत राजाचें केवढें महत्त्व आहे हें तुला माहीत आहेच. एक व्यक्ति म्हणून राजाचें फारसें माहात्म्य नसलें तरी राज्यपदाच्या ज्या सिंहासनावर तो बसतो त्याला फार मान आहे. 'सहावे जॉर्ज वारले' यापेक्षां 'इंग्लंडचा राजा निवर्तला' या गोष्टीस अधिक महत्त्व

आहे. सहावे जॉर्ज ही व्यक्ति कालवश झाल्याबद्दल लोकांना कदाचित् तितकेंसें वाईट वाटणार नाहीं, पण इंग्लंडच्या राजास देवाज्ञा झाली ही गोष्ट प्रत्येकाच्या मनास फार लागली एवढें निश्चित. राजा म्हणून—व्यक्ति म्हणून नव्हे—सहावे जॉर्ज यांच्यावर लोकांची फार प्रीति होती. त्यांच्या मृत्यूनें प्रत्येक जण उदास दिसत होता. हा धक्का इंग्रजांना फार बसला; पण त्यापेक्षां ज्या धैर्यानें त्यांनीं तो सहन केला तें पाहून मला खरोखरच कौतुक वाटलें. आपल्याकडे एखादा लोकप्रिय पुढारी वारल्यानंतरचा देखावा आणि इंग्लंडच्या राजाच्या मृत्यूनंतर येथें आढळलेलें वातावरण यांत जमीन–अस्मानाचें अंतर आहे, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं.

सकाळच्या वृत्तपत्रांत राजाच्या मृत्यूची कांहींच बातमी नव्हती; त्यामुळें लंचसाठीं दुपारीं बारा वाजतां घराबाहेर पडेपर्यंत मला कांहींच कल्पना नव्हती. रस्त्यांतुन थोडेंसें चालल्यावर मी बसमध्यें बसलों. एव्हांना राजाच्या मृत्यूची बातमी सर्वत्र पसरली होती. पण मला कल्पना नव्हती. बसमध्यें लोक शांतपणें बसले होते – अगदीं नेहमींप्रमाणें. मी बसमध्यें दहा मिनिटें होतों. परंतु त्या घटनेविषयीं कोणीहि अवाक्षर बोलत नव्हतें. "राजा मेला, तुम्हांला कळलें का हो?" असें कोणीहि एकमेकांना विचारत नव्हतें. कोणाच्याहि हातांत वृत्तपत्राचे जादा अंक नव्हते. बसमधून मी विद्यापीठाजवळ उतरलों तरी मला पत्ता नव्हता. विद्यापीठाच्या इमारतीवर युनियन जॅक अर्धें फडकतांना दिसलें. पण तें राजासाठीं असेल अशी कल्पनाहि नव्हती. मी लंचसाठीं जाण्यास निघालों. वाटेंत माझ्या वर्गातले दोघे-तिघे इंग्रज मित्र भेटले. 'गुड मॉर्निंग' करून ते निघून गेले. राजाच्या मृत्यूबद्दल कुठलीहि वाच्यता किंवा चर्चा त्यांनीं केली नाहीं. नेहमीं गजबजलेलें रेस्टॉरंट मात्र जरा सुन्न दिसलें; पण मला वाटलें, तास चालू असतील म्हणून फारशीं मुलें आलीं नाहींत. तेवढ्यांत दुसरा एक हिंदी विद्यार्थी तेथें आला. लांबून मला पाहिल्यावर तो माझ्याकडे आला व त्यानें मला पहिला प्रश्न विचारला, "राजा मेला – तुला कळलें का?" मला धक्काच बसला. बारा वाजतां घरांतून बाहेर पडून पाऊण तासपर्यंत रस्त्यांतून हिंडून मला पत्ता लागला नाहीं. आणि प्रथम बातमी सांगणारा माणूसहि हिंदीच भेटावा! लंच आटोपून मी बाहेर आलों. मला वाटलें, आपल्याकडे निघतात तसे जादा अंक निघतील, पण

मुळींच नाहीं. दुपारीं बारा वाजतां रोजच इकडे कांहीं वृत्तपत्रें निघतात. फक्त त्यांचेच अंक निघाले. इतर बातम्यांप्रमाणेंच ठळक अक्षरांत ही बातमी होती. राजाचा जीवनक्रम विस्तृत दिला होता. नेहमींचीं अन्य सदरेंहि होतीं. राजाच्या मृत्यूनें विद्यापीठ वा दुकानें धडाधड बंद झालीं नाहींत. सर्व कचेऱ्या यथाक्रम चालू होत्या. फक्त करमणुकीचीं साधनें – सिनेमाचीं थिएटरें – बंद होतीं. त्यानंतर सर्व दिवसभर मला खूप इंग्रज भेटले – मी त्यांच्याशीं बोललोंहि; पण राजाच्या मृत्यूचा विषय त्यांनीं अजीबात काढला नाहीं. ती गोष्ट प्रत्येकास जाचत होती हें चेहरा सांगत होता; पण कुतूहल म्हणून, "राजा मेला, आश्चर्यच आहे, नाहीं? असा एकाएकीं कशानें हो गेला?" अशी फालतू चर्चा कोणीहि करतांना आढळलें नाहीं. सर्व जीवनक्रम यथाक्रम चालू होता. राजाच्या मृत्यूचें शल्य हृदयांत होतें – पण त्याचें उघड प्रदर्शन मात्र केलें जात नव्हतें, हें पाहून खरोखरच कौतुक वाटलें. त्याच दिवशीं कोळशाच्या खाणीकडे आमची ट्रिप होती. मी जाणार होतों. प्रथम मला वाटलें, कसली ट्रिप होणार? खाण बंद असेल व ती पाहायला मिळणार नाहीं. पण माझा कयास चुकला. ट्रिप व्यवस्थित झाली. खाणींतील काम चालू होतें. राजा मेल्यामुळें कोळसा खणण्याचें काम बंद ठेवण्याचें कांहींच कारण नव्हतें.

दि. १५ ला राजाची प्रेतयात्रा ( Royal funeral ) काढण्यांत आली. ती पाहण्यासाठीं लंडनला जायचा माझा विचार होता. पण त्याच दिवशीं विद्यापीठांत महत्त्वाचें व्याख्यान होतें. तें बुडविणें शक्य नव्हतें. या दिवशीं विद्यालयें, कचेऱ्या वगैरेंना सुटी नव्हती. दोन वाजतां पांच मिनिटें स्तब्धता पाळली एवढेंच.

राजाची प्रेतयात्रा सकाळीं ९॥ ते दुपारीं २ पर्यंत होती. ती टेलिव्हिजनवर दाखविली जायची होती. आपल्याला लंडनला जायचें जमलें नाहीं, पण टेलिव्हिजनवर तरी तो देखावा पाहावा अशी माझी इच्छा होती. पण विद्यापीठांतील व्याख्यान ११ ते १ पर्यंत होतें. त्यामुळें तेंहि जमलें नाहीं. सुदैवानें त्या प्रसंगाची फिल्म घेऊन ती त्याच दिवशीं रात्रीं ८ ते १०॥ पर्यंत टेलिव्हिजनवर दाखविली जाणार होती. माझी मैत्रीण मिस् मेरी वॉलवर्थ हिच्या घरीं टेलिव्हिजन आहे व तिनें मला बोलाविलें होतें. त्यामुळें सर्व

मिरवणूक अगदीं व्यवस्थित पाहायला मिळाली. खुद्द लंडनला सुद्धां गर्दींत ती नीट पाहतां आली नसती. पण रात्रीं मात्र घरबसल्या टेलिव्हिजनवर उत्तम पाहतां आली.

ही प्रेतयात्रा खूप थाटांत काढली होती. प्रेतयात्रा काढण्यामागील दुःखाच्या भागापेक्षां राजवैभवाचें प्रदर्शन जास्त होतें. सर्व जण सैनिकी वेषांत होते. गंमत म्हणजे प्रेतयात्रेचें प्रात्याक्षिक दोन दिवस आधीं केलेलें होतें. फक्त राजाची शवपेटिका ( Coffin ) नव्हती. बाकी सर्व भाग लंडनच्या रस्त्यांतून आधींच मिरविला जाऊन सर्व कार्यक्रम नियोजित वेळेंत बसतो कीं नाहीं हेंहि पाहिलें होतें. एखाद्या शुभ प्रसंगाचें प्रात्याक्षिक करणें ठीक असतें. पण प्रेतयात्रेसारख्या गंभीर व उदास प्रसंगाचेंहि प्रात्यक्षिक केल्यास त्यांतील सहृदयता व भावनेची हळुवारता नष्ट होते असें वाटतें. राजादेखील-देखाव्या-साठीं, राजपदाच्या वैभवासाठीं—जिवंतपणीं तर त्याला मिरवावेंच लागतें, पण मृत्यूनंतरहि बिचाऱ्याच्या मागचा हा त्रास लवकर सुटत नाहीं! राजपदावर आल्यावर त्या व्यक्तीस आपल्या मानवी भावना माराव्या लागतात असें दिसतें, कारण सहाव्या जॉर्जच्या मृत्यूची ही बातमी समजल्यावर राणी एलिझाबेथ आफ्रिकेहून परत आली तेव्हां तिलाहि आईच्या सांत्वनास जाण्या-पूर्वीं पार्लमेंटांत जाऊन शपथ घ्यावी लागली. तो सर्व सोहळा झाल्यावर मगच ती आईच्या समाचारास जाऊं शकली.

या वेळीं इंग्लंडच्या राजपदाविषयीं विविध प्रकारची मजेशीर माहिती मला समजली. तुलाहि ती उद्बोधक वाटेल, म्हणून मुद्दाम देत आहें—

(१) **सँड्रिंगहॅम**:—हें लंडनच्या उत्तरेस ५० मैलांवर एक खेडें आहे. येथें राजाचा मृत्यु झाला. या गांवाच्या पंचक्रोशींतील जहागीर राजाकडे असते असा रिवाज आहे. येथें राजाचा मोठा बंगला आहे. राजा या ठिकाणीं विश्रांती-साठीं जात असतो. आसपास घनदाट अरण्य असून तें राजाच्या शिकारीसाठीं राखून ठेवलें आहे. या खेड्यापासून जवळच दोन मैलांवर वॉल्फर्टन ( Wolferton ) हें रेल्वेस्टेशन आहे. राजाची शवपेटी सँड्रिंगहॅमहून घोड्याच्या गाडींतून रेल्वे-स्टेशनवर आणून तेथून लंडनला रवाना झाली. सँड्रिंगहॅम येथील राजाच्या बंगल्यांतील सर्व घड्याळें इंग्लिश घड्याळांच्या एक

तास पुढें असतात. ५ व्या जॉर्जनें शिकारीस वेळ मिळावा म्हणून तीं पुढें केलीं. तीं अजून तशींच आहेत. आतां दुसऱ्या एलिझाबेथनेंहि तीं तशींच पुढें राहावींत असें सांगितलें आहे.

(२) ह्या राणीला दुसरी एलिझाबेथ असें म्हणायला सुरुवात झाली. पण स्कॉटलंडचा यास विरोध आहे. कारण पहिल्या एलिझाबेथच्या वेळीं स्कॉटलंड वेगळा होता. स्कॉटलंडवर राणीची सत्ता नव्हती. त्यामुळें त्यांच्या दृष्टीनें ही राणी पहिली एलिझाबेथच आहे.

(३) ज्या रस्त्यानें राजाची प्रेतयात्रा जायची होती त्या रस्त्यावरील घरांच्या खिडक्या त्या वेळेपुरत्या—प्रेतयात्रा पाहण्यापुरत्या—शंभर शंभर पौंड भाडें देऊन लोकांनीं भाड्यानें घेतल्या होत्या.

(४) एका राजानंतर दुसरा राजा (किंवा दुसरी राणी) राज्यावर आल्यावर पोस्टाचीं तिकिटें व नाणीं यांवरील राजाचें किंवा राणीचें तोंड आलटून पालटून विरुद्ध दिशेस करतात. सातव्या एडवर्डचीं नाणीं व पोस्टाचीं तिकिटें यांत त्याचें तोंड उजवीकडे होतें, पांचव्या जॉर्जचें डावीकडे, आठव्या एडवर्डचें उजवीकडे, सहाव्या जॉर्जचें डावीकडे व आतां एलिझाबेथचें तोंड त्यावर उजवीकडे येईल.

(५) एलिझाबेथ ही परदेशीं (आफ्रिकेंत) असतांना राणी झाली. परदेशांत असतांना राजपद मिळालें असें दोनशें वर्षांत घडलें नव्हतें. मागें पहिला जॉर्ज गादीवर आला तेव्हां तो जर्मनींत होता.

(६) एलिझाबेथचा जन्म १४ एप्रिल १९२६ रोजीं झाला. (म्हणजे माझ्या जन्मानंतर फक्त सात दिवसांनीं!) ती वयाच्या पंचविसाव्या वर्षी गादीवर आली.

(७) राणीचा पति ड्यूक ऑफ एडिंबरा यास कांहींहि अधिकार वा सत्ता नाहीं.

(८) राणीला तनखा किती मिळेल?—इंग्लंडच्या राजाच्या अगर राणीच्या ताब्यांत जी वंशपरंपरा जहागीर असते तिचें वार्षिक उत्पन्न सुमारें वीस लक्ष पौंड असतें. पण तें उत्पन्न स्वतः न घेतां राज्यकारभारासाठीं देऊन टाकायचें अशी प्रथा तिसऱ्या जॉर्जपासून पडली आहे. त्यामुळें मी हें उत्पन्न

घेणार नाहीं असें एलिझाबेथला प्रथम जाहीर करावें लागलें. नंतर पार्लमेंटमध्यें " माझा दर्जा राखून मला मानमरातबानें राहतां येईल इतके पैसे द्या " अशी विनंती राणी करील. त्यानंतर पार्लमेंटच्या २१ सर्वपक्षीय सभासदांच्या समितीनें राणीला किती पगार द्यावयाचा तें ठरवायचें. हें सहाव्या जॉर्जच्या मृत्यूनंतरच्या सहा महिन्यांच्या कालावधीच्या आंत ठरलें पाहिजे. तोंपर्यंत त्याच्या मृत्यूपूर्वी जो भत्ता राजघराण्यांतील व्यक्तींना दिला जात असे तोच चालू राहील. कोणत्याहि राजाच्या मृत्यूनंतर नवी व्यक्ति राजपदावर आली कीं हीच पद्धति अवलंबिली जाते. राजघराण्यांतील प्रत्येक व्यक्तीला (सहाव्या जॉर्जची विधवा राणी, एलिझाबेथचा पति, तिचीं मुलें इ.) ठराविक रक्कम वार्षिक तनखा म्हणून मिळेल.

प्रत्यक्ष राज्यारोहणसमारंभ (कॉरोनेशन) वर्ष दीड वर्षानें होईल. असो.

नवीन वर्षाचें पंचांग मला सी-मेलनें ( Sea-mail ) पाठव म्हणजे महत्त्वाचे सण केव्हां आहेत तें तरी कळत जाईल. येथें भोजनोत्तर गोड पदार्थ रोजच असतात. म्हणजे दररोज थोडाफार सण साजरा होतो म्हणेनास ! लंचनंतर व सायंकाळीं जेवतांना कांहींना कांहीं गोड पदार्थ पोटांत जातोच. इतक्या थंडींतहि लंचनंतर आइस्क्रीम व त्यावर कॉफी पिण्याची पद्धत आहे. अशा गारठ्यांत आइस्क्रीम कसें खातां येईल असें मला प्रथम वाटे. पण खाल्ल्यानें मुळींच त्रास होत नाहीं. त्याशिवाय येथें लंच पुरा होत नाहीं. कांहीं वेळां आइस्क्रीमचा घट्ट केलेला गोळा कागदांत गुंडाळलेला असा मिळतो. त्याची किंमत फक्त तीन पेन्स.

ती. नाना व सौ. आई यांच्या प्रकृतीचें क्षेम पुढील पत्रीं कळव. त्यांना माझे शिरसाष्टांग नमस्कार.

तुझा,
भाऊ

* * *

पत्र १५ वें

# कोळशाची खाण

॥ श्री ॥

मँचेस्टर, १० मार्च, १९५२.

प्रिय उषा,

इंग्लंड हा उद्योगप्रधान देश आहे असें आपण नेहमीं म्हणतों, पण इंग्लंडनें आपली जी असाधारण औद्योगिक प्रगति करून घेतली आहे, तिचा बारकाईनें अभ्यास करण्यासारखा आहे.

यासंबंधीं मला आलेला एक अनुभव निवेदन करण्यासारखा आहे. येथील एक **कोळशाची खाण** पाहण्यासाठीं आम्ही कांहीं विद्यार्थी गेलों होतों, याचा उल्लेख मीं मागील पत्रांत केला होता. कोळशाच्या खाणींत आम्हांला इंग्रजांच्या उद्योगप्रियतेचें व साहसी वृत्तीचें अद्भुत दर्शन झालें. कोळशाच्या खाणींत अगदीं खालपर्यंत शेवटच्या टोंकास जाऊन कसें काम चालतें हें पाहिल्यावर त्याचें वर्णन पत्ररूपानें तरी लिहून न ठेवणें अशक्य आहे.

मँचेस्टरपासून सुमारें १० मैलांवर ॲथरटन या लहानशा खेड्यांत गियफिल्ड नांवाची कोळशाची खाण आहे. ती पाहण्याची सहल ब्रिटिश कौन्सिलनें आंखली होती. आम्ही वीस विद्यार्थी दुपारीं दोन वाजतां बसनें मँचेस्टरहून निघालों व तीनच्या सुमारास कोळशाच्या खाणीजवळ पोंचलों.

खाण बरीच मोठी आहे. तेथें शक्य तेवढी आधुनिक यंत्रसामुग्री आहे. बरोबर काय काय सामान न्यायला हवें तें आम्हांला आधीं सांगितलें होतें. साबू, टॉवेल, धूळ झाडण्यासाठीं ब्रश, अगदीं मळके कपडे व जुनाट बूट. प्रथम आम्ही गेल्यावर एका वहींत आमचीं नांवें व पत्ते लिहिण्यास सांगितलें व मग डोक्यावर घालण्यासाठीं प्रत्येकास एकेक लोखंडी टोपी दिली.

खाणींत अंधार असतो. कुठें दगड वगैरे बाहेर आलेले असतात. कांहीं भाग इतका अरुंद असतो कीं, तेथें सरपटतच जावें लागतें. अशा वेळीं संरक्षण म्हणून लोखंडी टोपी प्रत्येकास वापरावीच लागते. दुसरी आवश्यक वस्तु म्हणजे बॅटरी. खाणींत सर्वत्र गडद अंधार असतो. खाणींतील कामगारसुद्धां

बॅटऱ्या वापरतात. बॅटऱ्यांच्या उजेडाखेरीज दुसरा कोणताहि प्रकाश खाणींत नसतो. बॅटऱ्या फार प्रखर असतात. पण त्या आपल्या नेहमींच्या बॅटऱ्यांपेक्षां निराळ्या असतात. त्यांना एक पट्टा असतो. तो आपल्या कमरेभोंवतीं गुंडाळायचा. जींत वीज तयार होते अशी पेटी त्या पट्टयाला जोडलेली असते. त्या पेटींतून एक तीन फूट लांब तार बाहेर सोडलेली असते. त्या तारेच्या टोंकाला दिवा असतो. त्या दिव्याला दोन बल्ब्ज असतात. किल्ली उजव्या बाजूला फिरवल्यावर एक दिवा लागतो व डावीकडे फिरवल्यावर दुसरा दिवा लागतो. एका वेळेस एकच दिवा लागतो. एक दिवा जास्त प्रकाश देतो, दुसरा मंद प्रकाश देतो. बॅटरीच्या दिव्याचें टोंक हातांत धरून आपल्या पायाखालचा रस्ता पाहत पुढें जायचें. पण कामगार काम करतात तेव्हां तीन फूट लांबीच्या तारेचें टोंक टोपींत अडकविलेलें असतें. त्यामुळें काम करण्यास दोन्ही हात रिकामे राहूं शकतात व टोपींत दिवा अडकविल्यामुळें ज्या भागांत कामगार काम करतो, तेथें भरपूर उजेड पडूं शकतो. त्या बॅटरीवर क्रमांक असतात. खाणींत जाण्यापूर्वी प्रत्येकाला बॅटरी मिळते. आपलें नांव व त्यापुढें बॅटरीचा क्रमांक लिहावा लागतो. हेतु हा कीं, त्या क्रमांकाची बॅटरी जाग्यावर आली नाहीं तर कोणता माणूस आंत राहिला तें चटकन् समजूं शकतें.

ही झाली पूर्वतयारी. नंतर आम्हांला एका खोलींत नेलें. तेथें आम्हांला 'चांगले कपडे काढून ठेवा व मळके कपडे चढवा ' असें सांगितलें. विशेषतः कामगार लोक खाणींत उतरतात तेव्हां मळके कपडे तेथें चढवून पहिले काढून ठेवतात. परत जातांना पुन्हा ते घालावयाचे अशी पद्धत. आम्हीं ओव्हर-कोट वगैरे सामान तेथें ठेवलें.

त्यानंतर मॅनेजरनीं आम्हांला सबंध खाणीचा नकाशा दाखविला. खाणकाम कसें कसें, कोठें कोठें चालतें ती माहिती सांगितली व आम्ही कोणत्या मार्गानें जाणार हेंहि सांगितलें.

प्रथमतः आम्ही वाफेवर चालणाऱ्या लिफ्टच्या साहाय्यानें कोळशाच्या थरापर्यंत ५०० यार्ड खालीं गेलों. ती लिफ्ट ताशीं ३० मैल इतक्या वेगानें खालीं जात होती. अर्थात् खाणींत सर्वत्र सिग्नलिंगची पद्धत आहे. टेलिफोन व दोर ओढल्यावर वाजणाऱ्या घंटा ह्यांच्या साहाय्यानें खाणींतल्या कोठल्याहि

मागांतून मध्यवर्ती केंद्राशीं संबंध ठेवतां येतो. त्यामुळें लिफ्टनें आम्हांस वरून सोडण्यापूर्वी खालीं संदेश गेला कीं, इतकी माणसें लिफ्टनें पाठवितों. आम्ही खालीं पोहोंचल्यावर पुन्हा संदेश गेला. माणसें सुखरूप पोहोंचलीं. अर्थात् लिफ्ट कोळशानें अगदीं काळीकुट्ट झालेली होती व कामगार व कोळसा ह्यांचीच वाहतूक फक्त करायची त्यामुळें अगदीं जुनीपुराणी होती. मुंबईच्या अद्ययावत् लिफ्टप्रमाणें नव्हती. आम्ही खालीं पोहोंचल्यावर ६-६ जणांचे ३ विभाग केले व प्रत्येक भागास एक एक माहितगार दिला गेला. प्रथम १ ला भाग, नंतर १० मिनिटांनीं दुसरा भाग, नंतर पुन्हा १० मिनिटांनीं ३ रा भाग असे खाण पाहण्यास गेलों. प्रत्यक्ष खाणकाम चालू होतें तेथें पोहोंचण्यापूर्वी १ मैल पोकळींतून जावें लागलें. ६ फूट उंच व १० फूट रुंद अशी ती पोकळी आगगाडीच्या बोगद्याप्रमाणें भासत होती. सर्वत्र अंधार होता. पण हवा मात्र खेळवली होती. त्यामुळें गुदमरल्यासारखें अजिबात वाटत नव्हतें. आमच्या बॅटऱ्यांच्या साहाय्यानें आम्ही वाट पाहत पुढें चाललों होतों. सर्वत्र धूळ आणि कोळशाची काळीकुट्ट पुटें होतीं. आमचे हात, पाय, तोंड काळें झालें. बूट कोळशाच्या धुळींत खूप खोलवर रुतले जात. सुरवातीस बरें वाटलें. पण जसजसें कोळशाच्या थराजवळ येऊं लागलों तसतशी पोकळी अरुंद होऊं लागली. ताठ उभें राहून चालतां येईना. वांकून चालूं लागलों. पुढें पोकळी आणखी अरुंद झाली. बसून व पुढं तर निजून जावें लागलें. कामगार खणण्याचें काम करीत होते. हवा खूप ऊष्ण होती–घाम येण्याइतकी. आणि त्या तशा स्थितींत कामगारांचें काम चाललेलें! खाणी-कामगारांच्या जीवनाची यथायोग्य कल्पना आली. गलिच्छ काम, पुन्हा मेहनतीचें, आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट—केवढा धोका! इतकी अरुंद जागा कीं, वरचा एखादा लहानसा दगड कोसळला कीं गुदमरून मरण्याखेरीज दुसरा मार्ग नाहीं. अशाहि स्थितींत ते कामगार काम करतांना पाहून खरोखरच आश्चर्य वाटलें. आम्ही सर्व जण शेवटच्या थराला पोहोंचल्यावर आम्हांला काम दाखविण्यासाठीं कोळशाला सुरुंग लावून तो पेटविण्यांत आला. खूप मोठा आवाज त्या पोकळींत घुमला. वरची सारी जमीन भूकंपाप्रमाणें हादरली गेली आणि आतां वरची जमीन खालीं कोसळते कीं काय असाच भास झाला. आतां त्याची मजा वाटते, पण प्रत्यक्ष त्या जागीं, त्या वेळेस

मात्र अक्षरशः भीतिच वाटत होती. त्यानंतर लहान आगगाड्यांतून हा कोळसा भरून तो पोकळीच्या शेवटीं आणतात. अर्थात् रूळ आहेत, पण दोन रुळांतील अंतर फक्त १ फूट व डबेसुद्धां एकाद्या मोठ्या ट्रंकेच्या दुप्पट, एवढेच लहान. मात्र ही आगगाडी विजेच्या अगर वाफेच्या जोरावर चालत नाहीं. यंत्राच्या साहाय्यानें एक दोर फिरवितात व त्या दोरांच्या जोरावर हे



कोळशाच्या खाणींत

डबे चालतात. हें मात्र प्रयक्ष बघण्यास मिळालें नाहीं. अर्थात् पोकळी इतकी लहान होत जाते कीं, शेवटपर्यंत आगगाडीचे डबे जातच नाहींत. एक पट्टा फिरत असतो. त्या पट्टयावरच कोळसा ठेवून कोळसा वाहिला जातो.

आगगाडीच्या डब्यांतून वाहिलेला कोळसा रुळांवरून लिफ्टकडे जातो. मध्यें रूळ सोडलेले असतात. तो डबा लिफ्टमध्यें आल्यावर लिफ्ट वर जाते.

वर पुन्हा लिफ्टला रूळ जोडलेले व ते डबे वर आल्यावर पुन्हा रुळांवर योग्य त्या ठिकाणीं जातात. अशा रीतीनें आमचा हा खाणींतील कार्यक्रम ३॥ ते ६ चालू होता. ३॥ ला आम्ही लिफ्टनें खालीं उतरलों. पुन्हा ६ वाजतां वर आलों. वर आल्यावर सर्व जण अगदीं काळेकुट्ट झालों होतों. ऊन पाण्याच्या बाथरूमची सोय असते तेथें जाऊन 'शॉवरबाथ' घेतला, आणि आमचे चांगले कपडे परत घातले. नंतर मॅनेजरनीं आम्हांस चहा, केक्स्, बिस्किटें व सँडविचेस् खावयास दिलीं.

हो, एक सांगावयाचें राहिलें. खाणींतून वर आल्यावर पहिलें काम डोक्यावरची टोपी व बॅटरी परत करणें व मगच आपल्या इतर व्यवसायास जाणें. तसेंच खाणींत जाण्यापूर्वी आमच्याजवळ काडेपेटी वगैरे नाहीं ह्याची खात्री करून घेतली होती.

खाणींतील कठीण अशा जीवनाची बाहेरून कल्पना येत नाहीं; परंतु आंतमध्यें प्रत्यक्ष जाऊन ज्या धोक्यांत तें काम करतात तो धोका थोडा काळ का होईना स्वतः पत्करून मग मात्र पूर्णत्वानें येते. कांहीं कांहीं कामगारांना आठवड्याला १४ पौंड म्हणजे महिना सुमारें ८०० रुपये इतकें वेतन दिलें जातें. अर्थात् साधारणपणें दोन-तीन पौंड एवढेंच देतात.

डेव्हीच्या संरक्षक दिव्याची (डेव्हीज सेफ्टी लॅम्पची) तुला माहिती असेलच. कधीं कधीं कोळशांत असलेल्या एक प्रकारच्या विषारी वायूचें प्रमाण वाढतें. त्यानें माणसें गुदमरून मरतात, अगर त्या वायूनें पेट घेतला तर स्फोट होतो. विषारी वायूनें प्रमाण वाढलें कीं नाहीं हें संरक्षक दिव्यानें समजतें. प्रमाण वाढलें तर त्या दिव्याची ज्योत जास्त निळी होते व धोका कळून येतो. आमच्याबरोबर जो माहितगार मनुष्य होता त्यानें हा दिवा आपल्याजवळ ठेवला होता. दिव्याचें काम कसें चालतें हेंहि त्यानें सांगितलें.

संरक्षक दिव्यावरून सुचलें—इकडे आतां दिवेलागण होऊन बराच वेळ झाला तरी माझें पत्रलेखन चाललें आहे. तरी आतां पुरें करतों.

ती. नाना व सौ. आई यांना शि. सा. नमस्कार.

तुझा,

भाऊ

* * *

पत्र १६ वें

## कँटरबरी कॅथिड्रल

॥ श्री ॥

मँचेस्टर, दि. १५ एप्रिल, १९५२.

प्रिय उषास, अनेक आशीर्वाद.

मध्यंतरीं आम्हांला ईस्टरची सुटी मिळाली. या सुटींत कुठेंतरी छोटीशी सहल काढावी अशी कल्पना कांहीं विद्यार्थ्यांनीं मांडली. इंग्लंडमधील **कँटरबरी कॅथिड्रल**विषयीं मीं खूप खूप ऐकलें होतें. तेव्हां या निमित्तानें हें कॅथिड्रल पहायला मिळालें तर बरें होईल असें मला वाटलें; व मीं तसें माझ्या मित्रांना सांगितलें. त्या बाजूचा भाग अतिशय निसर्गरम्य असल्यामुळें सर्वांनींच माझ्या सूचनेला संमति दिली व आम्ही सात-आठ विद्यार्थी २८ मार्च रोजीं प्रवासाला निघालों.

आधीं आम्हांला लंडनला जायचें होतें. आगगाडीनें हा प्रवास तीन-चार तासांतच संपतो. त्यामुळें इंग्लंडचें सृष्टिसौंदर्य थोडेंसेंच पहायला मिळतें; म्हणून आम्ही मँचेस्टरहून सकाळीं ९ च्या बसनें निघालों. १८० मैलांचा प्रवास आटोपून बस सायंकाळीं ७॥ ला लंडनला पोंचली. एवढा दीर्घ प्रवास कंटाळवाणा होईल असें प्रथम वाटलें. पण तसें कांहीं झालें नाहीं. हंसऱ्या, हिरव्या सृष्टीच्या सान्निध्यांत असतांना लंडन केव्हां आलें तें कळलेंहि नाहीं.

दोन-तीन दिवस लंडनच्या आसपासचीं कांहीं गांवें पाहून दि. १ एप्रिलला सकाळीं ९॥ च्या बसनें आम्हीं लंडन सोडलें व आम्ही कँटरबरीच्या मार्गास लागलों. केंट या परगण्यांतून आमची बस चालली होती तेव्हां उत्तम वनश्री पहायला मिळाली. थंड हवा व सतत पाऊस यांमुळें हिरव्यागार गवताची देणगी इंग्लंडला मिळाली आहे. कुठेंहि केव्हांहि जा, रुक्ष प्रदेश दिसतच नाहीं. टेकड्या आहेत पण त्या सगळ्या हिरव्या गवतानें आच्छादलेल्या. 'पृथ्वी हिरवागार शालू नेसली आहे' अशीं वर्णनें आपण वाङ्मयांत वाचतों, पण त्याची खरी प्रचीति आपल्या देशापेक्षां इंग्लंडमध्यें जास्त येते. मेडस्टोन हें केंटचें प्रमुख शहर. शेतीविषयीं केंट प्रसिद्ध आहे. मेडस्टोन हें शेतीचें केंद्र आहे.

बस मेडस्टोनमधून गेली तेव्हां कागदाच्या गिरण्या व दारू गाळण्याचे कारखाने दिसले. बस थोडी पुढें गेल्यावर ऑलिंग्टन हा तेराव्या शतकांतील ऐतिहासिक किल्ला दिसला.

दुपारीं साडेचारा वाजतां आम्ही कँटरबरी शहरांत येऊन पोंचलों. शहर लहानसेंच आहे. येथें बघण्यासारखें एकच ठिकाण व तें म्हणजे ख्राइस्ट चर्च हें कॅथिड्रल.

कँटरबरीचें कॅथिड्रल हें इंग्लंडमधील सर्व चर्चेसमध्यें प्रमुख ( Mother Church of English Christianity ) म्हणून समजलें जातें. कँटरबरीचा आर्चबिशप हा इंग्रजांचा प्रमुख धर्माधिकारी ( Primate of English Church ) होय. पोपनें रोमहून ख्रिस्ती धर्माच्या प्रसारार्थ सेंट ऑगस्टाइन यास इंग्लंडला पाठविलें. त्यानें प्रथम कँटरबरींत कॅथिड्रल स्थापन केलें. ( इ. सन ५९७. ) हें चर्च पुढें भरभराटीस आलें. या चर्चवर पुढें पुष्कळच गंडांतरें आलीं. अनेकदां तें दुरुस्त करून बांधावें लागलें. प्रथम दहाव्या शतकांत डॅनिश लोकांनीं हल्ला करून हें चर्च उद्ध्वस्त केलें. सन १०६८ मध्यें त्याला आग लागून तें जाळण्यांत आलें. पण सन १०७० मध्यें लोकांनीं तें पुन्हा बांधलें. त्याच वर्षीं या चर्चमध्यें थॉमस बेकेट या आर्चबिशपचा खून झाला. त्याच्याविषयीं धर्मगुरूंना फार आदरभाव वाटे, म्हणून त्याचा खून झाल्यावर कँटरबरीकडे लोकांचे थवेच्या थवे येऊं लागले. जेथें त्याचा खून झाला ती जागा अजूनसुद्धां दाखवितात. लोक त्या जागीं भाविकपणानें येत. बाराव्या शतकापासून पंधराव्या शतकापर्यंत कँटरबरी हें ख्रिस्ती लोकांचें यात्रेचें ठिकाण बनलें. त्याच सुमारास कांहीं चमत्काराच्या अफवा उठल्या. जेथें सेंट थॉमसचा खून झाला त्या जागेला स्पर्श केल्यास लंगडा माणूस चांगला चालूं शकतो, आंधळा डोळस होतो, महारोगी खडखडीत बरा होतो, अशा स्वरूपाच्या बातम्या पसरल्या. त्यामुळें लोकांची तेथें ही गर्दी उसळली. चॉसर या प्रख्यात आंग्ल कवीनें ' कँटरबरी टेल्स ' या काव्यांत कँटरबरीचें महत्त्व वर्णिलें आहे. हा कवि १४ व्या शतकाच्या उत्तरार्धांत होऊन गेला. मध्ययुगांत सर्व देशांतील राजे-रजवाडे येथें भक्तिभावानें येत. तिसऱ्या एडवर्डचा मुलगा ब्लॅक प्रिन्स हा प्रसिद्ध लढवय्या सन १३७६ मध्यें वारल्यावर त्याला येथेंच पुरलें. त्याचें थडगें आम्हांस पहायला मिळालें. त्या

काळांत तर हें कॅथिड्रल इतकें भरभराटीस आलें कीं, त्याची इमारत मोठ्या प्रमाणांत वाढवावी लागली. इंग्लंडमधील पुष्कळशा कॅथिड्रलसना शिल्पकलेचे उत्कृष्ट नमुने म्हणून फार महत्त्व आहे. कँटरबरीच्या धार्मिक भावनेनें मला आकर्षित केलें नाहीं, पण तेथील शिल्पकला मात्र मला फार प्रेक्षणीय वाटली. एकेक खांब व त्यावरील कोरीव काम पाहून मन थक्क होतें. हें काम सन १४१० मधील आहे.

सोळाव्या शतकांत कँटरबरीस येणाऱ्या यात्रेकरूंचा ( पिल्ग्रिम्सचा ) लोंढा मंदावला. आठव्या हेन्रीनें बेकेट या धर्मगुरूचे अवशेष उद्ध्वस्त केले. सन १६४२ च्या यादवींत तर या कॅथिड्रलची खूपच नासधूस झाली. १६६० मध्यें पुन्हा कॅथिड्रलला महत्त्व आलें. १८३१ मध्यें दुरुस्ती होऊन त्याला आजचें सुंदर स्वरूप प्राप्त झालें. १९४२ च्या जूनमध्यें जर्मन लोकांनीं बॉम्बहल्ला करून तें उद्ध्वस्त करण्याचा अयशस्वी प्रयत्न केला.

या कॅथिड्रलच्या मध्यभागीं ' बेल हॅरी ' या नांवाचा उंच मनोरा आहे. तो मध्ययुगीन शिल्पकलेचा उत्तम नमुना म्हणून प्रेक्षणीय वाटला. मनोरा सुमारें २०० फूट उंच आहे. आम्ही वर जाऊन आलों. मनोऱ्यावरून सुंदर देखावा दिसतो.

धर्माच्या नांवाखालीं जी दांभिकता चालते त्याला कँटरबरी अपवाद नाहीं. कँटरबरीचें कॅथिड्रल चालविण्यास पैशाची आवश्यकता आहे हें मान्य आहे. तरीपण लोकांनीं खुशीनें दिलेला पैसा गोळा करून कॅथिड्रलची व्यवस्था चालविली असती तर येथील वातावरण पवित्र वाटलें असतें. बेल हॅरी टॉवरवर जायची एक ठराविक वेळ असते. ती म्हणजे दुपारीं दोनची. बरोबर एक वाटाड्या ( गाइड ) देतात. तो ऐतिहासिक माहिती समजावून सांगतो. " एका वेळीं सहा किंवा त्यापेक्षां जास्त लोक असतील तरच वर जाऊं देण्यांत येईल " अशी पाटी तेथें लावली होती. माणशीं एक शिलिंग द्यावा लागतो. दोन वाजतां त्या ठिकाणीं आम्ही चौघेच जमलों. सहा जणांची कांहीं भरती होईना. त्यामुळें टॉवरवर जाण्यास मिळेल असें वाटेना. शेवटीं धर्मोपदेशक ( प्रीस्ट ) होता त्यास आम्ही भेटलों. " आम्ही हिंदी विद्यार्थी मुद्दाम कॅथिड्रल बघण्यास आलों आहों. आम्हांस पुन्हा येतां येणार नाहीं. टॉवर पाहण्याची आमची खूप इच्छा आहे. तुम्ही आम्हांला वर जाऊं द्याल काय? " असें

आम्हीं त्यास विचारलें. त्यावर तो धर्मोपदेशक लगेच म्हणाला, "तुम्ही चौघेच आहां. फक्त चौघांसाठीं आमच्या माणसाला श्रम देऊन वर चढवायचें हें कांहीं जमणार नाहीं. केवळ चौघांसाठीं आम्ही हा उपद्व्याप करणार नाहीं." हें ऐकून आमचे चेहरे आंबट झाले. त्या धर्मोपदेशकाला आमची दया येईना. परदेशाहून एवढे विद्यार्थी आले आहेत, त्यांची निराशा करूं नये, असें कांहीं त्यास वाटेना. तो आपला सरळ निघून जाऊं लागला. तेवढ्यांत मला एक कल्पना सुचली. मीं त्याला परत विचारलें, " समजा, आम्ही चौघानीं मिळून चार शिलिंगांऐवजीं (प्रत्येकाचा एक शिलिंग) सहा शिलिंग दिले तर?" तें ऐकून तत्काळ त्याची चर्या बदलली. आपल्या माणसाला केवळ चौघांसाठीं श्रम द्यायचे नाहींत हें सारें तो विसरला. "मग जरूर!" असें तो म्हणाला. लगेच वाटाड्याला बोलावून त्यानें किल्ल्या मागविल्या. केवळ दोन शिलिंगां-साठीं त्यानें ही जी लाचार मनोवृत्ति दाखविली तिचा मला खूप राग आला. " सहा शिलिंगांचा हा प्रश्न नाहीं. आम्हांला सहा माणसें हवीं आहेत," असें त्यानें म्हटलें असतें तर तें मला जास्त आवडलें असतें. तेवढ्यांत सुदैवानें आणखी खूप लोक जमले. दहा मिनिटांतच आम्ही एकूण वीस-बावीस जण टॉवरवर जाण्यास तयार झालों. आमचा जादा दोन शिलिंगांचा भुर्दंडहि वांचला. त्यानंतरहि त्या धर्मोपदेशकाची मनोवृत्ति दिसून आली. मजजवळ सुटे पैसे नव्हते. एक पौंडाची नोट होती. ती मीं त्याला दिली व बाकीचे पैसे परत मागितले; तेव्हां तो म्हणाला, "छे! मजजवळ सुटे पैसे नाहींत. कँटरबरीच्या कॅथिड्रलमध्यें आम्ही काम करणार! पौंडाची चिल्लर बाळगण्या-इतके आम्ही कुठले श्रीमंत! आम्हांला पौंडाच्या नोटीचें दर्शनहि घडत नाहीं." —केवढी दांभिकता ही! विनय तर त्याच्याजवळ औषधापुरतादेखील नव्हता. आसपासच्या मंडळींपासून त्यानें शिलिंग-शिलिंग गोळा केला होता. तेच पैसे पौंडाच्यावर जमले असतील. मुकाट्यानें मीं दुसऱ्या एका गृहस्थाकडून मोड घेऊन धर्मोपदेशकाला पैसे दिले.

या कॅथिड्रलमध्यें अनेक गोष्टी पाहण्यासारख्या आहेत. येथें संगमरवरी दगडाचें एक सिंहासन आहे. त्याला 'सेंट ऑगस्टाइन्स चेअर' असें म्हणतात. प्रत्येक नवीन आर्चबिशपला त्यावर बसवून तो आर्चबिशप झाल्याचें जाहीर करतात.

कॅथिड्रलच्या भिंतींमध्यें ज्या खिडक्या आहेत त्यांना कांचेचीं तावदानें आहेत. त्या तावदानांवर बायबलमधील कांहीं प्रसंगांचीं चित्रें काढलेलीं आहेत. हीं तावदानें प्रेक्षणीय आहेत.

या कॅथिड्रलचें मुख्य वैशिष्ट्य म्हणजे त्याची ऐतिहासिक परंपरा. फार जुन्या काळांतलें कॅथिड्रल म्हणून त्याच्याशीं बरेच ऐतिहासिक प्रसंग निगडित आहेत. युद्धांत पडलेल्या कित्येक वीरांचीं थडगीं येथें आहेत. इंग्लंडच्या राजांपैकीं मात्र चौथा हेन्री व त्याची राणी यांचींच थडगीं येथें दिसलीं. बाकी सर्व राजांचीं थडगीं विंडसरच्या किल्ल्यांत आहेत.

यात्रेकरूंना राहण्यासाठीं कँटरबरी गांवांत पुष्कळ लहान लहान खानावळी उघडल्या होत्या. त्यांचे अवशेषहि दृष्टीस पडतात. गांवाच्या सभोंवतीं भिंत होती. आतां तिचे फक्त अवशेष उरले आहेत. या भिंतींत दिंड्या असत व त्यांमधूनच गांवांत प्रवेश करतां येई. त्यांपैकीं फक्त एक दिंडी ( Wert gate नांवाची ) आतां अस्तित्वांत आहे. त्या भिंतीच्या बाहेर एक खानावळ आहे. रात्रीच्या वेळीं त्या दिंडीचें दार बंद झाल्यावर कोणी यात्रेकरू आला तर तो त्या खानावळींत उतरे.

कँटरबरी हें गांव लहानसें आहे. वस्ती फक्त २४ हजार. बघण्यासारखें इतर कांहींच नाहीं, म्हणून संध्याकाळीं लगेच बसनें आम्ही लंडनला परत आलों व एका हॉटेलांत उतरलों. रात्रभर तेथें थांबून काल मँचेस्टरला आम्ही सर्व जण परत आलों.

ही छोटीशी सहल आम्हां सर्वांनाच फार मानवली. आतां प्रत्येक जण मोठ्या उल्हासानें आपापल्या अभ्यासाला लागला आहे.

यापुढचें पत्र थोडें उशिरांच पाठवीन. मी क्षेम आहें. काळजी करूं नये.

ती. नाना व सौ. आई यांना शि. सा. नमस्कार.

तुझा,

भाऊ.

* * *

पत्र १७ वें

## शुभमंगल झालें!

॥ श्री ॥

मँचेस्टर, दि. १९ मे, १९५२.

प्रिय उषास सप्रेम आशीर्वाद.

मध्यंतरीं एका **आंग्ल लग्नसमारंभास** उपस्थित राहण्याची मला संधि मिळाली, त्याची हकीकत आज लिहीत आहें.

मिसेस् क्रॉस यांच्याकडे माझ्याप्रमाणेंच राहत असलेले माझे इंग्रज मित्र श्री. वॉल्टर जेप्सन हे गृहस्थ विधुर होते. त्यांचें लग्न मिस् ॲथेल लिन्ड्सी यांच्याशीं जमलें होतें. हें लग्न नुकतेंच झालें. इंग्रज समाजांतील चालीरीतींचें मीं बारकाईनें निरीक्षण करून माहिती मिळवितों, हें त्यांना माहीत होतें. त्यामुळें त्यांनीं मला आपल्या लग्नाला आमंत्रण तर दिलें होतेंच; पण शिवाय लग्नसमारंभांत एक महत्त्वाची कामगिरी माझ्याकडे सोंपविली होती. त्यामुळें मला हा लग्नसोहळा फारच जवळून पाहतां आला.

इंग्रजी विवाहांत नवरा व नवरी यांच्याखालोखाल स्थान 'बेस्ट मॅन' व 'ब्राइड्स् मेड' यांचें असतें. आपल्याकडे नवऱ्या मुलीला जशी करवली असते तसेंच या दोन व्यक्ति 'करवला' व 'करवली' या स्वरूपांत काम करतात. हीं दोघें सतत नवरा व नवरी यांच्याजवळ असावीं लागतात. विशेषतः नवरा-नवरीस नैतिक धैर्य देणें किंवा कांहीं लागलें-सवरलें तर मदत करणें हीं कामें करवला व करवली यांना करावीं लागतात. हें करवल्याचें काम श्री. वॉल्टर यांनीं मजवर सोंपवलें होतें. लग्नप्रसंगीं नवऱ्यानें नवरीस आंगठी देण्याची इकडे पद्धत आहे. पण घाईघाईंत नवरा तें विसरतो किंवा खिशांतील आंगठी ऐन वेळीं त्याला सांपडतच नाहीं. म्हणून करवल्यानें आंगठी आपल्याजवळ ठेवायची व गरज लागेल तेव्हां ती काढून द्यायची, हें एक काम असतें.

इंग्रजी लग्न दोन प्रकारांनीं होऊं शकतें. एक म्हणजे नोंदणी (रजिस्टर) पद्धतीनें किंवा दुसरें चर्चमध्यें धार्मिक पद्धतीनें. नवरीच्या घरीं लग्न करण्याची आपल्यासारखी येथें पद्धत नाहीं. श्री. वॉल्टर यांचें लग्न चर्चमध्यें होणार होतें. लग्नाची वेळ दुपारीं तीन वाजतांची होती.

लग्नासाठीं विशिष्ट पोषाख असावयाची पूर्वी पद्धत होती; पण आतां ती रूढि गेली आहे. साधारण काळसर रंगाचा सूट असला म्हणजे चालतो. श्री. वॉल्टर यांनीं तसलाच एक नवीन सूट स्वतःकरितां शिवला होता. मी मात्र माझ्या आहे त्याच सुटावर भागविलें. श्री. वॉल्टरनीं लग्नाच्या दिवशीं सकाळीं फुलें आणलीं. गुलाबाचें एक एक सुंदर फूल कोटाच्या बटनहोलमध्यें आम्हीं अडकविलें. पुरुषानें फूल डाव्या बाजूस व स्त्रीनें उजव्या बाजूस अडकवायचें अशी इकडे पद्धत असते. लग्नामध्यें वा इतर प्रसंगींहि पुरुषांनीं हारतुरे हातांत घ्यायचे नसतात. ते बायकांनीं घ्यायचे व पुरुषांनी फक्त फूल बटनहोलमध्यें लावायचें.

ॲथेल ही ज्या गांवीं राहते त्या हिड्सफोर्थ येथें लग्न होतें. हें गांव मँचेस्टरपासून चौदा मैल दूर आहे. नवऱ्या मुलास घेऊन जाण्यासाठीं नवरीच्या घरून मोटार पाठवितात; त्याप्रमाणें आम्हांस नेण्यास दीड वाजतां मोटार येणार होती. येथून मी, वॉल्टर, मेरी व आमचा एक पोर्तुगीज मित्र असे चौघे लग्नास जाणार होतों. दीड वाजतां लंच आटोपून आम्ही तयार झालों. वॉल्टर इतके अधीर झाले होते कीं त्यांनीं लंच वगैरे घेतलीच नाहीं! एक कप चहा घेतला व आंगठी माझ्या स्वाधीन केली.

कपड्यांविषयीं सांगतांना एक गोष्ट विसरलोंच. लग्नप्रसंगीं वापरण्यासाठीं नवऱ्या मुलानें करवल्यास एक 'बो टाय' बक्षीस द्यायचा असतो. त्याप्रमाणें मला एक सुंदर टाय मिळाला. 'बो टाय' लावण्याचा माझा हा पहिलाच प्रसंग. मोटार वेळेवर आली. पावणेतीनला आम्ही चर्चमध्यें पोहोंचलों. चर्चच्या मुख्य हॉलमध्यें (याला 'नेव्ह' म्हणतात) लग्नासाठीं आलेली मंडळी बसली होती. वॉल्टरचे इतर नातेवाईक व मित्रमंडळी, ॲथेलचे आईसकट नातेवाईक व मित्रमंडळी होती. वॉल्टर व मी चर्चमध्यें आलों व आम्हांला पहिल्या रांगेंत बसविण्यांत आलें. चर्च हें प्रार्थनास्थान म्हणून गणण्यांत येतें. त्यामुळें चर्चमध्यें नेहमींच शांतता व गंभीर वातावरण असतें. इतके नातेवाईक व मित्रपरिवार जमलेला, पण कोणीहि एकमेकांशीं बोलत नव्हतें. विवाहाच्या वेळचें हें गंभीर वातावरण पाहून मला खूप आश्चर्य वाटलें.

तीनच्या सुमारास चर्चमध्यें ॲथेल आली. तिच्या डाव्या बाजूस हातांत हात घालून तिचा भाऊ होता. आपल्याकडे आईवडील कन्यादान



ॲथेल आणि वॉल्टर यांचा विवाह

वधूच्या मागें लिली विटर; तिच्या उजव्या हातास वसंत पाटणकर.

( चर्चमध्यें शपथविधि चालू असतांना घेतलेला फोटो )

करतात तद्वत् या विवाहांत नवरीचा कोणीतरी नातेवाईक अगर मित्र तिला नवऱ्यास देतो, अशी पद्धत आहे. त्याच माणसाबरोबर नवरी चर्चमध्यें येते. नवरीच्या पाठोपाठ करवली असतेच. नवरी चर्चमध्यें आल्यावर सर्व जण उभे राहतात. सर्व रांगांच्या पुढें नवरी उभी राहते. तिच्या शेजारींच नवरा जाऊन उभा राहतो. नवरीच्या मागें करवली व नवऱ्याच्या मागें करवला उभा असतो. नवरा–नवरी एकमेकांशेजारीं उभे. करवला-करवली त्यांच्यामागें शेजारीं-शेजारीं उभे. नंतर पाद्री येतो. सर्व जण उभे असतात. मग विवाहप्रसंगीं म्हणण्याचें स्तोत्र प्रेक्षकांसकट सर्व जण एका सुरांत म्हणतात. लग्नाची महती सांगणारें हें धार्मिक गीत असतें. नंतर पाद्री त्या गीताचा अर्थ समजावून सांगतो. त्यानंतर सर्व प्रेक्षक खालीं बसतात. मग पाद्री हा पतीला त्याचीं कर्तव्यें (पत्नीनिष्ठा, तिच्याशीं प्रेमानें वागणें, तिच्या आजारांत शुश्रूषा करणें इत्यादि) सांगतो. तसेंच नवरीला तिचीं पतिविषक कर्तव्यें सांगतो. मग तो दोघांना विचारतो, “ तुम्हांला एकमेकांशीं लग्न करण्याची इच्छा आहे का ? ” दोघें होकार देतात. पाद्री त्या दोघांचे हात आपल्या हातांत घेऊन ते एकमेकांस जोडतो. नंतर करवल्याकडे आंगठी मागतो. ती आंगठी बायबलवर ठेवायची. मग ती आंगठी पाद्री नवऱ्यास देतो. नवरा ती नवरीच्या हातांत घालतो. आणि मग “ देवासमक्ष ह्या दोघांचें लग्न झालें आहे. ह्यापुढें हीं दोघें पतिपत्नी म्हणून समजलीं जातील ” असें पाद्री सांगतो. शेवटीं एक धार्मिक गीत होतें.

ह्या साऱ्या वेळीं वातावरण अत्यंत गंभीर असतें. पाद्रीशिवाय कुणी अक्षरहि बोलत नाहीं. एकमेकांशीं एकनिष्ठ राहण्याची शपथहि नवरानवरी फार गांभीर्यानें घेतात. हा सारा प्रकार फक्त पंधरावीस मिनिटें चालतो. मग प्रेक्षक बसतात. नवरानवरी एकमेकांचे हात हातांत घालून पाद्याच्या मागोमाग चर्चच्या मागील खोलींत जातात. नवरानवरीच्या मागें करवला व करवली एकमेकांच्या हातात हात घालून त्या खोलींत जातात. तेथें गेल्यावर नोंदणीपुस्तकांत वॉल्टर व ॲथेल ह्यांनीं सह्या केल्यावर मीं व लिली विटर (ही करवली होती) ह्यांनीं साक्षीदार म्हणून सह्या केल्या.

येथपर्यंतचा कार्यक्रम मला फार आवडला. फक्त एक भाग ह्या समारंभांत मला आवडला नाहीं. अर्थात् इंग्रज समाजांतील वातावरण भिन्न

म्हणून वाईट म्हणतां येणार नाहीं; पण माझ्या पौर्वात्य संस्कारांत खासच तो बसत नव्हता. ह्या खोलींत गेल्यावर प्रथम वॉल्टरनें ॲथेलचें चुंबन घेतलें. अर्थात् तशी पद्धतच असते. त्यांत कांहीं विशेष नाहीं. परंतु त्यानंतर मान करवल्याचा असतो. करवल्यानें वधूवरांचें अभिनंदन करून नवरीचें चुंबन घ्यायचें अशी पद्धत आहे. मला ह्याची कल्पना होतीच; पण नुसतें हस्तादोलन करून मी मोकळा होणार होतों. परंतु ॲथेल मला दाद देणार होय? हस्तांदोलन केल्यावर क्षणभर ती थांबली आणि लगेच तिनें आपले ओठ माझ्या ओठांवर ठेवले—किती ओझरते आणि सेकंदभरसुद्धां नव्हे! पण त्यानंतर दहा मिनिटें जगांत काय घडामोडी चालल्या त्यांचा मला पत्ताच लागला नाहीं! माझ्यानंतर करवलीनें वधू आणि वर या दोघांचें चुंबन घेतलें. येथील लोकांच्या दृष्टीनें यांत खरोखरच वाईट असा कुठलाच भाग नसतो. एक रीतिरिवाज यापलीकडे कांहीं नाहीं. त्यानंतर नवरानवरी हातांत हात घालून व त्यांच्यामागें मी व करवली हातांत हात घालून चर्चमधून बाहेर मिरवणुकीनें आलों. बाहेर आल्यावर फोटो वगैरे झाले. मग समारंभास आलेली मंडळी चर्चबाहेर आली.

ह्यानंतर दोन फर्लांगांवर असलेल्या एका शाळेंत जेवणावळ होती. प्रथम मोटारींतून नवरानवरी त्या ठिकाणीं गेलीं. करवल्यानें सर्वांच्या शेवटीं जायचें व सर्व व्यवस्थित आहे हें पाहून चर्च सोडायचें. पण मी नवखा असल्यामुळें हीं सारीं कामें ॲथेलचा भाऊ करीत होता व म्हणूनच मी व करवली एका मोटारींतून जेवणावळीच्या जागीं गेलों.

आतां मात्र साऱ्या वातावरणांत एकदम बदल झाला. चर्चमधलें गंभीर वातावरण जाऊन लग्नाच्या मेजवानींतील आनंदी वातावरण निर्माण झालें. नवरानवरीची टिंगल व चेष्टा सुरू झाली. जेवणावळीच्या हॉलमध्यें नवरानवरी उभीं राहिलीं. लग्नसमारंभाला उपस्थित असलेले एकेक जण हॉलमध्यें येत होते. प्रत्येक जण वधूचें अभिनंदन करी व शुभाशीर्वाद देई; आणि वधूचें चुंबन घेतल्याशिवाय त्यांना शुभाशीर्वाद देतांच येत नसत. पुरुष-स्त्री प्रत्येक जण तें करीत. तसेंच वराचेंहि सर्व स्त्रिया—लहानमोठ्या, विवाहित, अविवाहित—अभिनंदन करीत व मग चुंबन घेत. फक्त पुरुष मंडळी वॉल्टरचें चुंबन घेत नसत. पुरुषानें पुरुषाचें चुंबन घेण्याची तेवढी पद्धत नाहीं.

खुद्द जेवणास सुरवात होण्यापूर्वी थोडा वेळ गप्पागोष्टी झाल्या. ह्या ठिकाणींसुद्धां करवला–करवली हीं मध्यवर्ती केंद्रें. जो तो आमच्याजवळ येई व आमच्या ओळखी करून घेई. विशेषतः मी परदेशीय म्हणून जो तो माझ्याजवळ येऊन आपल्याकडील लग्नसमारंभाविषयीं विचारी. शेवटीं तर नवरानवरीपेक्षां आमच्याजवळच इतकी गर्दी जमली कीं, ॲथेलची आई म्हणाली, " ॲथेल–वॉल्टरपेक्षां तुमच्या दोघांचाच लग्न-सोहळा आहे असेंच कुणाला वाटेल ! "—सारे जण खूप हंसले.

मग जेवणासाठीं सर्व जण खुर्चीवर बसले. मध्यभागीं वॉल्टर व ॲथेल. वॉल्टरच्या एका बाजूस मी; ॲथेलच्या एका बाजूस करवली बसली. नंतर लग्नासाठीं आलेले शुभसंदेश व तारा टाळयांच्या गजरांत मीं वाचून दाखविल्या. त्यानंतर मंडळी जेवायला बसली. गप्पा-विनोद होतां होतां तासाभरानें जेवण आटोपलें. एव्हांना पांच वाजले होते.

जेवणानंतर ' वेडिंग केक ' वधूवरांनीं मिळून कापायचा कार्यक्रम असतो. ' ख्रिसमस केक ' प्रमाणेंच हा भलामोठा केक असतो. सर्वजण टाळया वाजवतात. नंतर प्रत्येकास केकचा एक वडीएवढा लहान तुकडा व ग्लास-भर दारू दिली जाते. मी दारू घेत नाहीं हें ॲथेलला माहीत होतें. परंतु ह्या सुरापानांत करवल्याचें प्रमुख स्थान असल्यानें त्यानें दारू न पिणें वाईट दिसतें म्हणून ॲथेलनें दारूचा रंग असलेलें दुसरें रॉसबेरीप्रमाणें एक पेय मला ग्लासांत दिलें. दारू प्यायची व ' वधूवरांना भावी आयुष्य आरोग्यदायक जावो ' अशी शुभेच्छा व्यक्त करायची येथें पद्धत असते. त्यास ' टोस्ट प्रपोज करणें ' असें म्हणतात. सर्वांच्या वतीनें करवल्यानें एक छोटेंसें भाषण करून वधूवरांना शुभेच्छा द्यायच्या असतात. म्हणून दारू वांटल्यानंतर मीं माझें पेय पिण्यापूर्वी छोटेंसें भाषण केलें. विशेषतः मीं माझ्या मातृभाषेंत कांहीं शब्द बोलावे असें सर्वांनीं सांगितलें. माझें भाषण पुढीलप्रमाणें झालें :—

" प्रिय मित्र वॉल्टर व सौ. ॲथेल यांच्या मंगल विवाहास उपस्थित राहण्यास मला आनंद होत आहे. ह्या शुभप्रसंगीं त्यांना आयुरारोग्य, सुख व शांति लाभावी अशी प्रभूजवळ मी मनापासून इच्छा व्यक्त करतों. ॲथेल, अष्टपुत्रा सौभाग्यवती भव ! " याचें नंतर मीं इंग्रजींत भाषांतर करून सांगितलें. तें ऐकून सर्वांनीं खूप टाळया वाजविल्या व सर्व जण खूप हंसले.

नंतर जेप्सननीं सर्वांचे व माझे आभार मानले. मग सर्वांनीं उरलेला केक व दारू संपवली. माझी कामगिरी मीं उत्तम बजावली म्हणून वधूवरांनीं मला एक सुंदर पैशाचें पाकीट बक्षीस दिलें. करवली लिली हिला पॉवडरचा डबा मिळाला.

ह्या वेळेला ५॥ वाजले होते. पुढें तीन तास खेळ व नृत्य असा कार्यक्रम झाला. इंग्रजांच्या सामाजिक जीवनात या दोन्ही गोष्टींना महत्त्वाचें स्थान आहे. विशेषतः त्यांचे घरांतले खेळ असेच आहेत कीं, लहानांपासून थोरांपर्यंत सर्वांना त्यांत भाग घेतां येईल. आम्ही निरनिराळे खूप खेळ खेळलों, आणि पांच वर्षांच्या मुलांपासून पाऊणशें वर्षांच्या एका म्हातार्‍या बाईपर्यंत प्रत्येकानें खेळांत भाग घेतला. उत्साहानें सर्व जण त्यांत भाग घेतात तें पाहून आश्चर्य वाटलें. खेळ साधे. त्यांपैकीं कित्येक आपल्याकडे शाळेंत खेळतातहि, पण सामाजिक उत्सवाच्या प्रसंगीं सर्वांनीं एकत्र खेळ खेळण्याची पद्धत आपल्याकडे नाहीं, ती येथें दिसते. ह्या खेळांपैकीं बरेच खेळ मींच जिंकले. दर वेळेस चॉकोलेटचा एक पुडा मिळे व मग मी तें चॉकोलेट सर्वांना वांटीत असें.

तीच गोष्ट नृत्याची. आपल्याकडे स्त्रीपुरुषांनीं एकत्र नाचणें वाईट समजतात. पण इकडे नाचणें हा त्यांच्या सामाजिक जीवनाचा प्रमुख भाग आहे. अगदीं बारकाईनें बघितल्यास त्यांत वाईट भाग यत्किंचितहि नसतो. इकडील सारें सामाजिक जीवन इतकें भिन्न आहे कीं, त्यांत नाच हा वाईट भाग होत नाहीं. त्या प्रसंगीं करमणूक, मजा याशिवाय अन्य कोणताहि हेतु कोणाच्याहि मनांत नसतो.

ह्या लग्नप्रसंगीं पुरुष व स्त्रिया यांचें प्रमाण जवळजवळ १ : ३ असें होतें. त्यामुळें नाचायला पुरुष कमी; शिवाय मी करवला म्हणून माझें मध्यवर्ती स्थान होतें. त्यामुळें कांहीं स्त्रियांनीं मला विचारलें, "तुम्ही का नाहीं नाचत?" मीं म्हटलें, "मला नाचतां येत नाहीं." त्यावर त्या म्हणाल्या, "आम्ही शिकवितों. चला तर खरे!" मग त्यांनीं मला निरनिराळे नाच शिकविले.

साडेआठ वाजतां खेळ व नाच संपला. तीन ते साडेआठ असा फक्त साडेपांच तासांचा सारा कार्यक्रम होता. साडेआठ वाजतां नवरा–नवरी

मधुचंद्रासाठीं जाण्यास निघालीं. नऊच्या गाडीनें पन्नाससाठ मैलांवरील एका गांवीं तीं गेलीं व आम्ही घरोघर परतलों.

अशा रीतीनें मीं एक इंग्रजी लग्नसमारंभ अगदीं जवळून पाहिला. अत्यंत थोडे, पण तितकेच गंभीर असे धार्मिक विधि, छोटीशीच लग्नाची जेवणावळ, नंतर सामाजिक करमणुकीचे कार्यक्रम व पांचसाडेपांच तासांचा एकूण सर्व कार्यक्रम असें लग्नसमारंभाचें सुटसुटीत व व्यवस्थित स्वरूप मला पहायला मिळालें. अर्थात् मला या पद्धतीची आपल्या लग्नसमारंभाशीं तुलना करायची नाहीं. कारण दोन देशांतील परिस्थिति फारच भिन्न आहे. तरीपण इंग्रजी विवाहपद्धतीविषयीं माझें चांगलें मत मात्र निश्चित झालें.*

मँचेस्टर विद्यापीठांतील माझ्या दोन वर्षांच्या अभ्यासक्रमापैकीं एक वर्ष संपत आलें आहे. आम्हांला लवकरच जुलै, ऑगस्ट व सप्टेंबर अशी तीन महिने उन्हाळ्याची सुटी मिळणार आहे. या सुटीचा उपयोग करून युरोप-मध्यें महिनाभर हिंडून यावें असा माझा बेत आहे. माझ्या यापुढील पत्रांतून मी माझ्या युरोपच्या प्रवासाचीं वर्णनें तुला वेळोवेळीं पाठवीनच.

ती. नाना व सौ. आई यांना शि. सा. नमस्कार.

तुझा,
भाऊ

* * *

* हें पत्र 'स्त्री' मासिकाच्या जानेवारी १९५३ च्या अंकांत प्रथम प्रसिद्ध झालें होतें.


उत्तर युरोप
(प्रवासाचा मार्ग)
रेल्वे
जलप्रवास
नॉर्वे
स्वीडन
फिनलंड
सोव्हिएट रशिया
हेलसिंकी
बर्गेन
ऑस्लो
स्टॉकहोम
डेन्मार्क
न्यूकॅसल
मँचेस्टर
उत्तरसमुद्र
कोपनहेगन
इंग्लंड
हॅंबुर्ग
लंडन
ब्रुसेल्स
कॅले
पॅरिस
जर्मनी
पोलंड
फ्रान्स

## विभाग तिसरा

# उत्तर युरोपची सफर ( विविध अनुभव )

**पत्र १८ वें**

## प्रवासाची पूर्वतयारी

॥ श्री ॥

मँचेस्टर, दि. २१ जुलै, १९५२.

प्रिय उषास शुभाशीर्वाद.

तुझें दि. १८ जुलैचें पत्र पोंचलें. मध्यंतरीं मीं ती. नानांना खुशालीचीं दोन पत्रें पाठविलीं होतीं; तीं मिळाल्याचें तुझ्या पत्रावरून समजलें. येथील विवाह-समारंभाचें वर्णनपर पत्र मीं तुला पाठविलें होतें तें तुला अतिशय आवडलें हें वाचून आनंद झाला. उन्हाळ्याच्या सुटीपैकीं महिनाभराचा काळ **युरोपचा प्रवास** करण्यांत घालवावा ही माझी कल्पना मीं तुला त्याच पत्रांत कळविली होती. त्याप्रमाणें प्रवासाचा बेत मीं पक्का केला व प्रवासाच्या पूर्वतयारीला लागलों.

याच सुटींत प्रवासासाठीं निघण्याचें कारण असें कीं, या सुमारासच फिन्‌लंडमधील हेल्‌सिंकी येथें ऑलिम्पिक खेळ आहेत. हे खेळ पाहण्याची मला फार उत्कंठा आहे. ऑलिम्पिक खेळांची माहिती गोळा करण्यास मीं मार्चमध्यें सुरवात केली. येथें ‘ थॉमस् कुक ’ नांवाची एक कंपनी आहे. ही कंपनी लोकांच्या प्रवासाची व तदनुषंगिक सर्व गोष्टींची उत्तम सोय करते. त्या दृष्टीनें लागेल ती माहितीहि पुरविते. मी प्रथम थॉमस् कुक कंपनीच्या मँचेस्टर येथील शाखेंत गेलों व ऑलिम्पिक खेळांसंबंधीं कांहीं माहितिपत्रकें मिळविलीं. त्यांवरून कोणकोणत्या दिवशीं खेळ आहेत, तिकिटांचा दर काय आहे, राहण्याचा खर्च किती येतो वगैरे गोष्टींची मला चांगली कल्पना आली. पंधरा दिवस ऑलिम्पिक खेळ होते व सर्व दिवस तेथें राहण्यास फारच खर्च येत

होता. म्हणून पांच-सहा दिवस तेथें राहून कांहीं खेळांचे अंतिम सामने ( Finals ) पहायचे असा मीं विचार केला. अनायासें हेल्सिंकीला जात आहों तर नॉर्वे व स्वीडन हे देश पहावेत ; आणि येतांना डेन्मार्क, जर्मनी व हॉलंड या देशांतून परत यावें असें मीं ठरविलें. अर्थात् इटली, स्वित्झर्लंड आदि मुख्य देश यांतून वगळावे लागले. पण वेळ आणि पैसा यांची बचत करण्याच्या दृष्टीनें तसा निर्णय घ्यावा लागला. प्रत्येक देशांत चार-पांच दिवस मुक्काम करावा लागेल हें लक्षांत धरून मी थॉमस् कुक कंपनीच्या कचेरींत पुन्हा गेलों आणि प्रवासखर्च, हॉटेलांतील राहण्याची व्यवस्था व इतर सर्व सोयी करून तुम्ही माझा प्रवास आंखून द्याल काय, अशी विचारणा केली. त्यांनीं होकार देऊन किती खर्च पडेल तें आठ-दहा दिवसांत कळवूं असें मला सांगितलें.

त्याप्रमाणें एप्रिलच्या दुसऱ्या आठवड्यांत त्यांचें पत्र आलें. एकूण खर्च १६६ पौंड २ शिलींग पडेल असें त्यांचें म्हणणें पडलें. त्यांत—

( १ ) न्यू कॅसल–बर्गन हा बोटीचा प्रवास, बर्गन-ऑस्लो व ऑस्लो-स्टॉकहोम हा रेल्वेचा प्रवास, स्टॉकहोम–हेल्सिंकी व हेल्सिंकी–कोपेनहेगन हा बोटीचा प्रवास; आणि कोपेनहेगन–हॅंबुर्ग–आमस्टरडॅम–रॉटरडॅम–अॅंटवर्प–ब्रूसेल्स–लक्झेंबर्ग–पॅरिस–लंडन हा रेल्वेचा प्रवास,

( २ ) सर्व ठिकाणीं राहण्यास खोली, ब्रेकफस्ट, लंच व डिनर, स्टॉकहोम व पॅरिस येथें फक्त खोली व ब्रेकफस्ट आणि हेल्सिंकीला फक्त खोली,

( ३ ) हॉटेल–नोकरांना बक्षिसी ( टिप्स् ),

( ४ ) हेल्सिंकी व लक्झेंबर्ग हीं ठिकाणें सोडून इतरत्र सामान हॉटेलांत पोंहचविण्याची सोय,

( ५ ) प्रवासांतील जेवण,

या गोष्टींचा समावेश होता. शिवाय २३ जुलै ते २४ ऑगस्ट या काळांतील प्रत्येक दिवसाचा कार्यक्रम त्यांनीं आंखून दिला होता.

अर्थात् याशिवाय इतर खर्च माझा मला बराच करावा लागला असता. ऑलिम्पिक खेळांचीं तिकिटें, निरनिराळ्या ठिकाणीं प्रेक्षणीय स्थळें पाहण्याचा खर्च, कांहीं खरेदी, यासाठीं पैसा लागलाच असता. त्यामुळें थॉमस् कुकची योजना मान्य केली असती तर सर्व खर्च दोनशें पौंडांपर्यंत सहज गेला असता.

दुसरें असें कीं, त्यांनीं आंखून दिलेल्या कार्यक्रमांत मी बांधला गेलों असतों; मला स्वतःला मोकळेपणा राहिला नसता. एखाद्या ठिकाणीं कमी-जास्त वेळ थांबावें असें वाटलें तर तें शक्य झालें नसतें. तिसरा तोटा म्हणजे हॉटेलांत राहावें लागलें असतें. त्यामुळें इतरांशीं संबंध आला नसता. प्रवासांत कांहीं नवीन गोष्टी पाहणें हा माझा हेतु होताच. पण त्याबरोबरच त्या देशांतील लोकांशीं संबंध येऊन गप्पा मारतां आल्या असत्या तर तें मला हवें होतें. विशेषतः विद्यार्थ्यांचीं वसतिगृहें, युवक-वसतिगृहें ( Youth Hostels ), अगर खाजगी कुटुंबें यांतून राहतां आलें तर समवयस्क लोकांशीं संबंध येतो, नव्या ओळखी होतात व नवी माहिती मिळते. या सर्व गोष्टी लक्षांत घेऊन मीं थॉमस् कुकची योजना फेटाळून लावली व त्यांना तसें कळविलें. मात्र त्यांनीं आंखून दिलेला कार्यक्रम मला आवडला होता व त्यानुसार पण स्वतःच सर्व गोष्टी ठरवून युरोपची सफर करण्याचें मीं ठरविलें.

'थॉमस् कुक' मार्फत तिकिटें काढतां येतात. या प्रवासास तिकिटांचा खर्च किती येईल हें मीं त्यांना विचारलें. तिकिटें मूळच्याच दरांत थॉमस् कुककडून मिळतात. रेल्वे कंपनीकडून त्यांना सवलत मिळते. सर्व प्रवासास ४० पौंड खर्च येईल असें त्यांनीं मला सांगितलें. अर्थात् प्रवासखर्चांत बचत करणें शक्य नाहीं म्हणून तिकिटांची व्यवस्था करण्यास मीं थॉमस् कुकला सांगितलें व तें काम त्यांचे मार्फत उत्तम झालें. निरनिराळ्या देशांतील तिकिटें, बोटीवरचें रिझर्व्हेशन, वगैरे भानगडी मला खूप त्रासदायक झाल्या असत्या. विशेषतः सर्व रेल्वे कंपन्यांच्या कचेऱ्या लंडनला आहेत व मी राहतों मँचेस्टरला. त्यामुळें लंडनला स्वतः जाऊन मला त्या गोष्टी कराव्या लागल्या असत्या. पण या योजनेमुळें माझा त्रास वांचला व घरबसल्या त्याच दरांत कुककडून तिकिटें मिळालीं. विशेषतः बोटीचीं तिकिटें खूप आधीं काढावीं लागतात. हेल्सिंकीला ऑलिम्पिक्सची गर्दी म्हणून तर विशेष गरज. म्हणून मुळींच वेळ न दवडतां एप्रिलच्या अखेरीस बोटीचीं तिकिटें रिझर्व्ह करण्यास मीं थॉमस् कुक्‌ला सांगितलें. शिवाय दोन पौंड अनामत ( डिपॉझिट ) ठेवले कीं झालें. बोटींच्या तिकिटांचे पैसे आगाऊ द्यावे लागत नाहींत. सर्व पैसे ऐनवेळीं निघण्यापूर्वी दिले तरी चालतें. बरें, कांहीं कारणानें जातां आलें नाहीं तर तिकिट रद्द करतां येतें. १५ मेस मला कुकनें कळविलें कीं, तुमचीं

तिकिटें रिझर्व्ह झालीं आहेत. त्यामुळें जिवास स्वस्थता आली. आगगाडीचीं तिकिटें आधीं काढावीं लागत नाहींत. गाड्यांना गर्दी मुळींच नसते; आयत्या वेळीं गेलें तरी चालतें. ज्या गाड्यांना रिझर्व्हेशन लागतें त्यांची सोय येथून होत नाहीं. त्या गांवीं जाऊन रिझर्व्हेशन करावें लागतें.

आगगाडीचीं तिकिटें मी निघण्यापूर्वीं तीनचार दिवस आधींच थॉमस् कुक कंपनीनें काढलीं. ज्या दिवशीं तिकिटें काढलीं त्या दिवसाची तारीख त्या तिकिटांवर मारतात. त्या तारखेनंतर दोन महिनेपर्यंत कोणत्याहि दिवशीं कोणत्याहि गाडीला तीं तिकिटें वापरण्याची सवलत असते. प्रत्येक देशाचें एकच तिकिट मिळतें; म्हणजे असें कीं, मी बर्गनहून ऑस्लोला जाणार; तेथें राहून पुढें ऑस्लोहून स्टॉकहोमला जाणार; परंतु माझें तिकिट बर्गन ते चॉर्लटनबर्ग ( स्वीडन व नॉर्वे यांच्या सरहद्दीवरचें गांव ) असें आहे व ऑस्लोमार्गें दुसरें तिकिट चॉर्लटनबर्ग ते स्टॉकहोम असें आहे. असें प्रत्येक देशाचें एक तिकिट मिळतें. शिवाय हा प्रवास करतांना आपण अर्धेमधें कुठेंहि कितीहि वेळां उतरलों तरी चालतें. हॉलंडमध्यें तर आमस्टरडॅम, रॉटरडॅम, हेग इ० अनेक ठिकाणीं मी उतरणार आहें. परंतु तिकिट एकच—जर्मन सरहद्दी-पासून बेल्जियम सरहद्दीपर्यंतचें—आहे. ही झाली तिकिटांची सोय.

त्यानंतर दुसरी गोष्ट पैशाची. इंग्लंडमधून परदेशीं किती पैसें न्यायचे यावर बंधन असतें. इंग्रज मनुष्यास इंग्लंडच्या बाहेर पंचवीस पौंडांपेक्षां जास्त रक्कम नेतां येत नाहीं. पण हिंदी माणसाला हा नियम लागू नसून त्यानें लंडनमधील भारताच्या हायकमिशनरकडे पैशाची मागणी करावी लागते. म्हणून मीं हायकमिशनरच्या कचेरींत पासपोर्ट पाठविला व " मला एक महिन्याचा प्रवास अमुक अमुक देशांतून करायचा आहे व त्यासाठीं दीडशें पौंड हवे आहेत " अशी मागणी केली. हायकमिशनरकडून हे सर्व पैसे मान्य झाले नाहींत. मला फक्त शंभर पौंड खर्च करण्याची परवानगी मिळाली. त्यांनीं मला एक चलन बदलण्याचा परवाना ( एक्स्चेंज परमिट ) दिला. " शंभर पौंडांपर्यंत अमुक अमुक देशांचें चलन ( करन्सी ) देण्यास हरकत नाहीं " असें त्या परवान्यावर लिहिलें आहे. मात्र या पैशांत प्रवासखर्च जमा नसतो. जर इंग्लंडमध्यें तिकिटें काढलीं तर पौंडांमध्यें ते पैसे देतां येतात. त्यामुळें तिकिटांचे चाळीस पौंड, ऑलिम्पिक खेळांचे पांच पौंड इ० पैसे वजा

करून निव्वळ युरोपमध्यें खर्च करण्यासाठीं मला शंभर पौंड मिळाले आहेत. अर्थात् मला तेवढासुद्धां खच यणार नाहीं.

त्यानंतर हें एक्स्चेंज परमिट घेऊन थॉमस् कुकच्या कचेरींत गेलों. इंग्लंडच्या बाहेर पांच पौंडांपेक्षां जास्त चलन नेतां येत नाहीं म्हणून ही रक्कम ट्रॅव्हलर्स चेकमध्यें नेणें भाग पडलें. पांच पौंडांचे कांहीं व दोन पौंडांचे कांहीं असे शंभर पौंडांचे कुकचे ट्रॅव्हलर्स चेक्स घेतले. युरोपांतील बँका, स्टेशनवरील एक्स्चेंज ऑफिसेस इ० सर्व ठिकाणीं हे पौंडांचे चेक दिले कीं त्याबद्दल त्या त्या देशाचें चलन मिळतें. अर्थात् एखाद्या ठिकाणीं रात्रीं पोंचलों व त्या वेळीं बँक अगर एक्सचेंज ऑफिस बंद असेल तर अडूं नये म्हणून प्रत्येक देशाचें एक पौंड किंमतीचें चलन मीं थॉमस् कुककडून मँचेस्टरलाच घेतलें. त्यामुळें कोठेंहि उतरल्यावर अडचण पडणार नाहीं.

कोणत्या देशांत कसें व किती चलन न्यायचें यावर बंधनें आहेत. इंग्लंडमध्यें ५ पौंडांच्या वर चलन आणतां येत नाहीं व ५ पौंडांपेक्षां जास्त चलन इंग्लंडबाहेर नेतां येत नाहीं. डेन्मार्कमध्यें १०० क्रोनर ( म्हणजे ५ पौंड ) चें चलन नेतां येतें. जर्मनीस १०० मार्क्स ( म्हणजे १० पौंड ) नेतां येतात. नॉर्वेंत २०० क्रोनर ( १० पौंड ), तर स्वीडनमध्यें १०० क्रोनर नेतां येतात.

त्यानंतर पुढचा प्रश्न व्हिसा मिळविण्याबद्दलचा. प्रत्येक देशांत प्रवेश करण्यासाठीं त्या देशाची परवानगी लागते. त्यालाच व्हिसा म्हणतात. हा व्हिसा पासपोर्टवरच शिक्का मारून दिला जातो. सर्व देशांच्या वकिलाती (Consulates) लंडनला आहेत. तेथें योग्य ती फी भरल्यास व्हिसा मिळतो. पण त्यासाठीं एक तर स्वतः लंडनला जावें लागतें अगर थॉमस् कुकमार्फत, स्वतः न जातां, व्यवस्था होऊं शकते. स्वतः लंडनला जायचें म्हणजे कांहीं दिवस राहण्याचा व जाण्यायेण्याचा खर्च होतो. कुकमार्फत हें काम करावें तर प्रत्येक व्हिसा मिळवून देण्यासाठीं ते दहा शिलिंग घेतात. परंतु तरीहि त्यांच्यामार्फत व्हिसा घेणें स्वस्त पडत होतें; म्हणून मीं १ जुलैस त्यांना पासपोर्ट दिला व व्हिसा मिळविण्यास सांगितलें. मला वाटलें, २२ दिवस व्हिसा मिळविण्यास सहज पुरतील. हॉलंडच्या वकिलातीची शाखा मँचेस्टरला आहे.

तेव्हां तेवढा व्हिसा मीं स्वतः मिळविण्याचें ठरविलें. त्यासाठीं विनाकारण १० शिलिंग कां खर्च करा, असा मीं विचार केला. इतर सर्व देशांचे व्हिसा आले म्हणजे इथल्या इथें हॉलंडचा व्हिसा आपण घेऊं असा मीं विचार केला. मी निघणार होतों २२ जुलैला. दि. २३ ला न्यू कॅसलहून बर्गनला जाण्यासाठीं बोट होती. पण थॉमस् कुककडून इतर देशांचे व्हिसा दि. २१ ला मिळाले. २२ ला मँचेस्टर सोडायचें. सामानाची आवराआवर चालू होती. सुटीपर्यंतचा अभ्यास पुरा करणें, इतर कांहीं खरेदी करणें वगैरे कामांची ही गर्दी उडाली होती. त्यांत हॉलंडचा व्हिसा राहिलेला. दुपारीं तीन वाजतां हॉलंडच्या वकिलातींत गेलों तर ते म्हणाले, "आम्हांला लंडनच्या आमच्या मुख्य कचेरींतून परवानगी आल्याशिवाय व्हिसा देतां येत नाहीं. आज २१ जुलै. आजच आम्ही लंडनला लिहूं. २२ ला आमचें पत्र लंडनला पोंचेल. तेथून त्यांनीं उलट टपालीं उत्तर पाठविलें तरी दिनांक २३ शिवाय व्हिसा मिळणें अवघड." —मी सर्दच झालों! मला दिनांक २२ ला मँचेस्टर सोडायचें होतें. आतां काय करावें ! शेवटीं त्यांनाच एक कल्पना सुचली. ते म्हणाले, "आम्ही लंडनला आतां लगेच फोन करतों. त्याचा ५॥ शिलिंग खर्च तुम्ही देत असाल तर लगेच काम होईल." मीं होकार दिला. इंग्लंड-मध्यें टेलिफोनची व्यवस्था फार चांगली आहे. लगेच कनेक्शन मिळालें. लंडनहून होकार आला व साडेतीनच्या आंत माझा हॉलंडचा व्हिसा तयार झाला.

त्यानंतर राहण्याची व्यवस्था. हॉटेलांत राहणें महाग ; शिवाय इतरांशीं संबंध येण्याच्या दृष्टीनें तें तितकेंसें सोइस्कर नाहीं. म्हणून अगदीं नाइलाज झाला तरच हॉटेलांत राहायचें असें मीं ठरविलें होतें. 'वाय्. एम्. सी. ए.' प्रमाणें अनेक संस्था युरोपभर आहेत व पुष्कळसे विद्यार्थी तेथें राहतात हें मला माहीत होतें. म्हणून लंडनच्या वाय्. एम्. सी. ए. ला पत्र पाठवून सर्व ठिकाणच्या वाय्. एम्. सी. ए. चे पत्ते मीं मिळाविले. त्याशिवाय विद्या-पीठांचीं वसतिगृहें असतात. उन्हाळ्याच्या सुटींत तीं रिकामीं असून त्यांत प्रवासी–विद्यार्थींची राहण्याची सोय होऊं शकते. मीं लंडनच्या 'नॅशनल युनियन ऑफ स्टूडन्ट्स' ला पत्र लिहिलें व युरोपांतील सर्व देशांतील अशा वसतिगृहांचे पत्ते मिळविले. शिवाय मँचेस्टरला गेल्या वर्षांत अनेक परदेशीय

विद्यार्थ्यांचा संबंध आला. त्यांच्यातर्फे कांहीं कुटुंबांशीं परिचय झाला. अशा कुटुंबांत थोड्या खर्चांत राहतां येतें. माझ्या सर्व प्रवासांत मीं या तिहींपैकीं कोणत्या ना कोणत्या व्यवस्थेचा राहण्यासाठीं उपयोग करणार आहें. त्यामुळें खर्च थोडा येईल. शिवाय अनेक नव्या ओळखी होतील. प्रत्येक गांवीं जाण्यापूर्वी तेथील तीनचार पत्ते मजजवळ आहेत. शिवाय 'टूरिस्ट इन्फर्मेशन ब्यूरो' प्रत्येक ठिकाणीं असतात. त्यांच्याकडे गेल्यास राहण्याचीं स्वस्त व सोईचीं ठिकाणें ते सांगतात. त्यामुळें एखाद्या गांवीं आपण अगदीं एकदम गेलों तरीहि सोय होते. उगीच मोठाल्या हॉटेलांत आधीं बुकिंग करून ठेवण्याची गरज पडत नाहीं. अर्थात् वेळप्रसंग आल्यास हॉटेलांत राहून जास्त पैसे देण्याची तयारी ठेवावी; पण सहसा असा प्रसंग येत नाहीं.

त्यापुढची गोष्ट सामानाची. पांच एक आठवड्यांचा प्रवास आहे. म्हणून साबू, ब्लेड्स, कंगवे, सुई, दोरा इ० अनेक बारीक सारीक वस्तु प्रवासांत लागतील त्या घेतल्या. प्रवासांत शक्य तेवढा कमी खर्च करायचा म्हणून या सर्व वस्तु आधींच खरेदी केल्या. कपडेहि भरपूर घ्यावे लागले. कारण प्रत्येक ठिकाणीं दोन-तीन दिवसच मुक्काम पडेल व त्यामुळें परटाकडे कपडे धुण्यास देतां येणार नाहींत याची कल्पना आहे. हे कपडे मळले कीं बदलायचे. ते सर्व लंडनला आल्यावरच धुईन. अर्थात् त्यामुळें सामानाचें ओझें फार झालें. त्यासाठीं एकापेक्षां एक लहान अशा दोन छोट्या व हलक्या बॅग्ज् मीं विकत घेतल्या. दोन हातांत दोन लहान बॅग्ज् नेणें सुटसुटीत वाटतें. स्टेशनवर उतरल्यावर एक बॅग क्लोकरूममध्यें ठेवायची व दुसरी लहान बॅग आपल्याबरोबर न्यायची. गांवांत लागेल तेंच सामान मोठ्या बॅगमधून छोट्या बॅगेंत भरायचें व नको तें सामान दुसऱ्या बॅगमध्यें स्टेशनवर क्लोकरूममध्यें ठेवायचें, त्यामुळें सामानाची अडचण कोठेंच भासणार नाहीं. शिवाय दोन लहान बॅग्ज् पाहून कस्टमचे अधिकारी बहुधा तपासणी न करतांच जाऊं देतात. त्याऐवजीं एकच मोठी बॅग असली तर त्यांना जास्त संशय येतो. या दोन बॅग्ज्शिवाय रेनकोट बरोबर घ्यावा लागतो. त्यामुळें दोन हात व तीन जिनसा अशी कांहीं वेळां स्थिति होते. पण पाऊस पडत नसला तरी रेनकोट अंगांत घालण्याची इकडे पद्धत आहे. त्यामुळें रेनकोटाची अडचण वाटत नाहीं.

उद्या सकाळीं मी येथून न्यूकॅसलला जाणार आहें. तेथून पुढें नॉर्वे-मधील बर्गन या शहरांत जाणार आहें. बर्गनला दोन दिवस मुक्काम करण्याचा मानस आहे. पुढील पत्र मी बर्गनहूनच पाठवीन.

मी येथें क्षेम आहें. प्रवासांत वेळोवेळीं पत्र पाठवून खुशाली कळवीन. माझी कसलीहि काळजी करूं नये.

हेच पत्रीं ती. नाना व सौ. आई यांना शिरसाष्टांग नमस्कार.

तुझा,
भाऊ

* * *

पत्र १९ वें

## बर्गनमधील वास्तव्य

॥ श्री ॥

बर्गन ( नॉर्वे ), दि. २५ जुलै, १९५२.

प्रिय उषा,

माझें मँचेस्टरहून पाठविलेलें पत्र मिळालें असेलच. त्यांत कळविल्या-प्रमाणें मीं मंगळवार दि. २२ जुलै रोजीं सकाळीं साडेदहा वाजतां मिसेस् क्रॉस यांचा निरोप घेऊन घर सोडलें. ११-२८ ला मँचेस्टरहून न्यूकॅसलला जाणारी गाडी पकडली व दुपारीं ४-३५ ला न्यूकॅसलला पोंचलों. सामान स्टेशनवर टाकून एका छोट्याशा हॉटेलांत उतरलों. ती संध्याकाळ न्यूकॅसल पाहण्यांत घालविली. टाइन नदीवरील सुरेख पूल पहायला मिळाला. उरलेला वेळ टाऊन मूर पार्कमध्यें काढला.

बुधवारची सकाळ **न्यूकॅसल**मध्यें भटकण्यांत घालविली. न्यूकॅसल गांवाहून पंधरा मैलांवर ' टाइन कमिशन क्वे ' आहे. तेथें जाण्यास बोट-ट्रेन दुपारीं अडीचला सुटली व आम्ही साडेतीनला धक्क्यावर पोंचलों. चार वाजतां बोट सुटणार होती. बोटीचें नांव ' व्हीनस '. ही बोट सात हजार टनी असून

बर्गन–न्यूकॅसल मार्गावरील एक उत्कृष्ट बोट म्हणून तिची ख्याति आहे. गेल्या युद्धांत नॉर्वे काबीज केल्यावर जर्मन लोकांनीं या बोटीचा उपयोग केला. युद्धांत हॅंबुर्ग बंदरांत अमेरिकन लोकांनीं बॉम्बहल्ला केल्यामुळें ही बोट पाण्यांत बुडाली; पण युद्धसमाप्तीनंतर ती वर काढण्यांत आली व दुरुस्त करून पुन्हां वापरण्यास सुरुवात झाली. अशा इतिहासप्रसिद्ध बोटीनें प्रवास करण्याची संधि मला मिळाली. सुखसोयींच्या दृष्टीनें ही बोट फारच छान आहे.

चार वाजतां बोट सुटल्यावर बोटीवर प्रथम चहा झाला. चहाच्या टेबलावर एक मुलगी बसली होती. तिचें नांव सूल्व्हा. ती नॉर्वेजियन होती व सुटींत इंग्लंडमध्यें भटकण्यास आली होती. प्रवास संपवून ती नॉर्वेस परत चालली होती. तिनें सर्व प्रवास सायकलीवरून केला होता व नॉर्वेत पोंचल्यावरहि बर्गन–ऑस्लो हा डोंगराळ प्रदेशांतील प्रवाससुद्धां सायकलीवरून करण्याचा तिचा मानस होता. चहा पितांना गप्पा मारतां मारतां तिनें ही सर्व हकिकत सांगितली.

संध्याकाळीं सहापर्यंत बोटीच्या डेकवर आमच्या गप्पा झाल्या. पुढें मात्र बोट हलूं लागली. हवा उत्तम होती, पण उत्तर समुद्र ( नॉर्थ सी ) थोडा खवळलेला होता, त्यामुळें मला त्रास होऊं लागला. दुपारचा चहासुद्धां पचला नाहीं. त्यामुळें मला केबिनमध्यें परतणें भाग पडलें.

गुरुवार दि. २४ ला दुपारीं बाराच्या सुमारास **नॉर्वेचा** किनारा लांबवर दिसूं लागला. नॉर्वेचें पहिलें दर्शन म्हणजे सूर्यप्रकाशांत चकाकणारे उंच उंच डोंगर. बोट किनाऱ्याजवळ येऊं लागल्यावर तिचें हलणें कमी होऊं लागलें व डेकवरून फारच रमणीय शोभा दिसूं लागली. नॉर्वेचा किनारा फारच सुंदर असल्याचें भूगोलांत वाचलें होतें, त्याची प्रचीति बंदरांत पाऊल टाकण्यापूर्वींच आली. खूप वळसे घेत घेत, डोंगरांच्या रांगांतील अरुंद खाडींतून किती तरी वेळ बोट चालली होती. असें वाटे कीं, हा डोंगर संपला कीं बर्गन बंदर दिसूं लागेल. पण छे! कोळ्यानें एका धाग्यामागें दुसरा धागा तोंडांतून काढावा, दुसऱ्यानंतर तिसरा निघावा; त्याप्रमाणें डोंगरामागें डोंगर दिसत होते. नॉर्वेचा किनारा फार दंतुर आहे. नॉर्वेची दक्षिणोत्तर लांबी सुमारें ११०० मैल आहे तर पूर्व–पश्चिम रुंदी जास्तींत जास्त २७० मैल व उत्तर टोंकास कमींत कमी ४ मैल आहे.



नॉर्वे-फिओर्ड

नॉर्वेची ख्याति फिओर्ड्स ( Fiords ) साठीं आहे. फिओर्ड म्हणजे दोन उंच डोंगरराशींत समुद्राचें पाणी घुसून निर्माण झालेली खाडी. समुद्राचें पाणी संपलें कीं किनाऱ्यालगतची सखल जमीन नाहींच तर एकदम हजार-पांचशें फूट उंच असा पर्वताचा कडा दिसतो. दोन्ही बाजूंस उंच उंच

पर्वत आणि मध्यें समुद्राचें पाणी. त्या फिओर्डमधून आमची बोट मार्ग कापीत चालली होती. देखावा मोठा सुंदर दिसत होता. अडीचच्या सुमारास बर्गन बंदर दिसूं लागलें; व अवघ्या पांच मिनिटांत बोट धक्क्याला लागली. अधिकाऱ्यांनीं बोटीवरच आमच्या पासपोर्टांत आम्ही नॉर्वेंत प्रवेश केल्याचा शिक्का मारला व आमच्याजवळ किती पैसे आहेत हें विचारलें.

गुरुवारचा दिवस **बर्गन**मध्यें थांबून तें शहर पाहावें असा माझा बेत होता. एव्हांना माझी सूल्व्हाशीं चांगलीच जानपछान झाली होती. "शहरांत कुठेंहि आपली राहण्याची सोय होईल, आपण तेथेंच सामान टाकूं व मग दोघेंहि शहर पाहायला जाऊं" असें ती म्हणाली. मलाहि तेंच हवें होतें. एखाद्या शहरांत एकटें हिंडण्यापेक्षां त्या देशांतील कोणी माहितगार व्यक्ति बरोबर असेल तर खूप नवीन गोष्टी कळतात.

आम्हीं बोटीवरून नॉर्वेच्या किनाऱ्यावर पाऊल टाकलें. समुद्र-प्रवासाच्या शीणानंतर जमिनीवर पाऊल टाकल्यावर खूप बरें वाटलें. कस्टमची तपासणी झाली; पण बॅग्ज उघडाव्या लागल्या नाहींत. "कांहीं करपात्र वस्तु आहेत काय?" असें त्यांनीं विचारलें. पण "कांहीं नाहीं" असें आम्हीं म्हटल्यावर त्यांनीं आम्हांस जाऊं दिलें. सूल्व्हाजवळ सायकल होती. त्या सायकलीवर माझें सामान टाकून आम्ही निघालों. बंदरापासून शहराचा मध्यवर्ती भाग पांच-सहा फर्लांग दूर आहे. सहज चालत जाण्यासारखें हें अंतर आहे.

नॉर्वेंत पाऊल टाकल्यावर डोळ्यांत भरण्यासारख्या दोन नवीन गोष्टी आढळल्या. एक म्हणजे रस्त्याच्या उजवीकडून रहदारी. सर्व वाहनें रस्त्याच्या उजव्या बाजूनें जात होतीं. ही अशी वाहतूक इंग्लंड व स्वीडन यांखेरीज युरोपांतील सर्व देशांत आढळते. सुरवातीला या उजव्या बाजूच्या रहदारीनें खूप गोंधळ उडतो. रस्ता ओलांडतांना आपण सुरक्षित आहों असें वाटून चालावें तर फटकन् एखादी मोटार विरुद्ध दिशेनें चाटून जाते. मोठमोठ्या चौकांत तर फारच गोंधळ उडतो. या उलट्या रहदारीमुळें बस-स्टॉप व ट्रॅम-स्टॉप यांच्या बाबतींतहि गोंधळ होतो. एखाद्या दिशेस जायचें म्हणून इंग्लंडमधील नेहमींच्या सरावाप्रमाणें बस-स्टॉपवर उभें राहावें तर नेमकी विरुद्ध दिशेला जाणारी बस येते. मग चूक ध्यानांत येते व रस्ता ओलांडून समोरच्या

स्टॉपकडे जावें लागतें. हा गोंधळ फक्त सुरवातीचे दोन दिवसच झाला. पुढें डोळ्यांना या रहदारीची चांगली संवय होते.

दुसरी गोष्ट म्हणजे येथें मैल व पौंड या गोष्टी विसराव्या लागल्या. बर्गन बंदरांतून बाहेर पडल्यावर पाटी दिसली—शहराचा मध्यभाग १ किलो-मीटर अंतरावर आहे. सर्वत्र किलोमीटर हेंच लांबी मोजण्याचें साधन. रेल्वेचीं अंतरें किलोमीटरांत. गांवाची समुद्रसपाटीपासून उंची मीटर्समध्येंच. हें माप युरोपांत सर्वत्र आढळतें. १ किलोमीटर म्हणजे सुमारें दोन-तृतीयांश मैल असें कोष्टक ध्यानांत ठेवलें कीं काम भागतें. ( खरें म्हणजे १ किलोमीटर म्हणजे पांच-अष्टमांश मैल. ) तसेंच मीटर म्हणजे सुमारें यार्ड. ( खरें म्हणजे ३९ इंच. ) तीच गोष्ट वजनांची. द्राक्षें वा इतर फळें शेरावर अगर पौंडावर नाहींत–किलोग्राम्सवर तीं मिळतात. १ किलोग्राम म्हणजे सुमारें १ शेर.

बर्गन शहराच्या मध्यवर्ती भागांत पोंचल्यावर सूल्व्हा व मी प्रथम टूरिस्ट इन्फर्मेशन ऑफिसमध्यें गेलों. ह्या कचेरीस टी. टी. के. ( Turist Trafik Komitee ) असें नॉर्वेजियन भाषेंत म्हणतात. ही कचेरी दिवसां सकाळीं नऊ ते सायंकाळीं सहापर्यंत ' बेनेट्स ट्रॅव्हल् ब्यूरो, ८ ओ / सी बुल् ग्रॅन् ' येथें असते ; आणि सायंकाळीं सहा ते रात्रीं बारापर्यंत ' टॉव्हॅल मेन्सिग ' या भररस्त्यावर असते. या कचेरींत ' ॲकॉमोडेशन ऑफिस ' म्हणून भाग असतो. कोणी नवखा माणूस तेथें गेल्यास त्याला सर्व माहिती पुरविली जाते. बर्गन शहराचा नकाशा, बघण्यासारख्या गोष्टी इ० चीं माहितीपत्रकें मिळतात. तसेंच राहण्याची सोय थोड्या खर्चांत कुठें होईल त्याचीहि माहिती सांगतात. तेथें गेल्यावर त्यांनीं आम्हांला बायबल स्कूलच्या वसतिगृहांत तुमची राहण्याची सोय होऊं शकेल असें सांगितलें. उन्हाळ्याची सुटी असल्यामुळें हें वसतिगृह रिकामें होतें. तें स्टेशनपासून जवळ असल्यानें सोईस्कर होतें. आम्हीं बायबल स्कूलला फोन केला व राहण्याची व्यवस्था होईल का म्हणून विचारलें. त्यांचें होकारार्थी उत्तर आल्यावर आम्ही दोघें तिकडे जाण्यास निघालों. पांच मिनिटांत तेथें पोंचलों. एका खोलींत सामान टाकलें. तोंडबिंड धुतलें, कपडे बदलले व बर्गन शहर पाहण्यास निघालों.

बर्गन शहराच्या पश्चिमेस समुद्र व इतर सर्व बाजूंस उंच उंच पर्वतराशी दिसतात. सर्व नॉर्वे देशच उंच डोंगरांनीं व्यापला गेला आहे. या पर्वतांमुळें

बर्गेन शहराचा इतर देशाशीं क्वचितच संबंध येई. त्यामुळें या शहरास स्वतःचेंच असें एक नवीन स्वरूप प्राप्त झालें आहे. बर्गनची लोकसंख्या सुमारें दीड लक्ष असून ऑस्लोच्या खालोखाल हेंच शहर प्रसिद्ध आहे. येथील लोक दर्यावर्दी म्हणून प्रसिद्ध आहेत. येथें व्यापार व नौकायन या गोष्टी चांगल्या चालतात. शहराचा इतिहास नऊशें वर्षांइतका जुना असल्यानें येथें जुन्या इमारती, जुनीं चर्चेस बरींच दिसतात. नॉर्वेच्या इतिहासांतील अनेक प्रमुख व्यक्ति बर्गनमध्यें होऊन गेल्या. नॉर्वेचा सुप्रसिद्ध कवि लुडविग हॉल्बर्ग याचा जन्म अडीचशें वर्षांपूर्वी येथेंच झाला. अर्वाचीन नॉर्वेजियन चित्रकलेचा प्रणेता प्राध्यापक आय्. सी. डाल हा बर्गनचाच. प्रसिद्ध वीणावादनकार उले बुल हा आपलें व्हायोलिन घेऊन जग जिंकायला निघाला तो बर्गनहूनच; आणि एद्वार्द ग्रीगनें उत्कृष्ट संगीत बर्गनलाच रचिलें. बर्गेन शहराची स्थापना उलाव किर्रे या राजानें १०७० सालीं केली व तेव्हांपासून एक प्रसिद्ध बंदर म्हणून त्याची ख्याति आहे.

सकाळपासून पोटांत कांहीं अन्न नव्हतें म्हणून आम्ही दोघं प्रथम एका हॉटेलांत गेलों. खास नॉर्वेजियन अन्न खाण्याची माझी ही पहिलीच वेळ. सूल्व्हानेंच उत्तम पदार्थांची निवड केली; व नॉर्वेजियन अन्नाची तिनें मला विविध माहितीहि सांगितली.

इंग्लंडमध्यें अन्न घेण्याच्या वेळा म्हणजे सकाळीं आठ–साडेआठला न्याहारी, अकरा वाजतां कॉफी, एक वाजतां लंच, चार वाजतां चहा, सहा वाजतां डिनर आणि रात्रीं झोंपण्यापूर्वी सपर. पण नॉर्वेंत जेवणाच्या वेळा वेगळ्या आहेत. इंग्लंडच्या न्याहारीच्या मानानें येथील न्याहारी छोटीशीच असते. पाव व लोणी यांना नॉर्वेजियन भाषेंत 'स्मरब्रड' म्हणतात. नॉर्वेंत लंच घेण्याची पद्धत सहसा नाहींच. 'स्मरब्रड' घरून निघतांना बरोबर घेऊन नोकरपेशाची मंडळी ती कचेरींत मधल्या वेळीं कॉफीबरोबर खातात. हीच त्यांची लंच. चार वाजतां कचेऱ्या सुटतात. त्यानंतर नॉर्वेजियन लोकांचें मुख्य जेवण असतें. त्यास ते 'मिड्डॅग' असें म्हणतात. हें जेवण चमचमीत व भरपूर असतें. मच्छी, मांस, बटाटे, निरनिराळ्या भाज्या इ० असतात. त्यानंतर रात्रीं निजण्यापूर्वी पुन्हां एकदां 'स्मरब्रड'. अशा रीतीनें नॉर्वेंत स्मरब्रडलाच प्राधान्य असतें. येथें कॉफी हेंच मुख्य पेय आहे. मात्र मला

नॉर्वेजियन कॉफी फार कडक वाटली. चहा येथें क्वचितच आणि तोहि सौम्य घेतात. चहा करण्याची त्यांची पद्धत चमत्कारिक आहे. इंग्लंडमध्यें किटलींतल्या उकळत्या पाण्यांत चहाची पूड टाकतात. आवश्यक तेवढा कडक किंवा सौम्य चहा करतां येतो. परंतु नॉर्वेत चहाची भुकटी एका बंद कागदी पिशवींत टाकतात व ती पिशवी उकळत्या पाण्यांत सोडतात. त्यामुळें ती पिशवी पाण्यांत कितीहि वेळ असली तरी चहा कडक होणें शक्यच नाहीं. उलट पाणी थंड होऊन जातें व चहाची सारी चव जाते. तसेंच चहांत दूध घालायचीहि पद्धत नाहीं. मात्र येथें दूध चांगलें व स्वस्त मिळतें. उत्तम ग्लासभर दूध तीन पेन्सला मिळे. तर चहा-कॉफीला आठ-दहा पेन्स पडत. म्हणून मीं नॉर्वेत दूधच प्यायचें ठरविलें. निरनिराळया फळांचे रस पिण्याची येथें पद्धत आहे. या रसांना नॉर्वेजियन भाषेंत सॅफ्ट ( Saft ) असें म्हणतात. जेवणाबरोबर एखादा ग्लास बिअर घेण्याची येथें पद्धत आहे. हॉटेलांत आम्हांला भरपूर, स्वच्छ व चवदार अन्न मिळालें; पण महाग फार. इंग्लंडमधल्या लंचला दोघांना आठ-नऊ शिलिंग पडले असते. पण येथें पंधरा शिलिंग द्यावे लागले. नंतर आम्ही हिंडायला बाहेर पडलों. बर्गनमधील बघण्यासारखी प्रमुख गोष्ट म्हणजे फ्लोयन. सात डोंगरांनीं वेढलेल्या या शहराच्या उत्तरेस फ्लोजेलेट या नांवाचा एक डोंगर आहे. त्याच्या उच्च शिखरास फ्लोयन हें नांव असून त्याची उंची १०५० फूट आहे. त्या शिखरावर जाण्यास एक तारेवर चालणारी (Funicular) रेल्वे आहे. फ्लोयनवरून बर्गन शहर, समुद्र, फिओर्ड यांचा नयनरम्य देखावा दिसतो. मला तर तेथेंच थांबावें असें वाटलें.

येथें बर्गनहस नांवाचा किल्ला असून त्याच्या आसपास जुन्या काळचीं घरें दिसतात. या किल्लयांत ' हाकॉन शॅलेन ' हा एक हॉल आहे. तो तेराव्या शतकांत बांधलेला आहे. ' रोझेंक्रॅन्ट्झ टॉवर ' हा किल्लयाचा प्रमुख मनोरा १५६२–६७ या सालांतील आहे. या दोन्ही इमारती दुसऱ्या महायुद्धांत मोडकळीस आल्या. आतां त्यांची पूर्वीच्या पद्धतीवर परत बांधणी चालू आहे. किल्लयाच्या आसपास जीं जुन्या काळचीं घरें आहेत, त्यांची १७०२ सालच्या आगींत नासधूस झाली होती. पण आतां तीं पूर्वपद्धतीवरच पुन्हा बांधलीं आहेत. नॉर्वेजियन मध्ययुगीन शिल्पकलेचे नमुने म्हणून या घरांना महत्त्व आहे. कांहीं इमारतींत म्यूझियम्स आहेत. मार्गदर्शक म्हणून ज्या मुली तेथें

काम करतात त्यांचे पोषाखहि जुन्या काळासारखे ठेवले आहेत. त्यामुळें मध्य-युगीन नॉर्वे कसा असेल याची कल्पना आली.

बर्गन शहरांत ऐतिहासिक, सांस्कृतिक, चित्रकलात्मक वगैरे अनेक म्यूझियम्स आहेत. शिवाय नॉर्वेची हस्तकौशल्याच्या वस्तूंबद्दल ख्याति आहे. त्यांचे नमुने एका प्रदर्शनांत ठेवले आहेत. पण संध्याकाळ झाल्यामुळें आम्हांस ते पाहतां आले नाहींत.

बर्गन शहरांत अनेक प्रार्थनामंदिरें ( चर्चेस ) आहेत. मेरीचें चर्च हें सर्वांत जुनें बाराव्या शतकांतील प्रार्थनामंदिर आहे. नॉर्वेच्या इतिहासांत जे प्रसिद्ध पुरुष होऊन गेले त्यांचे पुतळे व स्मारकें रस्त्यांतून दिसतात. या सर्वांतून नॉर्वेजियन लोकांच्या शिल्पकलेचें चातुर्य दिसून येतें.

हें सर्व पाहतां पाहतां रात्रीचे साडेदहा झाले. आम्ही दमलों होतों. एका हॉटेलांत जाऊन दूध व पाव यांचा समाचार घेतला व होस्टेलवर आलों. पाऊस सतत होता. छत्री ही बर्गन शहराची खूण आहे. सारखा पाऊस असतो. खोलींत आल्यावर सूल्हानें मला नॉर्वेविषयीं खूप मनोरंजक माहिती सांगितली. ती माहिती मला पुढच्या प्रवासांत फार उपयोगी पडली.

राष्ट्रीय दृष्टया नॉर्वे हा एक देश असला तरी भौगोलिक दृष्टीनें तो एक आहे असें म्हणतां येणार नाहीं. उंच उंच पर्वतांमुळें सर्व भागांत दळण-वळणाचीं साधनें नाहींत. म्हणूनच एवढा विस्तृत देश असूनहि लोकसंख्या अवघी बत्तीस लाख आहे. सन १८०० च्या आसपास ८० टक्के लोक शेती करीत असत. पण सन १९३० नंतर औद्योगीकरण सुरू झालें. सध्यां शेती व उद्योगधंदे यांत प्रत्येकीं तीस टक्के लोक आहेत. दहा टक्के लोक जहाजांवर आहेत. सात टक्के मच्छीमारी करतात व दहा-बारा टक्के व्यापारांत आहेत.

येथील राज्यसंस्था लोकशाही पद्धतीची आहे. राज्यशासन राजामार्फत चालतें. पण इंग्लंडप्रमाणेंच नॉर्वेचा राजा कॅबिनेट ( रिक्सरॅड ) मार्फत कारभार हांकतो. हें कॅबिनेट पार्लमेंट ( स्टॉर्टिंग ) मधील बहुमतवाल्या पक्षाचें बनविलेलें असतें. पार्लमेंटांत दीडशें सदस्य आहेत. इंग्लंडप्रमाणें दोन सभा नसून एकच सभा आहे. पण राज्यकारभाराच्या सोईसाठीं तिचे दोन भाग केले आहेत. एक ऑडेलस्टिंग व दुसरा लॅग्टिंग. पार्लमेंटच्या या दोन्ही भागांतील सदस्य चार वर्षांच्या मुदतीनें निवडून आलेले असतात. राजावर नॉर्वेजियन

लोकांचें अतोनात प्रेम असतें. धार्मिक दृष्ट्या जवळजवळ ९६ टक्के लोक 'इव्हॅंजेलिकल ल्यूथर्न स्टेट चर्च' चे पुरस्कर्ते आहेत. राजा हा धर्माचा प्रमुख असून 'मिनिस्ट्री ऑफ चर्च अँड एज्युकेशन' चे मार्फत चर्चचे कारभार चालतात. प्रार्थनामंदिरांना सरकारांतून मदत मिळते. धर्माला राजकारणांत महत्त्व असून 'ख्रिश्चन पीपल्स पार्टी' ही संस्था पार्लमेंटमध्यें आहे.

डॅनिश वर्चस्वाचा पगडा नॉर्वेजियन संस्कृतीवर स्पष्ट दिसतो. कोपेन-हेगन हें कला व ज्ञान यांचें माहेरघर समजून अनेक सुशिक्षित लोक तेथें जाऊन विद्यार्जन करीत, आणि त्या द्वारां युरोपियन संस्कृतीचे संस्कार नॉर्वेंत आढळतात. परंतु खेडेगांवांतून मात्र ह्या संस्कृतीचा पगडा दिसत नाहीं. तेथें जुन्या काळच्या रूढि, पोषाख, शिल्पकला ह्यांचे अवशेष दिसतात. शहरांतून युरोपीय कलांचा प्रादुर्भाव तर खेडेगांवांत जुन्या काळच्या संगीत, नाच आदि कला आढळतात. त्यामुळें नॉर्वेंत शहरें व खेडीं यांतील फरक जाणवतो. ह्या दोहोंचें एकीकरण करून त्यांतून नॉर्वेजियन संस्कृति निर्माण करण्याचे प्रयत्न चालू आहेत.

विशेषतः भाषेच्या बाबतींत ही भिन्नता स्पष्ट दिसते. नॉर्वेंत दोन मुख्य भाषा आहेत. भारतांत अनेक भाषा असल्यानें एका देशांत दोन भाषा हें आपल्याला तितकेंसें चमत्कारिक वाटणार नाहीं. पण बत्तीस लक्ष लोकांतहि दोन भाषा सारख्याच प्रचलित असाव्या हें खरोखरच विलक्षण आहे. त्याचें कारणहि स्पष्ट आहे. ज्यांचा डॅनिश संस्कृतीशीं जास्त संबंध आला त्यांची 'बूकमोल' ही भाषा आहे. या भाषेंत डॅनिश शब्दांचा भरणा असून शहरांतील सुशिक्षित लोकांची ही भाषा आहे. खेड्यांतील लोकांच्या तोंडीं जी 'निनोस्कं' भाषा आहे तिजवर नॉर्वेजियन संस्कृतीची छाप अधिक आहे. दोन भाषांतील झगडा बरेच दिवस चालला होता. आतां मात्र त्यांत समझौता झाला आहे. प्रत्येक गांवच्या लोकल कौन्सिलनें (ग्राम-पंचायतीनें) आपल्या गांवांत कोणत्या भाषेचा वापर व्हावा हें ठरवायचें व त्या गांवापुरती ती भाषा दरबारी भाषा समजली जावी असा रिवाज आहे. या दोन्ही भाषा एकत्र करून त्यांतून एक राष्ट्रीय भाषा बनविण्याचे यत्न चालू आहेत. पण त्यास अनेक पिढ्या जाव्या लागतील. येथें इंग्रजी मात्र बहुतेकांना समजतें. त्यामुळें परस्थ माणसांची कसलीच अडचण होत नाहीं.

—वरील सर्व माहिती मूल्व्हा मोठ्या उत्साहानें सांगत होती. आपल्या देशाची आपुलकीनें चौकशी करणारा मजसारखा विद्यार्थी भेटला याचा तिला खूप आनंद झाला होता. स्वतःच्या देशाचें व स्वजनांच्या जीवनाचें तिनें जें सूक्ष्म निरीक्षण केलें होतें त्याचा प्रत्यय तिच्या बोलण्यांतून येत होता.

आज (शुक्रवारीं) सकाळीं सव्वा सहाला उठलों. न्याहारी वगैरे आटोपून तुला हें पत्र लिहायला घेतलें. आतां साडेनऊच्या गाडीनें मी येथून ऑस्लोला जाणार आहें. तेथें मी दोन दिवस थांबणार आहें. पुढील पत्र ऑस्लोहूनच पाठवीन.

ती. नाना व सौ. आई यांना शि. सा. नमस्कार.

तुझा,
**भाऊ**

* * *

**पत्र २० वें**

# ऑस्लो

॥ श्री ॥

ऑस्लो ( नॉर्वे ), दि. २७ जुलै, १९५२.

प्रिय उपास सप्रेम आशीर्वाद.

शुक्रवार दि. २५ ला सकाळीं मीं बर्गन सोडलें व नॉर्वेची राजधानी **ऑस्लो** या शहरीं जाणाऱ्या आगगाडींत बसलों. आतांपर्यंत मीं आगगाडीनें केलेल्या प्रवासांपैकीं जे थोडे प्रवास अतिशय आनंददायक झाले त्यांत बर्गन ते ऑस्लो या प्रवासाची निश्चित गणना करावी लागेल. बर्गन–ऑस्लो हें अंतर अडीचशें मैल असून सुमारें बारा तासांचा हा प्रवास आहे. पण एक क्षणहि कंटाळवाणा वाटला नाहीं.

—आणि याचें मुख्य कारण म्हणजे गाडींतील सुखसोयी. तिसऱ्या वर्गांतील उतारूंसाठीं इतक्या सोयी केलेल्या पाहून आश्चर्य वाटलें. प्रत्येक

सीट स्वतंत्र होती. प्रत्येक सीटवर गाद्या व त्यांवर पांढरे शुभ्र अभ्रे होते. सीट मागें ढकलून आरामखुर्चीप्रमाणें तिचा उपयोग करतां येत असे. त्यामुळें बारा तास सतत बसूनहि पाठ दुखायची भीति नव्हती. तिकिटाचें रिझर्व्हेशन करून आपली जागा आधींच नक्की करणें हें ह्या गाडींत शक्य असतें. रिझर्व्हेशनला मुळींच आकार पडत नाहीं. आपलें तिकिट दाखविलें कीं आपली जागा दाखविणारें तिकिट आपल्याला फुकट मिळतें. माझ्या सर्व प्रवासांत रिझर्व्हेशनला पैसे पडले नाहींत असें हें एकच ठिकाण होय. डब्यांत दूर-ध्वनिक्षेपक (लाउड स्पीकर) होता. कुठलेंहि स्टेशन येण्यापूर्वी त्यावरून सूचना दिली जाई. प्लॅटफॉर्म कोणत्या बाजूस आहे हें सांगितलें जाई. गाडी किती थांबणार याची सूचना देत. दीड-दोन तासांनीं एखादें स्टेशन आलें कीं गाडी दहापंधरा मिनिटें थांबे. त्या वेळीं उतारू खालीं उतरून रेस्टॉरंटमध्यें जाऊन कांहीं खाऊंपिऊं शकत. गाडी सुटण्यापूर्वी प्लॅटफॉर्मवर सूचना मिळे कीं, आतां गाडी सुटणार आहे, तरी सर्व उतारूंनीं आपापल्या डब्यांत जावें. एवढेंच नव्हे तर गाडी चालू असतांना एखादी महत्त्वाची गोष्ट बाहेरच्या बाजूस आली तर तीहि लाउडस्पीकरवर सांगत. समुद्रसपाटीहून आपण किती फूट उंच आलों हेंहि अधूनमधून सांगत.

गाडींत बऱ्याच सोयी केल्या होत्या. डब्यांत उष्णता वाढविणें अगर कमी करणें यासाठीं सोय होती. जाळीच्या खिडक्याहि होत्या. अर्थात् या सोयी युरोपांत प्रत्येक गाडींत असतात. डब्याला लागून शेजारच्या खोलींत प्रसाधनाची (टॉयलेट्ची) व्यवस्था होती. डब्यांत दोन दिवे होते; एक हिरवा व एक तांबडा. हिरवा दिवा लागला तर प्रसाधनाची खोली रिकामी आहे असें समजावें. तांबडा दिवा लागला तर कोणी तरी आंत आहे असें समजावें. त्या खोलीला आंतून कडी लागली कीं तांबडा दिवा आपोआप लागे. कडी काढली कीं हिरवा दिवा आपोआप लागे. अशी स्वयंचलित (ऑटोमॅटिक्) व्यवस्था होती.

गाडीनें बर्गन सोडल्यावर रमणीय सृष्टिसौंदर्य दिसूं लागलें. बर्गनपासून कित्येक मैल आंत समुद्राचें पाणी घुसलें आहे. त्यामुळें निर्माण झालेले फिओर्ड स्पष्ट दिसतात. एकीकडे समुद्राचें पाणी, दुसरीकडे उंच पर्वत आणि त्या निमुळत्या वाटेनें आगगाडी मार्ग आक्रमीत आहे अशीं किती तरी दृश्यें

दिसतात. कित्येक ठिकाणीं पर्वत भेदून बोगदे काढले आहेत. अशा फिओर्ड-मधला प्रवास दीड-दोन तास चालला होता. त्यानंतर पर्वतशिखरांचा एक एक टप्पा गांठीत गाडी वर चढूं लागली. शेवटीं फिन्स या ठिकाणीं गाडी ४२६५ फूट वर चढली. हें नॉर्वेंतील सर्वांत उंच रेल्वेस्टेशन. आसपास वस्ती दिसत नव्हती. दिवस उन्हाळयाचे होते तरी बर्फाच्छादित शिखरें पाहावयास मिळालीं. ऑस्लोला पोंचेपर्यंत समुद्रसपाटी लागत नाहीं. मनुष्य-वस्ती तुरळक दिसते. फक्त फर नांवाच्या झाडांचीं दाट जंगलें आढळतात. गवताचीं कुरणें किंवा त्यांवर चरणाऱ्या गाई अजीबात दिसत नाहींत. नॉर्वेला निसर्गसंपत्तीची (लांकडाची) मोठी देणगी मिळाली आहे. ऑस्लोच्या पश्चिमेस कांहीं मैल नद्यांतून लांकडाचे ओंडके तरंगतांना दिसतात. जंगलांतील झाडें कापून त्यांचे ओंडके नदींत टाकतात व ते पाण्याबरोबर वाहत वाहत कारखान्यापर्यंत पोंचतात. यामुळें वाहतुकीचा प्रश्न सुटला आहे. समुद्र-किनाऱ्यावरील वाहतूक बोटींतून चालते.

ऑस्लोच्या आधीं एक तास अनेक सरोवरें लागतात. आसपासच्या फरच्या व बर्चच्या झाडांचीं प्रतिबिंबें त्यांत स्पष्ट दिसतात. अशा रीतीनें माझा हा प्रवास मोठ्या मजेंत झाला. सायंकाळीं सातच्या सुमारास ऑस्लोच्या ईस्ट रेल्वे स्टेशनांत आमची गाडी शिरली. मी माझ्या नियोजित हॉटेलांत आलों. ही सोय मीं आधींच ठरविली होती. ऑस्लोला ' के. एफ्. यू. एम्. ' ही ' वाय्. एम्. सी. ए. ' सारखी संस्था आहे. मीं तिच्या व्यवस्थापकांना पत्र पाठवून संस्थेच्या वसतिगृहांत माझी राहण्याची सोय होईल काय अशी विचारणा केली होती. त्यांनीं मला उत्तर पाठवून, आमचें वसतिगृह नाहीं, पण आमच्या संस्थेच्या इमारतींत एक चांगलें व स्वस्त हॉटेल आहे असें कळविलें. त्या हॉटेलांत मी उतरलों, जेवण घेतलें. थोड्या सावकाशीनें गरम पाण्यानें स्नान केलें. हें सर्व होतां होतां रात्रीचे साडेनऊ वाजले व मी क्षणार्धांत झोंपीं गेलों. शनिवार दि. २६ ला ऑस्लो शहर पाहण्यास बाहेर पडलों. ऑस्लो ही नार्वेची राजधानी. पण हें शहर लहानच वाटतें. मात्र येथील चारपांच इमारती पाहण्यासारख्या आहेत.

(१) **राजवाडा**—शहराच्या मध्यभागांत एका लहान टेंकडीवर एक मोठा बगीचा असून त्या बगीच्याचे मध्यभागीं राजवाडा आहे.

लोकांना प्रत्यक्ष राजवाड्यांत जाण्यास परवानगी नसली तरी आसपासच्या बगीच्यांत हिंडतां येतें. राजवाड्यासमोर किंग कार्ल जोहन याचा घोड्यावर बसलेला पुतळा आहे. बगिच्यांत तीन पुतळे आहेत. एक नील्स हेन्रिक आबेल या प्रसिद्ध गणितज्ञाचा, दुसरा कॅमिला कॉलेट या नॉर्वेजियन लेखिकेचा आणि तिसरा रिकार्द नूर्दराकचा. या रिकार्दनें नॉर्वेचें राष्ट्रगीत रचिलें. हे तिन्ही पुतळे गुस्टाव्ह व्हिग्लंड यानें तयार केले. राजवाडा १८४८ सालीं लिन्स्टाव याच्या मार्गदर्शनाखालीं बांधला आहे.

(२) **नोबेल इन्स्टिटयूट**—बिन्नेचाल्के याच्या मार्गदर्शनाखालीं ही इमारत १८६७ सालीं बांधली आहे. १९०५ सालीं नोबेल इन्स्टिटयूटची मुख्य कचेरी येथें थाटण्यांत आली. नोबेल शांतता पारितोषिक ( नोबेल पीस प्राइझ् ) कोणाला द्यायचें हें 'नोबेल कमिटी ऑफ दि नॉर्वेजियन पार्लमेंट' ठरविते व तें पारितोषिक या इमारतींत देतात. आंतरराष्ट्रीय कायदा, राज्यशास्त्र व इतिहास या विषयांवरील पुस्तकांचें एक भव्य ग्रंथालय या इमारतींत असून तिच्या प्रवेशद्वारासमोर गुस्टाव्ह व्हिग्लंड यानें तयार केलेला आल्फ्रेड नोबेल याचा पुतळा आहे.

(३) **ऑस्लो टाउन हॉल**—या इमारतीला तेरा मजले आहेत. ती बाहेरून तर आकर्षक आहेच, पण आंतूनहि प्रेक्षणीय आहे. ऑस्लो बंदराच्या मुखावर ती बांधली आहे. त्यामुळें आस्लोंत समुद्रमार्गें प्रवेश करणारांस लांबवरून प्रथम तिचें दर्शन होतें. या इमारतीच्या बांधणीची योजना १९१५ सालापासून चालू होती. १९३१ मध्यें पायाभरणी झाली. मध्यंतरीं युद्धकाळांत बांधकाम स्थगित होतें. पण युद्धानंतर परत तें जोरांत सुरू होऊन १९५० सालीं ही इमारत पुरी झाली. नॉर्वेजियन कलाकौशल्याचें रम्यमधुर स्वरूप या इमारतींत पाहायला मिळतें. इमारतीस लागलेलें सामान नॉर्वेजियन ठेवण्याची पराकाष्ठा करण्यांत आली आहे. शिल्पकला या दृष्टीनें आंतील भाग उत्कृष्ट आहे. सर्व राष्ट्रानें एकवटून सारे प्रयत्न करून जणूं आपला आत्माच या इमारतींत ओतला आहे असें वाटतें. आंत बहुतेक सर्वत्र संगमरवरी दगड वापरला आहे. ही इमारत बांधण्यास साडेतीनशें लक्ष क्रोनर म्हणजे सुमारें पावणेतीन लक्ष रुपये एवढा प्रचंड खर्च आला. इमारतीच्या बाहेर एक मोठा चौक असून त्यांत कारंजीं खेळविलीं आहेत.

बाहेरील दर्शनी बाजूस एक प्रचंड घड्याळ आहे. युरोपांतील सर्वांत मोठें घड्याळ म्हणून त्याची कीर्ति आहे. त्याच्या बाहेरील तबकडीचा व्यास २५ फूट आहे. मिनिट-कांटा १५ फुटांहून जास्त लांब आहे. रात्रीच्या वेळीं या घड्याळावर प्रकाश पाडतात. त्यायोगें कित्येक मैल दूर समुद्रांतून हें घड्याळ दिसूं शकतें.

ऑस्लो शहराचें कामकाज या टाउन हॉलमध्यें चालतें. या इमारतीची सजावट अजून पुरी झाली नाहीं. अनेक नॉर्वेजियन कल्पक ह्या इमारतींत सुधारणा करण्यांत गुंतले आहेत.

(४) **स्की म्यूझियम**—नॉर्वेंत उंच डोंगरावर बर्फ बराच काळ असतें. विशेषतः हिवाळ्यांत तर सर्व देशच बर्फमय असतो. बर्फावरच्या स्केटिंगला येथें स्कीइंग ( किंवा शीइंग ) असें म्हणतात. बर्फावरून घसरत जाण्याचा हा खेळ येथें सर्वांचा आवडता आहे. ऑस्लोजवळ ' हॉलमेन कॉलेन ' या नांवाचें एक ठिकाण आहे. तेथें हा खेळ खेळण्याची सोय आहे. स्कीइंग करण्यासाठीं जी उडी मारतात तिला ' टेक ऑफ् ' ( Take off ) असें म्हणतात. टेक ऑफ् घेण्याचा मनोरा व उडी मारतांना कोठें घसरत जायचें ती जागा मला पाहायला मिळाली. जवळच एक ' स्की म्यूझियम ' आहे. स्कीइंगसाठीं लागणारीं सर्व साधनें तेथें आहेत. निरनिराळ्या देशांत स्केटिंगसाठीं कोण-कोणतीं साधनें वापरतात त्यांचें हें मोठें छान प्रदर्शन आहे. नान्सेन व आमुंडसेन हे नॉर्वेचे प्रसिद्ध दर्यावर्दी खलाशी होत. त्यांनीं अनुक्रमें उत्तर व दक्षिण ध्रुवांवर जाऊन येण्याची धडपड केली. त्या वेळीं त्यांनीं जें सामान आपल्याबरोबर नेलें होतें त्याची प्रदर्शनात्मक मांडणी येथें केली आहे.

(५) **फ्रॅम**—ध्रुवांवरील स्वाऱ्यांच्या वेळीं एक जहाज ( पोलर एक्स्प्लोरेशन शिप ) वापरण्यांत आलें होतें. त्याचें नांव फ्रॅम. उत्तर व दक्षिण ध्रुवांपर्यंत पोंचण्यासाठीं मानवानें जे प्रयत्न केले त्यांत नॉर्वेचा फार मोठा वांटा आहे. नान्सेननें उत्तर ध्रुवावर पोंचण्याचा प्रयत्न केला तर आमुंडसेन दक्षिण ध्रुवावर जाऊन आला. नान्सेननें सन १८९३-९६ त प्रयत्न केले. आमुंडसेन १९११ सालीं दक्षिण ध्रुवापर्यंत मजल मारून आला. या दोन्ही वेळीं फ्रॅम हें जहाज वापरण्यांत आलें होतें. तें बर्फाचा मारा सहन करूं शकेल इतकें भक्कम बांधलें आहे. ऑस्लोजवळच्या प्रदर्शनांत तें ठेवलें आहे.

ऑस्लोला मला आवडलेली सर्वांत प्रमुख गोष्ट म्हणजे व्हिग्लंडची कलाकृति. गुस्टाव व्हिग्लंड ( सन १८६९ ते १९४३ ) हा नॉर्वेचा सुविख्यात शिल्पकार. ऑस्लोच्या वायव्येस फ्रॉग्नर पार्क आहे. त्यांत या शिल्पकाराच्या दीडशें शिल्पकृति आकर्षकपणें मांडून ठेवल्या आहेत. तीस वर्षे अविश्रांत श्रम करून व्हिग्लंडनें त्या तयार केल्या आहेत. मानवी जीवनांत बालपणापासून वृद्धत्वापर्यंत ज्या कांहीं राग, लोभ, प्रेम, आनंद, दुःख इ० अनेक भावना निर्माण होतात त्या आपल्या कलाकृतींतून व्यक्त करण्याचा व्हिग्लंडचा उद्देश होता. त्यांत त्याला चांगलें यश आलें आहे. जीवनाकडे पाहण्याचा त्याचा दृष्टिकोन थोडासा निराशावादी होता व त्याची छाप त्याच्या कलाकृतींवर पडली आहे. पण मानवी जीवनांतील जनन–मरणाची चक्रगति, स्त्री-पुरुषांचें परस्परावलंबी जीवन, तरुण–वृद्धांच्या विचारसरणींतील साहजिक फरक या सर्व गोष्टी शिल्पकलेच्या साहाय्यानें रंगविण्यांत व्हिग्लंडचें विलक्षण कौशल्य दिसतें.

जाता जातां नॉर्वेविषयीं थोडें लिहितों. नॉर्वे हें या देशाचें इंग्रजी नांव आहे. खरें नांव Norge असें आहे. नॉर्वेची हवा जवळजवळ ब्रिटनप्रमाणें आहे. येथें डोंगराळ प्रदेश जास्त असल्यामुळें कदाचित् जास्त प्रदेश बर्फाच्छादित होत असेल. परंतु गल्फ स्ट्रीममुळें दोन्ही देशांचीं बंदरें हिंवाळ्यांतहि मोकळीं राहूं शकतात. इंग्लंडप्रमाणें पाऊस वर्षभर असतोच. पण जसजसें पूर्वेस जावें तसतसा पावसाचा जोर कमी होतो.

आदरातिथ्याच्या बाबतींत नॉर्वेजियन लोक प्रसिद्ध आहेत. त्यांची वागणूक मित्रत्वाची आढळते. परकीय प्रवाशास मदत करण्यास ते सदैव तत्पर असतात. विशेषतः सूल्हानें ज्या आपलेपणानें नॉर्वेची माहिती मला पुरविली त्यावरून असें खास म्हणतां येईल कीं, परकीयांना आपल्या देशाची माहिती सांगण्यांत नॉर्वेजियनांना मोठा आनंद व अभिमान वाटतो. नॉर्वेंत मला परकेपणा मुळींच वाटला नाहीं. प्रत्येक जण हवी ती मदत करण्यास तयार असे. बहुतेक सर्व लोकांना इंग्रजी येतेंच; त्यामुळें भाषेचीहि अडचण आली नाहीं.

नॉर्वेजियन लोक मोठे हौशी व आनंदी वृत्तीचे वाटले. इंग्लंडप्रमाणें येथेंहि ईस्टर व नाताळ हे सण असतात, पण त्यांशिवाय १७ मे हा दिवस 'घटना–दिन' ( कॉन्स्टिटयूशन डे ) म्हणून साजरा करतात. त्या दिवशीं

प्रत्येक गांवांतून घरोघर लोक तोरणें उभारतात, मिरवणुकी काढतात व ऑस्लो या राजधानीच्या शहरीं राजा सैन्याची मानवंदना घेतो. येथें लग्न-समारंभ आपल्यासारखाच मोठ्या थाटांत करण्यांत येतो. तीन-चार दिवस लग्नाची गडबड चालू असते. नृत्य, मेजवान्या, मिरवणुकी यांची अगदीं गर्दी उडते. खेडेगांवांतून स्त्रिया अजूनहि जुन्या काळचा राष्ट्रीय पोषाख वापरतांना दिसतात. मात्र एक ठराविक राष्ट्रीय पोशाख येथें दिसत नाहीं. खेडेगांवांतून जानपद नृत्यें व जानपद गीत–गायन यांचे कार्यक्रम चालतात.

इंग्लंडमध्यें ज्याप्रमाणें थँक यू, प्लीज, एक्स्क्यूज हे तीन शब्द वारंवार ऐकायला मिळतात त्याप्रमाणें नॉर्वेंत ‘ व्हेसगूट ’ हा शब्द वरचेवर ऐकावा लागतो. याचा शब्दशः अर्थ ‘ Be so good असा आहे. पण संदर्भाप्रमाणें त्यास अनेक अर्थ आहेत. ‘ आपल्याला कांहीं मदत करूं का ? ’ असें एखाद्याला म्हणायचें झालें तरी तो ‘ व्हेसगूटच ’ म्हणेल. बसमध्यें तिकिटें देतांना बस-कंडक्टर व्हेसगूटच म्हणेल. हॉटेलांत वेट्रेसनें खाद्यपदार्थ आपल्या-पुढें टेबलावर ठेवल्यावर ती म्हणेल, ‘ हे आणले पदार्थ ’ तेव्हांहि व्हेसगूटच !

तुझें पत्र बरेच दिवसांत आलें नाहीं. मी तुझ्या पत्राची वाट पाहत आहें. तरी—व्हेसगूट !

ती. नाना व सौ. आई यांना शि. सा. नमस्कार.

तुझा,

भाऊ

* * *

पत्र २१ वें

# स्टॉकहोम आणि उपसाला विद्यापीठ

॥ श्री ॥

स्टॉकहोम ( स्वीडन ), दि. ३० जुलै, १९५२.

प्रिय उपास सप्रेम आशीर्वाद.

ऑस्लो शहर पाहण्यांत मीं शनिवार–रविवार हे दोन दिवस घालविले. रविवार दि. २७ ला रात्रीं १० च्या गाडीनें मीं ऑस्लो सोडलें. तास-दीड तासांत चार्लटनबर्ग या गांवीं नॉर्वेची हद्द संपून स्वीडनची हद्द सुरू झाली. सकाळीं ७-४५ ला गाडी स्टॉकहोमच्या स्टेशनांत शिरली. ऑस्लो–स्टॉकहोम हें अंतर पावणेतीनशें मैल आहे. सारा प्रवास रात्रीचा झाला; त्यामुळें स्वीडनचा प्रदेश पाहायला मिळाला नाहीं. गाडीला गर्दी नव्हती. इकडील गाड्यांच्या तिसऱ्या वर्गाच्या डब्यांतहि गाद्या असतात व आठ जण व्यवस्थित बसूं शकतील असे छोटे छोटे डबे गाड्यांना असतात. खिडक्यांचे पडदे ओढून व डब्याचें दार लावून दिवे मालविले कीं आपण गाडींत नसून एखाद्या खोलींतच आहों असें वाटतें. पासपोर्ट तपासणाऱ्या व कस्टमच्या अधिकाऱ्यांची ये–जा व गाडीचें मध्येंच स्टेशनवर थांबणें व चालू होणें यामुळें थोडीशी झोंपमोड होई; परंतु एकंदरींत प्रवास चांगला झाला.

' वाय्. एम्. सी. ए. ' प्रमाणें **स्टॉकहोमला** ' के. एफ्. यू. एम्. ' ही संस्था आहे. त्या संस्थेच्या सेक्रेटरींना पत्र लिहून माझी राहण्याची व्यवस्था होऊं शकेल का, असें मीं विचारलें होतें. त्या वेळीं के. एफ्. यू. एम्. मध्यें एकहि खोली रिकामी नव्हती. परंतु वाय्. डब्ल्यू. सी. ए. प्रमाणें येथें के. एफ्. यू. के. ही संस्था होती व त्यांत पुरुषांचीहि राहण्याची सोय होत असे. माझी सोय के. एफ्. यू. के. मध्यें झाली. मी तेथें गेल्यावर तिथल्या होस्टेसनें मला खोली दाखविली. त्या बाईंना इंग्रजी चांगलें येत होतें. स्टॉकहोमला काय काय पाहण्यासारखें आहे हें त्यांनींच मला सांगितलें. स्टॉकहोमला ' स्वीडिश टूरिस्ट ट्रॅफिक ॲसोसिएशन ' ही संस्था प्रवाशांना सर्व प्रकारची मदत करते. ' ६, स्टुरेप्लॅन, स्टॉकहोम, स्वीडन ' असा या संस्थेचा पत्ता आहे. न्याहारी

वगैरे उरकून मी त्या संस्थेच्या कचेरींत जायचें ठरविलें. तेथें गेल्यावर काय घडलें हें सांगण्यापूर्वी मी स्वीडनची माहिती पुस्तकांतून व कांहीं व्यक्तींकडून आधींच मिळविली होती ती लिहितों. कोणत्याहि देशांत जाण्यापूर्वी तेथील थोडी प्राथमिक माहिती असणें सोयीचें पडतें. त्या माहितीच्या अनुरोधानें त्या देशांतील वास्तव्यांत जास्त चांगला अनुभव घेतां येतो.

स्वीडनचा आकार हा इंग्लंड-स्कॉटलंड-वेल्स यांच्या दुप्पट भरेल. स्वीडन हा पूर्व-पश्चिम अरुंद असला तरी त्याची दक्षिणोत्तर लांबी एक हजार मैलांच्या आसपास भरेल. भौगोलिक दृष्टीनें स्वीडनचे तीन भाग पडतात. सर्वांत उत्तरेचा नॉरलँड हा अति डोंगराळ प्रदेश होय. मध्यभाग अनेक नैसर्गिक सरोवरांनीं तयार झालेला स्वेआलांद ( Svealand ) हा प्रदेश. पूर्वी या भागांत स्वेआर ( Svear ) या जातीच्या लोकांचें राज्य होतें. त्यावरूनच स्वीडनचें Sverige हें स्वीडिश भाषेंतील नांव निर्माण झालें. तिसरा भाग गॉटालँड. हा दक्षिणेकडील सखल प्रदेश. सुप्रसिद्ध गॉथ लोक हे येथूनच निघाले असें म्हणतात. स्वीडनचा आकार एवढा मोठा असला तरी उत्तरेच्या डोंगराळ प्रदेशामुळें लोकवस्ती फारच कमी म्हणजे अदमासें सत्तर लक्ष आहे. बहुतेक वस्ती दक्षिण भागांत असून केवळ स्टॉकहोमची लोकसंख्या आठ लक्ष आहे.

स्वीडनमध्यें शेती मोठ्या प्रमाणावर करतात. सुमारें वीस टक्के लोक शेतींत गुंतलेले आढळतात. आधुनिक यंत्रसामुग्रीचा वापर केला जातो, त्यामुळें भरघोस पीक निघतें. अन्नधान्यांच्या बाबतींत हा देश स्वयंपूर्ण आहे. एकूण दहा टक्के जमीन शेतीला योग्य आहे व तीपैकीं बहुतेक सगळी दक्षिणेच्या सखल भागांत आहे.

स्वीडनचा निम्म्यावर भाग जंगलयुक्त आहे. त्यामुळें लांकडावर अवलंबून असलेले—कागद तयार करण्याचे व काड्यापेट्यांचे—कारखाने अनेक आढळतात. स्वीडनमध्यें लोखंडाच्या खाणी आहेत. पण दगडी कोळशाचा अभाव असल्यामुळें त्या लोखंडाचा फारसा उपयोग करतां येत नाहीं व बहुतेक लोखंड परदेशीं पाठवावें लागतें.

संशोधनाबाबत स्वीडिश लोकांची ख्याति आहे. रेफ्रिजरेटर, बोफोरगन यांसारख्या गोष्टींचा शोध येथेंच लागला. त्यांचेहि कारखाने येथें दिसतात.

राजा हा स्वीडनच्या राज्यशासनसंस्थेचा प्रमुख असतो, पण प्रत्यक्षांत कॅबिनेटमार्फत राज्यकारभार पाहतो. कॅबिनेटला पार्लमेंटचा सतत पाठिंबा असणें आवश्यक असतें. पार्लमेंटला रिक्सडॅग म्हणतात. पार्लमेंटचे दोन भाग असतात—अपर हाउस व लोअर चेंबर. अपर हाउसमध्यें प्रांतिक लोकसभेच्या व शहर विधानसभेच्या सदस्यांनीं निवडून दिलेले प्रतिनिधि आठ वर्षांच्या मुदतीनें असतात. लोअर चेंबरमध्यें वयाचीं एकवीस वर्षें पूर्ण झालेल्या देशांतील सर्व मतदारांनीं निवडून दिलेले प्रतिनिधि चार वर्षांच्या मुदतीनें असतात. येथें सध्यां 'सोशल डेमोक्रॅट्स' हा पक्ष अधिकारारूढ आहे. त्याशिवाय कॉन्झर्व्हेटिव्ह, उदारमतवादी, कम्यूनिस्ट व शेतकरी पक्ष येथें आहेत.

स्वीडनमधील माझें वास्तव्य उन्हाळ्यांत होतें. त्यामुळें तेथील एरव्हींच्या हवेची मला कल्पना नाहीं. पण उन्हाळा मात्र फारच आल्हाददायक वाटला. रात्रीं थोडीशी पर्जन्यवृष्टि झाली, पण दिवसां केव्हांहि पावसाचा त्रास झाला नाहीं. परंतु रेनकोट जवळ असणें मात्र आवश्यक असतें. उत्तरेकडे डोंगराळ भागांत कडाक्याची थंडी व बर्फ असेल यांत शंकाच नाहीं. पण गल्फस्ट्रीममुळें उष्णतामानावर परिणाम होतोच. स्वीडन हा देश जितक्या उत्तरेस आहे त्या मानानें थंडीचा कडाका भासत नाहीं. अटलांटिक समुद्रावरून येणारा बहुतेक पाऊस नॉर्वेंत अडविला गेल्यामुळें येथें पाऊस बेताचाच असतो. उन्हाळा हा दक्षिणेकडे आल्हाददायक असतो. उत्तरेस तर मध्यरात्रीं देखील १२ वाजतां सूर्यदर्शन घडतें. मध्यरात्रीचा सूर्य मात्र मला पाहायला मिळाला नाहीं. कारण इतक्या उत्तरेस मी गेलों नाहीं.

अन्नाच्या बाबतींत ब्रेकफस्ट, लंच, डिनर ही आंतरराष्ट्रीय पद्धतच स्वीकारली जाते. परंतु खेडेगांवांत मात्र अजूनहि स्वीडिश पद्धत आढळते. सकाळीं उठल्यावर कॉफी, नवाच्या सुमारास पॉरिज व अंडीं, दुपारीं एक वाजतां भिड्डॅग व संध्याकाळीं सात वाजतां जेवण. स्वीडनमध्यें चहापेक्षां कॉफीच अधिक लोकप्रिय आहे. दूध फारच उत्तम व स्वस्त मिळतें. अन्न भरपूर तरी खूप महाग असतें. इंग्लंडच्या चौपट म्हणाना.

मी स्वीडिश टूरिस्ट ट्रॅफिक ॲसोसिएशनमध्यें गेल्यावर मला तेथें स्टॉकहोमचा नकाशा व पाहण्यासारख्या ठिकाणांची यादी मिळाली. तेथें नवख्या माणसास पुष्कळच मदत मिळते. मी तेथील लोकांशीं बोलत

असतांना एक प्रवासी फिन बाई तेथें आली. तिनेंहि नकाशा घेतला. साहजिकच बोलणें सुरू झालें. आम्ही दोघांनीं बरोबर हिंडून स्टॉकहोम पाहण्याचा बेत ठरला. माझा स्टॉकहोमहून पुढचा मुक्काम फिनलंडमधील हेल्सिंकीस होता. अनायासें फिनलंडची बरीच उपयुक्त माहिती मला त्या बाईकडून कळली. ही बाई मोठी चौकस होती. कुठेंहि कांहीं पाहायला गेलों, कीं आसपासच्या सर्व लोकांस ती त्या स्थळाविषयीं माहिती विचारी. त्यामुळें मलाहि साद्यंत माहिती मिळाली.

स्टॉकहोम शहराची रचना मोठी आकर्षक आहे. शहराच्या दक्षिणेस एक बेट असून सातशें वर्षांपूर्वीं या बेटावर स्टॉकहोम शहर वसलें. त्या वेळीं भौगोलिक अनुकूलतेमुळें हें शहर व्यापाराचें केंद्र बनलें. पुढें या शहराचा व्याप वाढूं लागला व बेटाच्या उत्तरेकडील जमिनीवर वस्ती वाढूं लागली. दक्षिणेकडील बेट हें उत्तरेच्या मूळ जमिनीस निरनिराळ्या उत्कृष्ट पुलांनीं जोडलें आहे. म्हणून स्टॉकहोम शहरास ‘ पुलांमधलें शहर ’ ( City between the bridges ) असें म्हणतात. या पुलांमुळें या शहरास अवर्णनीय शोभा प्राप्त झाली आहे. दक्षिणेकडील बेटावर जुन्या शहराचे अवशेष दिसतात. अरुंद रस्ते, जुन्या इमारती, इमारतींच्या दारांवरील नक्षी-काम व स्टॉकहोमचें सर्वांत जुनें चर्च— या सर्वांमुळें मध्ययुगीन स्टॉकहोमची कल्पना येते. उलटपक्षीं पूल ओलांडून नव्या स्टॉकहोममध्यें आपण आलों कीं फरक एकदम जाणवतो. उंच इमारती, भव्य रस्ते, मोठे चौक यांनीं गजबजलेलें हें राजधानीचें शहर आहे याची जाणीव होते. स्वीडन हा देश युरोपच्या एका टोंकास असल्यानें व समुद्रामुळें तो मध्य युरोपपासून अलग झाल्यामुळें येथील शिल्पकला फारशी आकर्षक वाटत नाहीं.

कुंग्लिगा स्लॉत्ते हा स्टॉकहोम येथील राजवाडा फार प्रेक्षणीय आहे. जुन्या व नव्या स्टॉकहोमच्या हद्दीवर तो बांधला आहे. इमारत भव्य आहे. आसपासच्या पाण्यांत राजवाड्याचें प्रतिबिंब खुलून दिसतें. ‘ निकोडमस तेसिन दि यंगर ’ यानें या राजवाड्याची रचना केली. सन १६९० ते १७५४ या कालावधीच्या दरम्यान तो बांधण्यांत आला. बाहेरची बाजू आकर्षक

नाहीं. आंतील सजावट मात्र अप्रतिम आहे. उत्कृष्ट फार्निचर, चित्रें, चिनी-मातीचीं भांडीं इ० नीं आंतील प्रचंड दिवाणखाने सजविले आहेत.

जवळच नव्या स्टॉकहोममध्यें टाउन हॉलची इमारत आहे. सन १९२३ सालीं रॅग्नर ऑस्टबर्ग याच्या नेतृत्वाखालीं हा हॉल बांधून झाला. हॉलच्या सुमारें दीडशें फूट उंचीच्या मनोऱ्यावरून स्टॉकहोम शहराचा देखावा छान दिसतो. मनोऱ्याच्या उंच टोंकावर एक सुंदर दिवा असून स्वीडनचे तीन राजमुकुट आहेत.

याशिवाय ग्रेट चर्च, स्वीडिश चित्रकला व शिल्पकला यांचें दर्शन घडविणारी नॅशनल म्यूझियम, स्वीडिश शस्त्रास्त्रांचें प्रदर्शन असलेली रॉयल आर्मरी, इ० कांहीं ठिकाणें येथें पाहण्यासारखीं आहेत. पण टाउन हॉल वगैरे स्थळें पाहतां पाहतांच रात्र झाली. दिवसभर भटकल्यानें शीण आला होता. म्हणून आम्ही स्कॅन्सन नांवाच्या सुंदर बगिच्यांत गेलों. तेथील एका रेस्टारंट-मध्यें खाना घेतला. फिन बाईनें केलेल्या सोबतीबद्दल तिचे आभार मानले व तिचा निरोप घेतला. रात्रीं अकराच्या सुमारास मी माझ्या खोलीवर परत आलों व क्षणार्धांत झोंपीं गेलों.

मंगळवार दि. २९ ला सकाळीं उठल्यानंतर मी दैनंदिनी उघडून पाहिली. " दुपारीं ११-५ च्या गाडीनें निघून उपसाला विद्यापीठाकडे जाणें व तेथें डॉ. व्हिट्ल यांना भेटणें " असा मजकूर लिहिलेला होता. स्टॉकहोमच्या उत्तरेस पंचवीस मैलांवर उपसाला ( Uppsala ) हें गांव असून तेथील विद्यापीठ प्रसिद्ध आहे. स्वीडनचें ऑक्सफर्ड-केंब्रिजच म्हणाना ! प्रा. वोल्ड हे तेथें संख्याशास्त्र-विभागाचे प्रमुख म्हणून काम पाहतात. आपण अनायासें स्टॉकहोमला जाणार आहों तर उपसाला विद्यापीठ पाहून घ्यावें या हेतूनें मीं मँचेस्टरहून आधींच प्रा. वोल्ड यांना पत्र लिहून त्यांची भेट घेणें शक्य आहे का असें विचारलें. त्यांनीं उलट टपालीं उत्तर लिहून कळविलें कीं, " सध्यां उन्हाळ्याची सुटी असून त्यानिमित्त बाहेरगांवीं जाण्याचा मीं आधींच कार्यक्रम ठरविला आहे. त्यामुळें तुम्ही याल तेव्हां मी उपसाला येथें असेनच असें नाहीं. पण येथील एक लेक्चरर डॉ. व्हिट्ल हे त्या वेळीं नक्की येथें आहेत व ते भेटूं शकतील. मी जर त्या वेळीं उपसाला येथें असलोंच तर आपली भेट होईलच." त्याप्रमाणें मी डॉ. व्हिट्ल यांना पत्र लिहून त्यांना भेटण्याची

इच्छा प्रदर्शित केली. त्यांनीं पत्र पाठवून, "तुम्ही अमुक दिवशीं दुपारीं ११-५ च्या गाडीनें स्टॉकहोमहून निघालांत तर १२-३० ला उपसाला येथें पोंचाल. मी स्टेशनवर तुम्हांस घ्यायला येईन. परक्या ठिकाणीं तुम्हांला विद्यापीठ सहज सांपडेल असें नाहीं" असें कळविलें.

त्याप्रमाणें आज उपसाला येथें जायचें होतें. सकाळीं मी स्टॉकहोम येथील थॉमस् कुक्च्या कचेरींत गेलों तर चौकशी करतां कळलें कीं, ११-५ ला उपसाला येथें जाण्यास गाडी नाहीं तर ११-५० ला आहे. ११-५० च्या ऐवजीं ११-५ असें डॉ. व्हिट्ल यांनीं चुकून लिहिलें असावें असें मला वाटलें. म्हणून गांवांत भटकून साडेअकराला स्टॉकहोम स्टेशनवर गेलों. तेथें कळलें कीं, गाडी ११-५ ला होती. ११-५० ला दुसरी गाडी आहे. ती फास्ट असून १२-४५ ला पोंचते. पहिली गाडी विनाकारण चुकल्याचें मला वाईट वाटलें. कदाचित् डॉ. व्हिट्ल १२-३० ला माझी वाट पाहून परत जातील असें वाटलें, व त्याबद्दल रुखरुख लागली. आतां दुसऱ्या गाडीनें जायचें व विद्यापीठांत जाऊन डॉ. व्हिट्ल यांची क्षमा मागायची असें मीं ठरविलें. पण पाऊण वाजतांहि त्यांना स्टेशनवर पाहून मला नवल वाटलें. त्यांचें मीं मनःपूर्वक आभार मानले. त्यांच्या शेजारीं एक गृहस्थ होते. त्यांच्याकडे बोट करून डॉ. व्हिट्ल म्हणाले, "हे प्रा. वोल्ड". मला आश्चर्याचा दुसरा धक्का बसला. प्रा. वोल्ड म्हणाले, "अनायासें मी आज कांहीं कामासाठीं आमच्या गांवाहून उपसालाला आलों आहें. तेव्हां म्हटलें, तुमचीहि गांठ पडेल म्हणून येथें आलों." प्रा. वोल्ड यांच्यासारखे जगप्रसिद्ध कीर्तीचे विद्वान् मला भेटण्यास स्टेशनवर येतील व एवढा वेळ माझी वाट पाहत तेथें थांबतील हें माझ्या दृष्टीनें नवलाचें होतें. नंतर त्यांनीं मला गांवांत नेलें. प्रमुख रस्त्यांतून हिंडल्यावर आम्ही एका रेस्टारंटमध्यें गेलों. कॉफी, केक्स वगैरे प्रा. वोल्ड यांनीं मागविलीं. माझ्या अभ्यासाविषयीं त्यांनीं चौकशी केली. ते सध्यां एक पुस्तक लिहीत आहेत. त्याची रूपरेषा त्यांनीं मला सांगितली. पुण्याच्या सायन्स कॉंग्रेसला प्रा. वोल्ड आले होते. त्यामुळें पुणें, मुंबई, दिल्ली, कलकत्ता इत्यादि शहरांची त्यांना बरीच माहिती आहे.

कॉफीपानानंतर आम्ही विद्यापीठांत गेलों. सर्व विद्यापीठ व मुख्यतः संख्याशास्त्र-विभाग पाहिला. स्वतः वोल्ड यांनीं सर्व गोष्टी व कामकाज यांची

माहिती दिली. त्यांच्या नव्या पुस्तकांत त्यांना स्वतःचा एक फोटो छापायचा होता. म्हणून त्यांनीं फोटोग्राफरला आजच बोलाविलें होतें. मी सहज तेथें होतों तेव्हां माझाहि समावेश त्यांनीं त्या फोटोंत केला. प्रा. वोल्ड हे मला व डॉ. व्हिट्ल यांना संख्या-शास्त्रांतील कांहीं भाग समजावून सांगत आहेत असा फोटो घेण्यांत आला.

नंतर प्रा. वोल्ड यांनीं त्यांच्या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या लेखांच्या प्रती मला दिल्या. मग मीं त्यांचा आभारपूर्वक निरोप घेतला. डॉ. व्हिट्ल हे मला स्टेशनवर पोंचविण्यास आले. ते मूळचे न्यूझीलंडचे, पण पीएच्. डी. साठीं ते उपसाला येथें आले होते. पीएच्. डी. झाल्यावर त्याच विद्यापीठांत लेक्चरर म्हणून काम करतात. येथील पीएच्. डी. विषयीं त्यांनीं एक गंमतीदार गोष्ट सांगितली. विद्यार्थ्याचा प्रबंध लिहून झाला कीं त्यानें एक मोठें जेवण द्यावें लागतें. जेवतांना सर्व जण त्याला त्या प्रबंधांतील विषयावर प्रश्न विचारतात. त्यांचीं उत्तरें त्या विद्यार्थ्यानें द्यायचीं. या जेवणास दीड-दोनशें पौंड म्हणजे सुमारें दोन हजार रुपये खर्च येतो. तो खर्च त्या विद्यार्थ्यानेंच करावयाचा असतो. त्यामुळें येथें पीएच्. डी. मिळविणें ही मोठ्या खर्चाची बाब आहे. असो. पावणेचारच्या गाडीनें मीं उपसाला सोडलें व सव्वा पांचला स्टॉकहोमला परत आलों.

स्वीडनमधील वास्तव्यांत माझा स्वीडिश लोकांशीं फारच थोडा संबंध आला. स्वीडिश लोक हे थोडेसे बेफिकीर व मिळूनमिसळून न वागणारे असतात असें म्हणतात. पण एकदां त्यांच्याशीं परिचय झाला म्हणजे मात्र ते फारच मित्रत्वाच्या नात्यानें वागतात. सुरवातीला बोलण्यास ते लाजतील; पण आपणच एकदां बोलायला सुरवात केली म्हणजे ते गप्पांत आनंदानें भाग घेतील असें वाटतें.

येथून मला फिनलंडमध्यें जायचें आहे. हेल्सिंकीच्या सामन्यांचें वर्णन वाचायला तूं आतां अधीर झाली असशील. तिकडे वर्तमानपत्रांतहि त्याविषयीं कांहीं ना कांहीं बातम्या येत असतील. त्या खेळांचें वर्णन लवकरच मी तुला लिहून पाठवीन.

देशाटन केल्यानें जे फायदे होतात त्यांची यादी एका जुन्या मराठी कवितेंत दिली आहे. पण प्रवासानें खूप आनंद होतो एवढें मात्र मला

निश्चितपणें वाटतें. श्रीकृष्णाच्या उघडलेल्या मुखांत अर्जुनाला विशाल विश्वाचें दर्शन झालें. माझ्या परदेशांतील या प्रवासांत मलाहि अनेक अनुभव येत आहेत, पुष्कळ उद्बोधक गोष्टी पहायला मिळत आहेत.

माझी प्रकृति चांगली आहे. प्रवासांत कसलाहि त्रास होत नाहीं.

ती. नाना व सौ. आई यांना शि. सा. नमस्कार.

तुझा,
**भाऊ**

* * *

**पत्र २२ वें**

## हेल्सिंकींतील ऑलिंपिक सामने

### ( पूर्वपीठिका व व्यवस्था )

॥ श्री ॥

हेल्सिंकी, ( फिनलंड ), दि. १ ऑगस्ट, १९५२.

प्रिय उषा,

बुधवार दि. ३० जुलै रोजीं ' बोअर १ ' (Bore I) या बोटीनें स्टॉकहोम सोडून मी हेल्सिंकी येथें जाण्यास निघालों. बोटीचें तिकीट थॉमस् कुक्कडून मीं घेतलें होतें. बोटीवर जेवण उत्तम मिळालें. जवळ जवळ पन्नास पदार्थ सहज असतील. त्यांपैकीं आपणांस हवे ते आपल्या हातानें घ्यायचे. जेवण साहजिकच महाग होतें. तेरा शिलिंग एवढा आकार (बक्षिसीसुद्धां) पडला. बोटीवर अनेक देशांतील लोक होते. अनेकांशीं गप्पागोष्टी करीत करीत हा प्रवास मोठ्या मजेंत झाला.

हेल्सिंकीस माझी राहण्याची व्यवस्था चांगली झाली. येथें माझा चांगला चार-पांच दिवस् मुक्काम पडेल व बरेच ऑलिंपिक खेळ पहायला मिळतील.

**ऑलिंपिक सामन्यांचा** उगम अति प्राचीन ग्रीक इतिहासांत सांपडतो. यासंबंधींचा पहिला धागा म्हणजे कोरोबस या एका ग्रीक युवकानें

२२ जुलै ७७६ खि. पू. या वर्षी २०२ यार्ड्स धांवण्याची शर्यत जिंकली. या अंतरास स्टेड ( Stade ) म्हणत व त्यावरूनच इंग्रजींतील स्टेडियम हा शब्द तयार झाला असें म्हणतात.

ऑलिंपिक सामन्यांची जुनी परंपरा पाहण्यासारखी आहे. ऑलिंपिया हें ग्रीसमधील एक ठिकाण आहे. त्या ठिकाणीं दर चार वर्षांनीं खेळांचे सामने होत. खि. पू. ५ व्या शतकांत हे खेळ फारच भरभराटीस आले होते. इ. स. १ ह्या वर्षी जे सामने झाले ते १९४ वे ऑलिंपिक सामने होत. यावरून ऑलिंपिक खेळ किती जुने आहेत व पिढ्यान् पिढ्या त्यांची परंपरा त्या काळांत कशी राखली गेली हें ध्यानांत येतें. ग्रीक साम्राज्याच्या ऱ्हासा-बरोबरच या सामन्यांचा ऱ्हास सुरू झाला. शेवटीं इ. स. ३९३ त ग्रीक सम्राट पहिला थिओडोशिअस यानें हे खेळ कायमचे बंद केले. ऑलिंपिकची ज्योत विझवली गेली व त्याबरोबरच मानवांतील क्रीडाप्रेम हेंहि कांहीं काळ लुप्त झालें.

शेवटीं १८९६ त ऑलिंपिक सामन्यांचें पुनरुत्थान झालें. पेरी द कॉबरटिन या एका फ्रेंच गृहस्थाच्या प्रेरणेनें ऑलिंपिक सामने पुन्हां सुरू झाले. नूतन ऑलिंपिक सामन्यांची सुरवात ग्रीस देशाची राजधानी अथेन्स येथें करण्याचें ठरलें. ६ एप्रिल १८९६ या दिवशीं पुनरुज्जीवित ऑलिंपिक सामने प्रचंड उत्साहानें सुरू झाले. त्यानंतर दर चार वर्षांनीं ( युद्धांतील वर्षें सोडून ) हे सामने होत आहेत. प्रतिवर्षी ऑलिंपिक सामन्यांची लोकप्रियता कशी वाढत आहे हें पुढील आंकड्यांवरून कळून येईल.

| सामना क्रमांक | साल | स्थळ | भाग घेणारे क्रीडापटु |
|---|---|---|---|
| १ | १८९६ | अथेन्स | २९४ |
| २ | १९०० | पॅरिस | १११३ |
| ३ | १९०४ | सेंट लुई | ५१६ |
| ४ | १९०८ | लंडन | २०८७ |
| ५ | १९१२ | स्टॉकहोम | २५४१ |
| ७ | १९२० | अँटवर्प | २६१९ |
| ८ | १९२४ | पॅरिस | ३१०१ |

| सामना क्रमांक | साल | स्थळ | भाग घेणारे क्रीडापटु |
|---|---|---|---|
| ९ | १९२८ | आमस्टरडॅम | ३०१९ |
| १० | १९३२ | लॉस एंजल्स | १४०९ |
| ११ | १९३६ | बर्लिन | ४०७० |
| १४ | १९४८ | लंडन | ४१०६ |
| १५ | १९५२ | हेल्‌सिंकी | ५८१० |

क्रमांक ६, १२ व १३ हे सामने जागतिक युद्धांमुळें रहित झाले.

हेल्‌सिंकी हें फिनलंडच्या राजधानीचें शहर. ऑलिंपिक सामन्यांत फिनलंडचा मोठा भाग आहे. चाळीस लाखांचा हा देश पण आतांपर्यंत झालेल्या सामन्यांत या छोट्याशा राष्ट्रानें ७५ सुवर्णपदकें, ७० रौप्यपदकें व ७३ ब्राँझचीं पदकें मिळविलीं आहेत. या देशांतून नुर्मी, रिटोला यांसारखे जग-प्रसिद्ध खेळाडू निर्माण झाले आहेत. १९३६ सालच्या बर्लिनच्या ऑलिंपिक सामन्यांच्या वेळीं टोकिओ व हेल्‌सिंकी यांपैकीं कोणास १९४० चे सामने भरविण्याचा मान द्यायचा याविषयीं चर्चा होऊन टोकिओ हें ठिकाण ठरलें. पण १९३८ मध्यें ऑलिंपिक सामन्यांच्या जबाबदारींतून मुक्त करण्याची जपाननें विनंती केल्यामुळें १९४० चे सामने हेल्‌सिंकीसच भरविण्याचें ठरलें. फिनलंडनें ही कामगिरी पत्करून तयारीला सुरवात केली होती. मुख्य स्टेडियम बांधून झालाच होता; इतर स्टेडियम बांधण्यास सुरवात झाली. पण युद्धाचे ढग आकाशांत जमूं लागल्यानें सामने होतील कीं नाहीं याची शंकाच होती. १९३९ मध्यें युद्ध सुरू झाल्यानें सामने रद्द करावे लागले. १९४४ सालीं लंडनला सामने होणार होते तेहि युद्धामुळें तहकूब होऊन १९४८ मध्यें तेथें झाले. १९५२ मध्यें सामने हेल्‌सिंकीस होत आहेत. त्यासाठीं जगांतील ७६ देशांना निमंत्रणें गेलीं होतीं. त्यांपैकीं ५५ देशांनीं निमंत्रणें स्वीकारून सामन्यांत भाग घेतला. १८ विविध खेळांच्या १४९ चुरशी झाल्या. सामन्यांसाठीं आलेल्या ५८१० क्रीडापटूंत ५७३ स्त्रिया आहेत, हें नमूद करण्याजोगें आहे.

सामन्यांचें मुख्य ठिकाण ऑलिंपिक स्टेडियम हें हेल्‌सिंकीच्या उत्तर टोंकास बांधलें आहे. सत्तर हजार प्रेक्षक व्यवस्थित रीतीनें बसून सर्व सामने पाहूं शकतील असा हा भव्य स्टेडियम आहे. १९४० च्या सामन्यांसाठीं

वास्तविक हा बांधला होता. जागेची साफसफाई करण्याचें काम १९३४ च्या सुरवातीपासून चालू होतें. १९३६ च्या जूनमध्यें पायाभरणी झाली. हा स्टेडियम बांधण्यासाठीं सरकारनें पैसा पुरविला. परंतु या कार्यांत फिनिश जनतेनेंहि फार मोठा हातभार लावला. हें अर्थसाहाय्य मिळविण्याचा एक मार्ग म्हणजे विकल्या जाणाऱ्या प्रत्येक वस्तूवर स्टेडियमचें चित्र असलेलें तिकिट चिकटवलें जाई व स्टेडियमच्या मदतीसाठीं म्हणून कांहीं रक्कम देण्याची विनंती लोकांना केली जाई. या स्टेडियमचें मुख्य आकर्षण म्हणजे कॉंक्रीटचा २३६ फूट उंचीचा भव्य मनोरा! आणि ह्याच मनोऱ्याच्या टोंकावर ऑलिंपिकची ज्योत सामने चालू असेपर्यंत सतत जळत होती. ही ज्योत कित्येक मैल दूरपर्यंत दिसत असे. या स्टेडियमवर सामन्यांचा उद्‌घाटन समारंभ, समारोपसमारंभ, ट्रॅक ॲण्ड फील्डचे सामने, फुटबॉलचे महत्त्वाचे सामने इत्यादि समारंभ–सामने झाले.

पोहण्याचा तलाव स्टेडियमजवळच होता. त्या ठिकाणीं सुमारें १०००० प्रेक्षकांची सोय होती. फुटबॉलचें मैदानहि मुख्य स्टेडियमला लागूनच होतें. तेथें २५००० लोकांची बसण्याची सोय होती. कुस्त्या व बॉक्सिंग हे Messuhalli I (एक्झिबिशन हॉल) या ठिकाणीं झालें. ६००० प्रेक्षक सामावूं शकतील एवढा मोठा तो हॉल होता. Messuhalli II हा त्या मानानें लहान होता. फक्त २००० प्रेक्षकांचीच त्यांत सोय होती. तेथें वजन उचलणें, स्त्रियांचे खेळ आणि बास्केटबॉल यांचे सामने झाले. मुख्य स्टेडियम्स-व्यतिरिक्त सायक्लिंग, हॉकी, कॅनोइंग, रोइंग, शूटिंग वगैरेसाठीं निरनिराळया जागा होत्या.

सामन्यांत भाग घेणाऱ्या खेळाडूंसाठीं राहण्याची स्वतंत्र योजना करावी लागते. गांवाबाहेर एक स्वतंत्र 'ऑलिंपिक नगरी' (Olympic Village) बांधून त्यांत सर्व खेळाडूंना एकत्र राहण्याची संधि दिली जाते. हेलसिंकीच्या ईशान्येस १॥ मैलावर कापिला या उपनगरांत यासाठीं मुद्दाम १४ इमारती बांधल्या होत्या. १४ इमारती असल्या तरी त्या इतक्या मोठाल्या होत्या कीं, त्या इमारतींत ५६५ निरनिराळे भाग होते. १६३० खोल्यांतून एकूण ४८०० लोकांची राहण्याची सोय होती. मोकळी जागाहि भरपूर होती. साऱ्या भागास एखाद्या छोट्याशा शहराचेंच स्वरूप आलें होतें. बँक,



हेल्सिंकी – स्टेडियम



हेल्सिंकी – पोहण्याच्या शर्यतींची जागा



हेल्सिंकी
निरनिराळ्या राष्ट्रांचे ध्वज

रेस्टॉरंट, करमणुकीचीं साधनें, किरकोळ सामान विकत मिळण्याचीं दुकानें, इत्यादींमुळें तर गांवाबाहेर आहोंत असें मुळींच वाटत नसे. एक मोठें आकर्षक प्रवेशद्वार व त्याच्या उजव्या बाजूस सर्व राष्ट्रांचीं निशाणें फडकत आहेत, असें त्या नगरीचें बाह्य स्वरूप असल्यानें आंत जाण्याची कोणासहि स्वाभाविकच इच्छा होई. अर्थात् या 'नगरी'मध्यें जाण्यास सर्वांनाच मुभा नव्हती. सामन्यांत भाग घेणारे खेळाडू, सामना आंखणाऱ्या निरनिराळ्या समित्यांचे अधिकारी, वृत्तपत्र-वार्ताहर व खाद्यविक्रीची परवानगी मिळालेले लोक यांनाच आंत प्रवेश होता. प्रत्येकास एक ओळख-पत्रिका दिली जाई. ती पत्रिका असल्याशिवाय प्रवेश मिळत नसे. जेवणाची सोयहि तेथेंच होती. राहण्याबद्दल प्रत्येकाकडून दिवसाला ६ डॉलर्स ( म्हणजे सुमारें ३० रुपये ) घेतले जात. त्यांत राहण्याची सोय व जेवण येई. राहण्याच्या खोल्या कांहीं लहान व कांहीं मोठ्या होत्या. एका माणसासाठीं स्वतंत्र खोली अशा फारच थोड्या खोल्या होत्या. बहुतेक खोल्यांत दोन, तीन, चार, पांच व क्वचित सहा-सातहि बिछाने आढळत. परंतु सर्व सुखसोयी मुबलक होत्या. पन्नास-साठ विविध देशांतील लोक; प्रत्येकाचें अन्न निराळें, खाण्याच्या वेळा भिन्न, पण त्यांतल्या त्यांत वेळा जमवून व अन्नाची विविधता ठेवून शक्य तेवढें सर्वांना रुचेल असें अन्न देण्याची उत्कृष्ट सोय करण्यांत आली होती. 'नगरी' मधील इतर वातावरणहि फारच प्रसन्न होतें. जगांतील अनेक ठिकाणचे खेळाडू एकत्र येऊन पंधरा दिवस एकमेकांच्या सहवासांत घालवीत असल्या-मुळें सर्वत्र एक प्रकारचें चैतन्य निर्माण झालें होतें. भिन्न देशांतील लोक एकमेकांशीं ओळख करून घेण्यासाठीं व झालेला परिचय वाढविण्यासाठीं आतुर होते हें स्पष्ट दिसत होतें.

सर्व स्त्री-खेळाडूंची व्यवस्था हेल्सिंकीच्या नर्सिंग स्कूलमध्यें झाली होती. सुमारें सहाशें स्त्रिया एकत्र राहूं शकतील एवढी मोठी ही इमारत आहे.

कपिला येथील ' ऑलिंपिक नगरी ' मध्यें फक्त ४८०० लोकांची सोय होती. यंदां खेळाडूंची संख्या प्रचंड प्रमाणांत वाढल्यामुळें हें ठिकाण अपुरें पडूं लागलें व म्हणून ओटॅनिमी या ठिकाणीं कांहीं खेळाडूंची व्यवस्था केलेली होती.

हें ठिकाण हेल्सिंकी शहराच्या बाहेर सुमारें पांचसहा मैल लांब आहे. आसपास गर्द झाडी व जवळच समुद्र आहे. ‘ स्टूडंट टाऊन ऑफ फिन्लंड्स इन्स्टिटयूट ऑफ टेक्नॉलॉजी अँट् ओटॅनीमि ’ या विद्यार्थी-नगरांत सुमारें १४०० लोकांची सोय होऊं शकत होती. या ठिकाणीं रशिया, हंगेरी, रुमानिया, बल्गेरिया, पोलंड व लाल चीन या राष्ट्रांतील खेळाडू राहत व इतर सर्व देशांचे खेळाडू कपिला येथें राहत. ही विभागणी कोणत्या तत्त्वावर झाली व कां हें सहज समजण्यासारखें आहे. मात्र या विभागणीमुळें या दोन गटांतील अलगपणा भासण्याइतका निश्चित वाढला यांत शंका नाहीं. विविध राष्ट्रांचे स्नेहसंबंध दृढ होण्याच्या दृष्टीनें सर्व खेळाडूंनीं एकत्र राहणें फारच आवश्यक असतें. परंतु लाल गटांचें इतरांपासून अलग राहण्याचें धोरण क्रीडा-क्षेत्रांतहि कमी झालें नाहीं हें दृष्टोत्पत्तीस आल्यावांचून राहत नाहीं. क्रीडाक्षेत्र-सुद्धां राजकारणाला टाळूं शकत नाहीं हेंच खरें !

‘ ऑलिंपिक नगरी ’ चे संचालक श्री. ओ. जे. निनिकोस्की यांना भेटून त्यांच्याशीं थोड्या गप्पा मारण्याची संधि मला मिळाली. हे गृहस्थ खूप मनमोकळे होते व खेळाडूंच्या राहण्याची व्यवस्था व ऑलिंपिक सामन्यांची इतर बरीच माहिती त्यांच्याकडून ऐकायला मिळाली. “ सर्व लोकांच्याकडून मला हार्दिक साहाय्य मिळालें व विशेषतः खेळाडूंनीं फारच योग्य शिस्त ठेवली. त्यामुळें ‘ ऑलिंपिक नगरी ’ चें काम सुरळीत चालूं शकलें ” असें ते म्हणाले. मीं त्यांना शेवटीं एक प्रश्न विचारला कीं, “ यंदाच्या वर्षीच्या ऑलिंपिक नगरींतील खास वैशिष्टय असें तुम्ही कोणतें सांगूं शकाल ?” त्यावर ते खूप मोठ्यानें हंसले आणि विनोदानें म्हणाले “ यस्, लाइट नाइट्स ! ” ( Yes, light nights ! ) —आणि हास्याच्या फवाऱ्यांतच आमची मुलाखत संपली.

खेळाडूंच्या व्यवस्थेखेरीज प्रेक्षकांची सोय हाहि एक बिकट प्रश्न होता. हेल्सिंकी हें चार लाखांचें शहर. सर्व मोठालीं हॉटेल्स हीं सन्मान्य पाहुणे, वृत्तपत्र-वार्ताहर आणि तत्सम लोकांसाठीं राखून ठेवलेलीं होतीं. इतर प्रेक्षकांची व्यवस्था खाजगी घरांतून करणें आवश्यक होतें, आणि त्या बाबतींत हेल्सिंकीच्या नागरिकांनीं फारच सहकार्य दिलें. घरांत जागा अपुऱ्या असूनहि आलेल्या पाहुण्यांची सोय व्हावी म्हणून प्रत्येकानें अडचण सोसून व्यवस्था केली.

राहण्याच्या व्यवस्थेसंबंधीं लिहितांना एका गोष्टीचा उल्लेख करणें अत्यंत आवश्यक आहे. ती म्हणजे येथील महागाई. युरोपांतील इतर देशांपेक्षां फिन्लंडमध्यें आधींच जास्त महागाई आहे. त्यांत ऑलिंपिकचे सामने! सर्व जिनसांच्या किंमती ऑलिंपिक समितीनें मात्र आधींच ठरविल्यामुळें घासाघिशीचा प्रश्न नव्हताच. राहण्याची व्यवस्था खाजगी घरांतून झाली खरी; पण त्यासाठीं रोजीं १५ ते २५ रुपये इतका खर्च येई. कोणती एक गोष्ट स्वस्त असेल तर दूध. ३-४ आण्यांस एक ग्लासभर उत्तम दूध मिळे.

ऑलिंपिकचें तिकिट आगाऊ विकत घेतां येत असे. ज्या ठिकाणीं राहावयाचें तेथील पत्ताहि तिकिटाबरोबर दिला जाई. त्यामुळें हेल्सिंकीला आपण कुठें राहणार तें आधीं कळत असे व त्यांना आधीं पत्र पाठवून ओळखहि करून घेतां येई. माझी व्यवस्था हेल्मी सुरोमन या बाईच्याकडे झाली होती. घरांत फक्त चारच खोल्या होत्या, पण त्यांनीं पाहुण्यांची व्यवस्था फारच चांगली ठेवली. आम्ही चौघे तेथें होतों; पण दाटी मुळींच वाटली नाहीं. आम्हांस लागेल ती वस्तु देण्यांत व आमची प्रत्येक अडचण निभावण्यास हेल्मी या सदैव तत्पर असत. मनमोकळेपणा व आपुलकी या वृत्ति तेथें आढळल्यामुळें मी त्या घरांत क्षणार्धांत मिसळून गेलों. राष्ट्रीय संमेलन-समारंभांत स्वतः घस सोसून सहकार्य करण्याची फिनिश लोकांची ही राष्ट्रीय वृत्ति भारतीय बांधवानीं आत्मसात् करण्यासारखी आहे.

फिन लोकांत भारताविषयीं विशेष आपुलकी आढळली. हेल्सिंकींत एक मित्र-मंडळ ( Friendship Association ) असून त्याचा हेतु भारत व फिनलंड यांचे संबंध वाढविणें हा आहे. त्या संस्थेनें भारतीय खेळाडूंना चहापान देऊन त्यांचा आदरसत्कार केला. श्री. राजगोपालाचारी यांच्या ' उपनिषद् ' या ग्रंथाचें फिन भाषेंत भाषांतर झालें असून त्याची प्रतहि मला पहावयास मिळाली. हेल्सिंकीला एक चहापानगृह आहे. तेथें भारतीय चित्रकला व कांहीं संस्कृत सुभाषितें भिंतीवर रंगविलेलीं दिसलीं. फिनलंडसारख्या देशांत भारताबद्दलची ही आपुलकी वा मित्रत्वाची भावना पाहून कोणासहि आनंद होईल. मिसेस् किस्तोला या फिन बाईशीं माझा परिचय झाला. त्या भारतांत तीन वर्षें राहिल्या होत्या व त्या अवधींत त्यांनीं भारताच्या इतिहासपरंपरेचा खूप अभ्यास केला. एवढेंच नव्हे तर हिंदी

भाषाहि त्यांनीं आत्मसात् केली. त्या माझ्याशीं हिंदींत बोलल्या. भारता-विषयीं प्रशंसेचे उद्गार त्यांच्या तोंडून ऐकायला मिळाले, त्यामुळें धन्यता वाटली.

मी येथें तीन-चार दिवस राहून बरेच सामने पहाणार आहें. त्यांचें वर्णन पुढील पत्रांत करीन.

ती. नाना व सौ. आई यांना शिरसाष्टांग नमस्कार.

तुझा,
**भाऊ**

* * *

**पत्र २३ वें**

## ऑलिंपिक सामने

### ( भारत, जपान, अमेरिका व रशिया )

॥ श्री ॥

हेल्सिंकी, दि. ३ ऑगस्ट, १९५२

प्रिय उषास सप्रेम आशीर्वाद.

हेल्सिंकीस आल्यापासून विविध प्रकारचे ऑलिंपिक सामने पाहायला मिळाले. खेळ पाहतांना माणूस किती तन्मय होतो! क्रीडा ही मानवाची एक सहज-प्रवृत्ति आहे असें मानसशास्त्र सांगतें. मी तर म्हणेन कीं, ‘ माणूस हा प्रामुख्यानें खेळकर प्राणी आहे ’ अशी व्याख्या करायलाहि हरकत नाहीं.

ऑलिंपिक सामन्यांत **भारतानेंहि** हिरीरीनें **भाग घेतला**. हिंदी खेळाडूंच्या यशाचा उल्लेख करायचा झाल्यास पहिला उल्लेख आपल्या हॉकीच्या संघाचा करावा लागेल. आपल्या हॉकीच्या टीमनें जगांत अजिंक्यपद मिळविलें आहे. १९२८ सालीं आपण प्रथम हॉकी टीम ऑलिंपिक सामन्यांसाठीं पाठविली. तेव्हांपासून दर सामन्यांत आपण हॉकीचें अजिंक्यपद अढळ ठेवलें आहे. एवढेंच नव्हे तर, प्रत्येक सामन्यांत प्रचंड फरक राहून डोळ्यांत भरेल असा

विजय संपादन केला आहे. हॉलंडचा हॉकी संघ युरोपांत फार नांवाजला जातो. त्या संघाशीं आपला निर्णायक सामना झाला. ६–१ असा आपण तो जिंकला. विशेषतः आपल्या संघाच्या स्टिक्-वर्क (Stick-work) ची सर्व जण फार स्तुति करतात. आपला एक खेळाडू प्रतिपक्षाच्या दोन–तीन खेळाडूंशीं सहज चकवाचकवी करून चेंडूवरचा ताबा टिकवूं शकतो.

हेल्सिंकीला कोणाहि परदेशी माणसाची गांठ पडली आणि मी हिंदी आहें असें त्याला कळलें तर पहिली कोणती गोष्ट तो बोलत असेल तर आपल्या हॉकी संघाची स्तुति. भारत आणि हॉकी या दोन गोष्टी एकत्र उल्लेखिल्या जातात. आतांपर्यंत आपल्या संघानें कधींच पराभव खाल्ला नाहीं ही गोष्ट प्रत्येकजण कौतुकानें बोलून दाखवितो. हॉकींत मिळविलेला विजय व म्हणून प्राप्त झालेलें सुवर्णपदक यामुळें हेलसिंकींत कोणाहि हिंदी माणसाला अभिमानानें छाती पुढें करून चालतां येई.

त्यानंतर दुसरा महत्त्वाचा विजय म्हणजे श्री. खाशाबा जाधव यांचें कुस्तींतील यश. सन १९४८ च्या लंडनच्या सामन्यांत श्री. जाधव यांचा सहावा क्रमांक होता. परंतु या वर्षी त्यांनीं अभिनंदनीय प्रगति करून बॅन्टम वेट म्हणजे १२५½ पौंडांखालील चढाओढींत तिसरा क्रमांक पटकावला व त्याबद्दल त्यांना ब्रॉंझचें पदक मिळालें. आपल्या कुस्तीच्या संघाचे व्यवस्थापक श्री. बी. बी. रॉय यांची व माझी गांठ पडली. श्री. जाधवांच्या कुस्तींतील नैपुण्याची त्यांनीं बरीच स्तुति केली. हिंदी संघाच्या कुस्तींतील कामगिरीचा आढावा घेतांना ते म्हणाले, "ग्राऊंड रेस्लिंगमध्यें जर आपल्या खेळाडूंनीं लेग वर्कची आणखी प्रगति केली तर आपला संघ अधिक यशस्वी होऊं शकेल." १९५६ सालीं होणाऱ्या ऑलिंपिक सामन्यांपर्यंत आमचे खेळाडू ही प्रगति करतील व कुस्तीचें अजिंक्यपद मिळवितील असा प्रबळ आत्मविश्वास श्री. रॉय यांच्या बोलण्यांत दिसत होता. फेदर वेट (१३६½ पौंडांपर्यंत) कुस्तीच्या सामन्यांत श्री. माणगांवे मास्तर हे पांचवे आले.

मुष्टियुद्धाच्या (बॉक्सिंगच्या) सामन्यांत वेल्टर वेट–(१४७ पौंड–११ औंस–५ ड्रॅम्स) मध्यें श्री. नोरीस हे क्वार्टर फायनल्सपर्यंत आले; पण ग्रेसन या डॅनिश गृहस्थानें अगदीं अल्पशा गुणांनीं त्यांचा पराभव केला. आपल्या बॉक्सिंग संघाचे व्यवस्थापक श्री. सील हे म्हणाले, " नोरीस हे फार

उत्तम खेळले. परंतु बॉक्सिंगचे नियम निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळे आहेत व त्यामुळें श्री. नोरीस यांचे कांहीं गुण हुकले. एरवीं त्यांना यापेक्षां जास्त यश मिळूं शकलें असतें."

अशा रीतीनें हिंदी संघास १ सुवर्णपदक व १ ब्राँझचें पदक असे मिळून एकुण १७ गुण मिळाले.

यंदांच्या हिंदी संघाचें वैशिष्टय म्हणजे ऑलिंपिक सामन्यांमध्यें हिंदी स्त्रियांनीं भाग घेतला असा हा पहिलाच सामना. हिंदी खेळाडू सुमारें १०० होते व त्यांत ४ स्त्रिया होत्या. स्त्रियांचा हा पहिलाच अनुभव व म्हणून त्यांच्याकडून जास्त यशाची अपेक्षा करणें चूकच ठरेल. कु. डॉली नझीर यांनीं पोहण्याच्या चढाओढींत भाग घेतला. त्यांच्याशीं गप्पा मारतांना त्या म्हणाल्या, "खेळाच्या बाबतींत जगांतील महिलांनीं किती प्रगति केली आहे व हिंदी महिलांना केवढा प्रचंड टप्पा गांठावयाचा आहे याची पुरेपूर कल्पना प्रत्यक्ष अनुभवानें आली. या ऑलिंपिक सामन्यांपासून आम्हांला हा मोठा फायदा झाला. पुढील वेळेस आम्ही जास्त चांगली कामगिरी करून दाखवूं असा आम्हांस विश्वास वाटतो." उद्घाटन-समारंभाच्या वेळेस हिंदी स्त्रियांनीं परिधान केलेल्या वेषाबद्दल परकीय लोकांना खूपच कुतूहल वाटलें. वृत्तपत्रांतून ४ हिंदी स्त्रियांचे त्या पोषाखांतील फोटो छापून आले. हिंदी खेळाडूंनीं पठाणी पद्धतीचे फेटे वापरले होते. मात्र समारंभाच्या वेळीं खूपच पर्जन्यवृष्टि झाली व हवेंत फडकणारे फेट्यांचे तुरे पावसानें ओलेचिंब झाले आणि सर्वांचा फार विरस झाला.

भारतानें इतर राष्ट्रांशीं आपले संबंध वाढविण्याची संधि दवडली नाहीं. विशेषतः भारताचा चहा सुप्रसिद्ध आहे. म्हणून भारतातर्फे **सर्व खेळाडूंना** चहाचा एकेक पुडा बक्षीस देण्यांत आला. शिवाय भारतांतील काश्मीर, हैदराबाद इ० प्रेक्षणीय स्थळांसंबंधींचें बरेंचसें चित्रमय वाङ्मय इतरांना वांटण्यासाठीं खेळाडूंनीं हेल्सिंकीस आणलें होतें. पण तें आवश्यक तेवढ्या प्रमाणांत वांटलें गेलें नाहीं अशी तक्रार कांहीं जणांनीं मजजवळ केली भारतीय संघाचे प्रमुख अधिकारी श्री. हक्क यांचीहि गांठ पडली. निरनिराळ्या देशांतील लोकांशीं संबंध वाढविण्याची त्यांची हातोटी विशेष लक्षांत येण्या सारखी होती. हिंदी संघाच्या एकूण कामगिरीबद्दल त्यांनीं समाधान व्यक्त

केलें. भारतांतील ऊष्ण हवेमुळें खेळांना तितकेंसें उत्तेजन मिळत नाहीं व म्हणून जागतिक स्पर्धेंत आपण मागें पडतों असें मत त्यांनीं व्यक्त केलें.

हिंदी संघाबद्दल एक गोष्ट मात्र माझ्या मनाला फार बोंचली. इतर राष्ट्रांतील प्रत्येक खेळाडू व अधिकारी आपल्या कोटावर आपल्या देशाचें चिन्ह म्हणून स्वदेशाचा ध्वज म्हणा अगर इतर कसलें तरी प्रतीक लावीत. त्यामुळें खेळाडूकडे पाहतांक्षणींच तो कोणत्या देशांतील आहे हें चटकन् कळे. परंतु आमच्या देशांतील लोकांच्या कोटावर असली कोणतीच खूण दिसत नव्हती. एवढेंच नव्हे तर, हिंदी संघाचे प्रमुख म्हणून काम करणारे श्री. हक यांच्या कोटावरहि हिरवा रंग असलेला व त्यावर चांद व तीन तारे असलेलें चिन्ह झळकत होतें; अशोकचक्र अथवा भारताचा ध्वज यांपैकीं कांहींच नव्हतें. तें चटकन् डोळ्यांत खुपल्याशिवाय राहिलें नाहीं !

**जपान** हें छोटेंसें राष्ट्र. पण एके काळीं ऑलिंपिक सामन्यांतील यशानें त्यानें जगांतील लोकांचे डोळे दिपविले होते. १९४० सालच्या सामन्यांचा मानहि टोकिओस मिळाला असता. जपान हें पौर्वात्य राष्ट्र म्हणून जपानी संघाचे सेक्रेटरी श्री. टाकिझो मात्सुमोटो यांना भेटण्यास मी मुद्दाम गेलों होतों. जपाननें सर्वांत अधिक संख्येनें खेळाडू बर्लिनला १९३६ सालीं पाठविले होते. त्या वेळेस जपानचे २८० खेळाडू बर्लिनला गेले होते. १९४८ च्या सामन्याला जपानला निमंत्रण नव्हतें. त्यामुळें आतां ऑलिंपिक सामन्यांत जपान सोळा वर्षांनीं प्रवेश करीत आहे. यंदां १०१ जपानी खेळाडूंनीं भाग घेतला. युद्धांत जपानच्या झालेल्या हानीमुळें जपान खेळांच्या बाबतींत जगाबरोबर राहूं न शकल्यामुळें जपानी संघाचें यंदांचें यश नेहमींप्रमाणें भरीव नाहीं असें मात्सुमोटो हे म्हणाले. शिवाय इतक्या परदेशप्रवासाचा होणारा खर्चहि बराच आहे म्हणून जास्त खेळाडू येऊं शकले नाहींत. इतकें असूनहि जपाननें ३ सुवर्णपदकें, २ रौप्यपदकें व ३ ब्रॉंझचीं पदकें मिळविलीं. जपानला एकूण ६४ गुण मिळाले व सर्व राष्ट्रांत त्याचा गुणदृष्ट्या १३ वा क्रमांक लागला.

विशेषतः कुस्तींत जपाननें बरींच पदकें मिळवलीं. कुस्तींतील यशाचें रहस्य सांगतांना श्री. मात्सुमोटो म्हणाले, "कुस्तींत दमछाक (स्टॅमिना) वाढविण्यापेक्षांहि वेगाला (स्पीड) जास्त महत्त्व आहे. आमचे खेळाडू कुस्त्यांचे डावपेंच झटापट बदलण्यांत कुशल आहेत व म्हणूनच त्यांना यश मिळूं शकतें."

एकूण ऑलिंपिक खेळांविषयीं त्यांनीं प्रशंसोद्गार काढले. सर्व खेळ फारच चांगल्या रीतीनें आंखले होते व वातावरण खेळीमेळीचें होतें. बोंचण्याजोगी एकच गोष्ट त्यांना वाटली व ती म्हणजे खेळामध्येंहि राजकारण घुसडण्याचा कांहीं राष्ट्रांचा प्रयत्न. अर्थात् ही गोष्ट विस्तारानें सांगण्याची त्यांना आवश्यकता वाटली नाहीं. पण त्यांना काय म्हणायचें होतें तें स्पष्ट कळत होतें.

**अमेरिकेच्या** संघाचे प्रमुख कर्णधार श्री. के. एल्. विल्सन यांची व माझी ओळख या सामन्यांच्या वेळीं झाली. थोड्याफार गप्पाहि झाल्या. आतांपर्यंतच्या सर्व ऑलिंपिक सामन्यांपेक्षां अमेरिकेनें या वेळीं अधिक खेळाडू पाठविले. एकूण ३३६ खेळाडूंपैकीं ४८ स्त्रिया होत्या. आतांपर्यंत दरवर्षीचे सामने अमेरिका गाजवते आणि या वेळेसहि ४० सुवर्णपदकें मिळवून अमेरिकेनें आपली कीर्ति कायम ठेवल्याचें श्री. विल्सन यांनीं सांगितलें. पुरुषांच्या ॲथ्लेटिक्स सामन्यांत तर अमेरिकेला भरघोस यश मिळालें आहेच पण त्याशिवाय स्टीपल चेस ( क्रॉस कंट्री ), बॉक्सिंग, कॅनोईंग व पोहणें यांतहि उल्लेखनीय यश अमेरिकेनें मिळविलें असल्याचें ते म्हणाले. दरवर्षी अमेरिका इतकें यश मिळवूं शकते याचें रहस्य काय आहे असें विचारतां श्री. विल्सन यांनीं उत्तर दिलें कीं, “देशांतल्या देशांत असे अनेक लहानमोठे सामने आम्ही भरवतों व त्यामुळें चुरस वाढते. जितकी चुरस जास्त तितकें शिक्षण जास्त मिळतें. अमेरिकन संघाच्या यशाचें हें मर्म आहे. शिवाय आमचे खेळाडू विशेष मेहनत घेऊन शास्त्रीय रीतीनें तालीम चालू ठेवतात.”

यंदांच्या वर्षी रशियानें या खेळांत प्रथमच पदार्पण केलें. त्यासंबंधीं विचारतां श्री. विल्सन म्हणाले, “ती फार चांगली गोष्ट झाली.” रशियन खेळाडूंच्या कौशल्याची तारीफ करून ते म्हणाले, “त्यामुळें या वर्षीच्या खेळांत जास्त चुरस निर्माण झाली व म्हणून सामने जास्त रंगले. त्यामुळेंच खेळांतील कौशल्यहि वाढलें. पुढील सामन्यांतदेखील रशिया भाग घेईल व सामने जास्त चुरशीचे बनवील अशी मला आशा वाटते.”

‘ऑलिंपिक सामन्यांच्या पद्धतींत कांहीं सुधारणा करणें आवश्यक आहे का? असें विचारतां ते म्हणाले, “ऑलिंपिक सामन्यांचा पसारा दिवसेंदिवस

वाढत चालला आहे. त्यामुळें सामन्यांत भाग घेणें ही फार खर्चाची गोष्ट होऊं लागली आहे. ज्यांना हा खर्च करण्याची ऐपत असेल अशीं राष्ट्रेंच या सामन्यांत भाग घेऊं शकतात. त्यामुळें आतां यापुढें नवीन कोणतेहि खेळ ऑलिंपिक सामन्यांत सामावून न घेतां खेळांची मर्यादा येथेंच घालावी. त्यायोगें वाढत्या पसाऱ्यास आळा घालतां येईल."

यंदांच्या सामन्यांत **रशियानें** प्रथमच प्रवेश केला व पहिल्याच सपाट्यांत सर्वांत अधिक गुण त्यानें मिळविले. त्यामुळें रशियाचें नांव ऑलिंपिक सामन्यांत बरेंच गाजलें; म्हणून जमल्यास रशियन संघाच्या प्रमुख अधिकाऱ्यांपैकीं कोणाची गांठ घेऊन गप्पा मारण्याची संधि मिळते का, हें पाहण्याचें मीं ठरविलें. अमेरिका, ब्रिटन, जपान इत्यादि अनेक राष्ट्रांच्या प्रमुखांची व खेळाडूंची गांठ पडून सहज गप्पा मारतां आल्या. मात्र तितक्याच सहजतेनें रशियन अधिकारी व खेळाडू यांच्याशीं ओळख करून घेतां येईल असें वाटलें नाहीं.

रशियन खेळाडूंची छावणी हेल्सिंकीपासून पांच-सहा मैलांवर ओटॅनिमी येथें इतर कॅंपपासून दूर होती हें सांगितलेंच आहे. यामुळें एक प्रकारची दूरता आधींच निर्माण झाली होती. परंतु तरीहि त्या छावण्यांमध्यें जायचें मीं ठरविलें. कॅम्पच्या आवारांत शिरतांच कम्युनिस्टप्रणीत राष्ट्रांच्या अस्तित्वाची तत्काळ जाणीव झाली. कॅंपच्या इमारतीवर स्टॅलिनचें भव्य तैलचित्र दूरवरून दिसत होतें. चीन, रुमानिया इ. राष्ट्रांच्या छावण्यांवरहि त्यांच्या प्रमुखांचें चित्र व शिवाय शेवटीं स्टॅलिनचें चित्र होतें. मी आंत शिरलों. फारच थोड्यांना इंग्रजी समजत होतें. त्यामुळें मला दुभाषाकडे नेण्यांत आलें. रशियन छावणीच्या कचेरींत हें काम करणारी 'मिना' या नांवाची सुमारें २५-३० वर्षांची एक तरुणी होती. प्रथम मीं तेथें येण्याचें कारण सांगितलें व रशियन संचालकांची गांठ पडून गप्पा मारता येतील का, असें विचारलें. अर्थात् तिनें विचारलें, "काय हेतूनें गप्पा मारायच्या आहेत?" मी म्हणालों, "एका वृत्तपत्रासाठीं या सामन्यांवर लेख लिहिण्याचें मनांत असल्यामुळें माहिती गोळा करण्यासाठीं मी आलों आहें."

मीं वृत्तपत्राचें नांव काढतांच त्या स्त्रीचा चेहरा बदलला. अक्षरशः पोलिस तपासणी सुरू करावी तशीच वृत्ति तिनें स्वीकारली व प्रश्नांची फैर झाडली. "कोणतं वृत्तपत्र ?" मी म्हणालों, "पुण्याला 'केसरी' हें वृत्तपत्र आहे." "कोणत्या भाषेंत ?" "मराठी". "त्या वृत्तपत्राचें धोरण काय ?"–मीं तिला प्रतिप्रश्न केला, "कसल्या बाबतींतलं धोरण जाणण्याची तुमची इच्छा आहे ?" ती म्हणाली, "अर्थात् राजकीय—म्हणजे तुमचं वृत्तपत्र 'बुझ्वी' आहे का 'डेमोक्रॅट' आहे ?" हा प्रश्न ऐकून मी थक्क झालों. खेळांच्या बाबतींतली ही मुलाखत व त्यांत राजकारणाचा कोठें व कसा संबंध येतो हें मला कळेना. पण मीं उत्तर दिलें, "तें वृत्तपत्र बुझ्वी आहे कीं डेमोक्रॅट आहे हें मला माहीत नाहीं. पण त्या वृत्तपत्रांतील क्रीडा–विभागांत मी लेख लिहीन व तो लेख क्रीडाविषयाची ज्याला आवड असेल त्या प्रत्येकासाठीं असेल. मग त्याचीं राजकीय व सामाजिक मतें कशींहि असोत. तिच्या प्रश्नाला मीं कलाटणी दिली हें पाहून तिनें विचारलें, "वृत्तपत्राच्या नांवाचें इंग्रजी भाषांतर सांगाल काय ?" मीं म्हटलें, "लायन. ( Lion )" हें नांव कां ठेवलं गेलं ?" हा पुढचा प्रश्न. मीं म्हटलें, "लायन ( सिंह ) हें आम्ही शक्तीचें प्रतीक समजतों."

ही तपासणी झाल्यावर ती आंत गेली व संचालकांना ( ज्यांच्याशीं मला बोलायचें होतें त्यांना ) भेटली. त्यांच्यांत काय बोलणें झालें हें मला ठाऊक नाहीं. पण १० मिनिटांनीं ती बाहेर आली व मला म्हणाली, "तुम्ही असं करा, तुम्हांला जे कांहीं प्रश्न विचारायचे आहेत ते एका कागदावर लिहा व उद्यां दुपारीं या वेळेस परत या. तेव्हां तुम्हांला त्या प्रश्नांचीं उत्तरें लिहून मिळतील. संचालकांची मुलाखत होऊं शकणार नाहीं." अर्थात् रशियासंबंधीं जास्त माहिती मिळवावी एवढाच माझा हेतु होता. म्हणून प्रत्यक्ष मुलाखत झाली नाहीं तरी प्रश्नांचीं उत्तरें मिळालीं तरी त्यांत समाधान मानावें म्हणून मीं कांहीं प्रश्न लिहून दिले. प्रश्नांच्या खालीं वृत्तपत्राचें नांव व माझें नांव लिहिण्यास मला तिनें सांगितलें.

दुसऱ्या दिवशीं मी पुन्हां गेलों. दारांतच निना भेटली व प्रश्नांचीं उत्तरें घेण्यास आलों आहें असें मीं तिला सांगितलें. ती म्हणाली, "तुम्ही येथेंच उभे राहा. मी आंत जाऊन कागद घेऊन येतें." दारांतून आंत येऊन

बसायला सांगायची साधी नम्रताहि तिनें दाखविली नाहीं. त्या ठिकाणीं मी जवळ जवळ अर्धा तास उभा होतों. माझ्या समोरून निना अनेक वेळां आंत-बाहेर गेली. पण प्रश्नांचीं उत्तरें देण्याचें तर बाजूलाच ; पण नुसती माझी दखलगिरी घेण्याचेंहि तिला सुचलें नाहीं. शेवटीं कंटाळून प्रश्नांचीं उत्तरें देण्याची त्यांना इच्छा नाहीं असें समजून मी परत फिरलों. मला माझ्या प्रश्नांचींहि उत्तरें मिळूं शकलीं नाहींत. रशियन लोकांनीं हेल्सिंकीला आपल्या-भोंवतीं एक प्रकारचें गूढतेचें वातावरण निर्माण केलें होतें. कोणांतहि ते मिसळत नव्हते. त्यांच्या अलिप्ततेविषयीं मीं हेल्सिंकीला अनेकांकडून ऐकलें होतें. परंतु दुर्दैवानें मलाहि तोच कटु अनुभव आला. यशाबरोबर जर रशियनांनीं खिलाडू वृत्ति दाखवली असती तर त्यांचें यश अधिक खुलून दिसलें नसतें का ?

ऑलिंपिक सामन्यांपैकीं बहुतेक सगळे सामने आतां संपले आहेत. आतां सामन्यांचा समारोप व बक्षीस-समारंभ एवढे महत्त्वाचे कार्यक्रम उरले आहेत. त्यांची माहिती पुढील पत्रांतून कळवीन.

कळावें. ती. नाना व सौ. आई यांना शिरसाष्टांग नमस्कार.

तुझा,

**भाऊ**

* * *

**पत्र २४ वें**

# ऑलिंपिक सामने

## ( बक्षीस-समारंभ व समारोप )

॥ श्री ॥

हेल्सिंकी, दि. ४ ऑगस्ट, १९५२.

प्रिय उषास शुभाशीर्वाद.

येथील ऑलिंपिक सामने संपले व **बक्षीस-समारंभाचा नयनरम्य सोहाळा** पार पडला. बक्षीस-समारंभाचा हा प्रसंग फारच हृदयस्पर्शी असतो. त्या वेळेस केवळ एका व्यक्तीचाच गौरव होत नसून ज्या राष्ट्रांतील ती व्यक्ति असेल त्या राष्ट्राचाहि सन्मान होतो. कोणत्याहि चढाओढीचा निर्णायक

सामना झाला कीं तत्काळ त्या स्पर्धेचा बक्षीस-समारंभ उरकून घेण्यांत येतो. पहिल्या तीन क्रमांकांना बक्षिसें असतात. प्रथम एका प्लॅटफॉर्मवर तिघे जण उभे राहतात. पहिला क्रमांक मध्यभागीं, दुसरा त्याच्या उजव्या बाजूस व तिसरा पहिल्याच्या डाव्या बाजूस. पहिल्याला उभें राहण्यास उच्चासन दिलेलें असतें. नंतर दूरध्वनिक्षेपकावर त्या तिघांचीं नांवें व त्यांच्या राष्ट्रांचीं नांवें सांगतात. टाळ्यांच्या कडकडाटांतच पहिल्यास सुवर्णपदक, दुसऱ्यास रौप्यपदक व तिसऱ्यास ब्राँझचें पदक दिलें जातें. नंतर सर्व प्रेक्षक उभे राहतात व बँडवर ओळीनें त्या तीन राष्ट्रांचीं राष्ट्रगीतें म्हटलीं जातात आणि त्याच वेळीं त्या तीन राष्ट्रांचे ध्वज वर चढविले जातात. पहिल्यांदां पहिल्या आलेल्या राष्ट्राचा, नंतर दुसऱ्या आलेल्या व शेवटीं तिसऱ्याचा. राष्ट्रगीत चालू असतांनाच त्या त्या राष्ट्राचा ध्वज ध्वजस्तंभावर फडकावला जातो. त्या प्रसंगाचा मान राखून सर्व जण स्तब्धतेनें उभे राहतात, हें पाहून कोणत्याहि राष्ट्राच्या घटकास अभिमानाचें भरतें येईल.

ह्या **सामन्यांचा समारोप-समारंभ** दि. ३ ऑगस्टला सायंकाळीं ७ वाजतां झाला. या वेळीं छोटासाच पण फारच परिणामकारक कार्यक्रम आंखला होता. सत्तर हजारांच्या वर प्रेक्षकसमूहानें सारा स्टेडियम नुसता गच्च भरून गेला होता. सैनिकी बँडवादन चालू असतांना प्रत्येक राष्ट्राचे दोन प्रतिनिधि—एकाच्या हातात त्या राष्ट्राचा ध्वज असे—एका ओळींत एका पाठोपाठ एक एक चालत आले. सर्वांत अग्रभागीं ऑलिंपिक सामन्यांचा उगम असलेल्या ग्रीसचा ध्वज होता व सर्वांत शेवटीं फिनलंडचा. विजेच्या गुण-फलकावर ( इलेक्ट्रिक स्कोअर बोर्डवर ) निरनिराळ्या चार भाषांत पुढील मजकूर होता—

" Great is to triumph —
greater for noble combat "

नंतर फिनिश राष्ट्रगीत झालें व फिनलंडचा राष्ट्रध्वज चढविण्यांत आला. पाठोपाठ १९५६ सालीं ऑस्ट्रेलियांत पुढील सामने भरणार म्हणून ऑस्ट्रेलियन ध्वज फडकाविला जाऊन त्या राष्ट्राचें राष्ट्रगीत झालें. नंतर श्री. एडस्ट्रोम ( इंटरनॅशनल ऑलिंपिक एक्झिक्यूटिव्ह कमिटीचे अध्यक्ष ) यांनीं छोटेंसें पण

फारच सुंदर भाषण केलें आणि हे जगप्रसिद्ध सामने संपल्याचें त्यांनीं जाहीर केलें. विशेषतः आभारप्रदर्शन थोडक्यांत केल्यावर ते म्हणाले,

"१५ वे ऑलिंपिक सामने संपल्याचें मी आतां जाहीर करतों. यानंतर चार वर्षांनीं हे सामने मेलबोर्न येथें भरणार आहेत. त्या वेळीं प्रत्येक देशांतील युवकांनीं तेथें जमावें अशी माझी त्यांना विनंती आहे. सर्वांची आनंदी वृत्ति व स्नेहभाव यांच्या बळावरच ऑलिंपिकची ज्योत ही अधिक तेजानें, धैर्यानें व सन्मानानें तेवत राहील व त्यांतून मानवतेचें चिरसौख्य निर्माण होईल अशी आशा मी या प्रसंगीं व्यक्त करतों."

त्या धीरगंभीर शांततेंत त्यांच्या भाषणाचे निनाद सर्व ऑलिंपिक स्टेडियमभर घुमले. त्याच वेळीं ऑलिंपिकची सतत जळणारी ज्योत विझवली गेली. ऑलिंपिकचा श्वेत ध्वज ( पांढरा शुभ्र रंग व त्यावर पांच गोल एकांत एक अडकवलेले असे—पांच खंडें एकत्र दाखविण्यासाठीं ) खालीं उतरवण्यांत आला.

श्री. एडस्ट्रोम यांनीं ऑलिंपिकचा ध्वज हेल्सिंकीचे मेयर श्री. रीडमन यांना अर्पण करून तो १९५६ सालापर्यंत हेल्सिंकीच्या टाऊन हॉलमध्यें ठेवण्याची विनंती केली. पांच तोफांची सलामी झाली. त्यानंतर सुमारें तीनशें गायकांनीं एका सुरांत ऑलिंपिक सामन्यांचें स्तोत्र ( ऑलिंपिक हिम ) म्हटलें.

नंतर प्रत्येक राष्ट्रांतील दोन खेळाडूंची रांग हातांत उंच निशाणें फडकावीत स्टेडियमभोंवतीं प्रदक्षिणा करून स्टेडियमच्या बाहेर गेली. त्या वेळेला गुणदर्शक फलकावर 'अधिक वेगानें, अधिक उंच व अधिक बलवान्' ( Faster, Higher, and Stronger ) या अर्थाचीं 'Citius, Altius, Fortius' हीं अक्षरें झळकत होतीं. खेळाडूंची रांग अदृश्य होत होती तेव्हां प्रेक्षकांनीं टाळ्यांचा कडकडाट केला. नंतर फिनिश राष्ट्रगीत होऊन हा समारंभ संपला.

लोक घरोघरीं परतत होते. परंतु रस्त्यानें जातांना पुनः पुनः मागें वळून पाहत होते. ऑलिंपिक स्टेडियमचा उंच मनोरा त्यांना दिसत होता, परंतु त्यावर सतत जळणारी ज्योत विझली होती. आतां १९५६ पर्यंत त्या ज्योतीचें दर्शन होणार नाहीं अशी रुखरुख त्यांना बोंचत असलेली स्पष्ट दिसत होती.

हेल्सिंकीला मी मुख्यतः ऑलिंपिक सामने पहायला म्हणून आलों होतों, तें काम झालें. इथून मी आजच डेन्मार्कमधील कोपेनहेगन या गांवीं जाणार आहें.*

ती. नाना व सौ. आई यांना शि. सा. नमस्कार.

तुझा,
**भाऊ**

* * *

**पत्र २५ वें**

# डेन्मार्कचा प्रथम परिचय

॥ श्री ॥

कोपेनहेगन, (डेन्मार्क) दि. ६ ऑगस्ट १९५२.

प्रिय उषास सप्रेम आशीर्वाद.

सोमवार, दि. ४ रोजीं हेल्सिंकीहून कोपेनहेगनला येण्यासाठीं मी निघणार होतों. हेल्सिंकीच्या ऑलिंपिक बंदरांतून आमची बोट दुपारीं तीन वाजतां सुटणार होती; म्हणून मी अडीच वाजतां धक्कयावर येऊन बोटींत चढलों. बोटीचें नांव फ्रेडरिक्स हॅवन. ही बोट डॅनिश होती; फ्रेडरिक्स हॅवन हें डेन्मार्कच्या उत्तरेस असलेलें एक छोटेंसें बंदर आहे.

हेल्सिंकीचे ऑलिम्पिक सामने संपल्यामुळें या बोटीवर परत जाणाऱ्यांची खूप गर्दी होती. विशेषतः डॅनिश संघाचे सर्व खेळाडू याच बोटीवर होते. तसेंच डेन्मार्क, जर्मनी ऑस्ट्रिया, इ० अनेक देशांतील अनेक लोक आपापल्या देशांत परत जात होते. शिवाय माझ्यासारखे कांहीं प्रवासी जातां जातां आणखी कांहीं देश पाहावे या हेतूनें प्रवास करीत होते. या सर्वांमुळें बोट खच्चून भरली होती. हिंडाफिरायलाहि जागा थोडी होती. सामानाची तर

---

*ऑलिंपिक सामन्यांसंबंधीं हे तीन लेख प्रथम **केसरी** वर्तमानपत्रांत ऑगस्ट व सप्टेंबर १९५२ मध्यें प्रसिद्ध झाले होते.

ही गर्दी ! शिवाय ऑलिम्पिक खेळांसाठीं आणलेल्या मोटारी, दहा-बारा घोडे इत्यादींचीहि वर्णी या बोटीवरच लागली होती. या सर्वांमुळें बोट वेळेवर सुटणें अवघड होतें. त्यांत परत तीन वाजतां अतोनात पर्जन्यवृष्टि सुरू झाली. माझ्या हेल्‌सिंकीच्या वास्तव्यांत मला सर्व दिवस कडक ऊन लाभलें होतें. फक्त नेमका निरोप देण्याच्या वेळीं विजांचा चमचमाट, मेघांचा गडगडाट व मुसळधार पाऊस ! त्यामुळें बोटीवर सामान चढवितांना थोडा त्रास झाला. या सर्वांमुळें बोट सुटण्यास सायंकाळचे पावणेसहा वाजले. वास्तविक सोमवारीं दुपारीं तीन वाजतां निघाल्यावर बुधवारीं सकाळीं सातच्या सुमारास बोट कोपेनहेगनला पोंचायला हवी होती. परंतु आधींच बोट उशिरां निघाली; त्यांत परत सामानानें गच्च भरलेली. त्यामुळें कोपेनहेगनला पोंचण्यास दुपारचे अडीच वाजले.

हेल्‌सिंकी—कोपेनहेगन हा प्रवास मात्र फारच मजेंत झाला. मंगळवारचा सारा दिवस व बुधवार सकाळ एवढा वेळ आम्हीं बोटीवर काढला. सोमवारीं निघतांना पाऊस काय पडला असेल तेवढाच. नंतर हवा फारच उत्तम होती. निरभ्र आकाश, कडक ऊन व निळा समुद्र असें मोठें प्रसन्न वातावरण होतें. बाल्टिक समुद्र फारच शांत होता. बोट मुळींच हालली नाहीं. त्यामुळें वेळ मजेंत गेला.

प्रवास उत्तम होण्याचें आणखी एक कारण म्हणजे ऑलिंपिक सामने संपून अनेक देशांचे प्रवासी आपापल्या मायभूमीला परत जात होते. त्यामुळें नाना प्रकारच्या गप्पांना ऊत आला होता. वातावरणांत एक प्रकारचा जिवंतपणा निर्माण झाला होता. माझ्या अनेक डॅनिश लोकांशीं ओळखी झाल्या. त्यांच्याशीं मारलेल्या गप्पांमुळें डेन्मार्कविषयीं खूप नवीन माहिती मिळाली व डेन्मार्कमध्यें पाऊल टाकण्यापूर्वीं डेन्मार्क कसा आहे याची पूर्ण कल्पना आली.

बोटीवर ज्यांच्याशीं माझा परिचय झाला त्यांत बेन्टी या नांवाच्या माझ्या डॅनिश मैत्रिणीचा उल्लेख केला पाहिजे. आमची भेट आदल्या दिवशीं हेल्‌सिंकींत झाली होती. हेल्‌सिंकीच्या रस्त्यांतून आदल्या दिवशीं भटकतांना एका हिंदी इसमाची गांठ पडली. हेल्‌सिंकीला फारच थोडे हिंदी लोक आले होते. त्यामुळें त्या गृहस्थानें मला थांबवून हिंदींत भाषण करायला सुरवात

केली. मी त्यांना इंग्रजींत उत्तर देऊन म्हणालों, "मी हिंदी आहें. पण मला हिंदी तितकं चांगलं बोलतां येत नाहीं. म्हणून मी इंग्रजींत बोलतों याचा राग मानूं नका." तेव्हां ते मला इंग्रजींत म्हणाले, "तुम्ही कुठले?" मी म्हणालों, "पुण्याचा." ते गृहस्थहि महाराष्ट्रीयन होते. त्यांचें नांव शंकर जाधव. ते इंग्लंडमध्यें विद्यार्थी असून माझ्याप्रमाणेंच ऑलिंपिक सामने पाहायला आले होते. हेल्सिंकीला हिंदी लोक कमी, त्यांत मराठी बोलणारे तर फारच कमी. आमच्या थोडा वेळ गप्पा झाल्या. त्यांच्याबरोबर एक स्त्री होती. ते म्हणाले, "यांची ओळख करून देतों. यांचें नांव मिसेस् बेन्टी पेडर्सन. या डॅनिश असून कोपेनहेगनला राहतात. या व मी कोपेनहेगनहून हेल्सिंकीला बरोबर आलों. बोटीवर आमची ओळख झाली." मी त्यांना म्हणालों, "मी कोपेनहेगनला उद्यां जाणार आहें." ती म्हणाली, "मीहि उद्यांच जाणार आहें." दोघांचीहि बोट एकच होती. अर्थात् आम्ही सर्वजणच गडबडींत होतों. म्हणून बोलणें जास्त वेळ होऊं शकलें नाहीं. पण जातां जातां ती म्हणाली, "उद्यां आपण बोटीवर भेटूंच."

बेन्टीची व माझी पहिली भेट हीच. त्यानंतर बोटीवर चढल्यावर पंधरा मिनिटांच्या आंतच तिची पुन्हां गांठ पडली. या वेळीं आम्ही दोघेहि मोकळे होतों. त्यामुळें गप्पा सुरू झाल्या. मीं डेन्मार्कविषयीं खूप प्रश्न विचारून घेतले. तिनें सांगितलेली व मीं अन्य ठिकाणांहून मिळविलेली त्या देशाविषयींची माहिती मला पुढें चांगली उपयोगी पडली.

डेन्मार्क हा युरोपांतील सर्वांत लहान देश असून त्याचें क्षेत्रफळ सुमारें साडेसोळाहजार चौरस मैल म्हणजे स्कॉटलंडच्या निम्म्यानें आहे. डेन्मार्क हा देश निरनिराळ्या सुमारें पांचशें लहान मोठ्या बेटांनीं व्यापलेला आहे. मुख्य बेट जटलंड हें असून तें जर्मनीशीं दक्षिणेस जोडलेलें आहे. या बेटाची व्याप्ति डेन्मार्कच्या $\frac{3}{4}$ भागाइतकी आहे. यानंतर महत्त्वाचें बेट झीलंड हें होय. या बेटावर डेन्मार्कच्या राजधानीचें शहर कोपेनहेगन (डॅनिश भाषेंत Kobenhavn) हें वसलेलें आहे. अर्थात् पांचशें बेटांपैकीं फक्त शंभर बेटांवरच मनुष्यवस्ती आहे. दळणवळणाच्या साधनांना या बेटांमुळें थोडासा अडथळा आलेला आहे. परंतु एका बेटावरून दुसऱ्या बेटावर जाण्यास बोटींची नेहमीं रहदारी चालू असते. कांहीं बेटें रेल्वेचे मोठे पूल बांधून जोडलेलीं आहेत. विशेषतः

कोपेनहेगन हें शहर एका बेटावर असल्यामुळें तेथून इतर युरोपशीं बोटीनेंच संबंध ठेवावा लागतो. डेन्मार्कची लोकसंख्या सुमारें चाळीस लक्ष आहे. त्यापैकीं दहा लक्ष एकट्या कोपेनहेगनमध्येंच आहे.

डेन्मार्कचा इतिहास पाहूं गेल्यास १७ व्या शतकाच्या प्रारंभापासून १९ व्या शतकाच्या मध्यापर्यंत तेथें अनियंत्रित राजसत्ताच होती. परंतु १८४९ सालीं ७ वा फ्रेड्रिक या राजानें लोकांना कांहीं अधिकार दिले व त्यामुळें आज डेन्मार्कचा राज्यकारभार हा लोकनियुक्त पार्लमेंट व राजा यांच्यामार्फत चालतो. डॅनिश पार्लमेंटला त्या भाषेंत रिग्जडॅग ( Rigsdag ) म्हणतात. पार्लमेंटचे दोन भाग आहेत. एक कनिष्ठ सभागृह, त्यांत १४९ सभासद; आणि दुसरें वरिष्ठ सभागृह, त्यांत ७६ सभासद आहेत. १९१५ पासून स्त्रियांना मतदानाचा हक्क मिळाला. वयाचीं २५ वर्षें पूर्ण असलेल्या प्रत्येक व्यक्तीला मतदानाचा हक्क आहे. सोशल डेमोक्रॅट, कॉंझर्व्हेटिव्ह, लिबरल ( शेतकऱ्यांच्या हिताकडे पाहणारा ) व रॅडिकल हे प्रमुख राजकीय पक्ष आहेत.

डॅनिश भाषेचें स्वीडिश व नॉर्वेजियन भाषांशीं बरेंच साम्य आहे. डॅनिश भाषेंत दोन नवीन अक्षरें आढळतात. तीं इंग्रजींत नाहींत. एक ' डबल ए ' ( a a ) लिहितांना ' a° ' आणि दुसरें ' o–e diphthong ' लिहितांना ' ϕ ' असें लिहितात. विशेषतः ' ϕ ' हें अक्षर पुष्कळ शब्दांत आढळतें. त्याचा उच्चार ' अ ' असा करतात. ( o–e diphthong ) म्हणजे ओ–ई या अक्षरांचें संयुक्त लेखन. ) डॅनिश वाङ्मयांत जगप्रसिद्ध अशी एकच व्यक्ति आढळते. ती म्हणजे हॅन्स ॲन्डरसन. ॲन्डरसननें पुष्कळ रम्य कथा ( Fairy Tales ) लिहिल्या आहेत व त्यांचीं भाषांतरें जगांतील प्रमुख भाषांतून झालेलीं आढळतात. त्याचा जन्म ऑडेन्सी या शहरीं १८०५ सालीं झाला. वास्तविक हा चांभाराचा मुलगा, पण आपल्या वाङ्मयानें त्यानें पुष्कळ कीर्ति संपादन केली.

अशा प्रकारें बेन्टीनें मला बरीच अमोल माहिती सांगितली. आमच्या गप्पा होत आहेत तेवढ्यांत जेवणाची घंटा झाली. मी व बेन्टी जेवायला निघालों. डॅनिश अन्न घेण्याची माझी ही पहिलीच वेळ. त्यामुळें बेन्टीकडून डॅनिश जेवणाची माहिती मीं विचारून घेतली.

डेन्मार्कमध्यें अन्न भरपूर असतें. मात्र तें इंग्लंडच्या मानानें फार महाग आहे. डॅनिश लोक सकाळीं न्याहारी (ब्रेकफस्ट) घेतात. त्यास ते मॉर्गन ब्रॅड असें म्हणतात. कॉफी व पाव हीच फक्त न्याहारी; मात्र पावाचे निरनिराळे प्रकार असतात. गव्हाचे पाव, रायचे पाव असे विविध प्रकारचे पाव न्याहारीच्या वेळीं असतात. पावाबरोबर लोणी असतें. लोण्यासाठीं डेन्मार्कची ख्यातीच आहे. लोणी भरपूर व उत्तम मिळतें. डेन्मार्कमध्यें चीजसुद्धां चांगला मिळतो. तो ताजा असल्यानें त्याला एक प्रकाची गोडी असते. वास्तविक इंग्लंडमध्यें असतांना मला चीज मुळींच आवडत नसे. परंतु बोटीवर मी खास डॅनिश चीज खाल्ला व तो मला मनापासून आवडला. न्याहारीला अंडीं पाहिजे असल्यास मिळूं शकतात. त्या वेळीं ' मॉर्गन ' पूर्ण मागवायची; ती साधारण तीन शिलिंगांस मिळते.

त्यानंतर लंच दुपारीं १२ ते १ चे दरम्यान घ्यायची. लंचला डॅनिश भाषेंत फ्रूकोस्ट ( Frokost ) म्हणतात. लंचचे वेळीं सँडविचेस खाण्याची पद्धत आहे. त्यांना डॅनिश भाषेंत स्मरब्रड (Smørrebrød) म्हणतात. स्मरब्रड हें डेन्मार्कचें राष्ट्रीय अन्न म्हणण्यास हरकत नाहीं. दोन पावांच्यामध्यें मच्छी, कोंबडी, मटन, अंडीं, चीज, बटाटे वगैरेपैकीं कांहीं तरी एक घालायचें. त्यास स्मरब्रड म्हणतात. हे फारच उत्तम लागतात. असे चारपांच स्मरब्रड खाऊन वर कॉफी अगर दूध प्यायलें कीं पोटभर लंच होऊं शकते. या स्मरब्रडचें प्रस्थ डेन्मार्कमध्यें फार आहे. अशा लंचला पांचसहा शिलिंग पडतात.

त्यानंतर दुपारीं चार वाजतां चहा व केक्स घेतात. निरनिराळे उत्तम केक मिळतात. चहा दोन शिलिंगांत होतो.

दिवसांत सगळ्यांत महत्त्वाचें जेवण म्हणजे सायंकाळीं साडेसहाचें; त्याला मिड्डॅग ( Middag ) म्हणतात. सूप, मच्छी, मांस व एखादा गोड पदार्थ हे जेवणास असतात. अशा जेवणास सहा ते आठ शिलिंग सहज पडतात. मात्र कोठल्याहि रेस्टॉरंटमध्यें आपण गेलों तरी पदार्थ मागवितांना सांभाळूनच मागवावे लागतात. कारण किंमत जास्त असली तरी पदार्थ भरपूर असतात व एका वेळीं सर्व पदार्थ संपविणें अवघड जातें. १० ते १५ टक्के सर्व्हिस चार्ज ( टिप ) पडतो. इंग्लंडमध्यें तो बिलांत आकारत नाहींत. आपणहून तो द्यायचा असतो. पण युरोपांत बहुतेक सर्व देशांत बिलांतच

सर्व्हिस चार्जचा आकार लिहून बिल पुढें करतात. यामुळें निराळी बक्षिसी द्यायची गरज पडत नाहीं.

नॉर्वेंत घोड्याचें मांस खाणारे लोक मला आढळले. पण डेन्मार्कमध्यें तें सहसा कोणी खात नाहींत. भाज्या खायची पद्धत डेन्मार्कमध्यें विशेष प्रचलित नाहीं. गाई, मेंढ्या, ससे इ. साठींच भाज्या असतात असें समजतात.

डेन्मार्कचें राष्ट्रीय पेय म्हणजे बिअर. बिअरचा एक खूप मोठा कारखाना–कार्ल्स् बर्ग ब्रुअरी–कोपेनहेगनला असून जगांत सर्वांत मोठा बीअरचा कारखाना म्हणून त्याची ख्याति आहे. ती बघण्यास मिळते व पाहून झाल्यावर तुम्हांस हवी तेवढी बिअर पिण्यास देतात आणि ती–सुद्धां फुकट !

डेन्मार्कमध्यें चहा–कॉफी पिण्याची पद्धत आहे. कॉफी तितकीशी चांगली नसते. चहा दुधाशिवाय प्यावा लागतो. दूध मागितल्यास मिळतें. मात्र चहा फारच सौम्य असतो. त्यामुळें दुधाशिवाय पिण्यास तो कडू लागत नाहीं. दूध मात्र उत्तम व स्वस्त मिळतें. दूधकेंद्रें सर्वत्र आढळतात.

अशा प्रकारें अनेक तऱ्हेची माहिती बेन्टीकडून ऐकत ऐकत रात्रीचें जेवण झालें. थोडा वेळ समुद्राची हवा चाखून मी झोंपायला गेलों. झोंपण्याची व्यवस्था एका खोलींत १५–१६ लोकांची होती. कारण ऑलिंपिक सामन्यांमुळें गर्दी झाली होती. तरी पण कोणाची कुरकूर नव्हती. जो तो दुसऱ्याची सोय होईल अशा सावधगिरीनें वागत होता.

मंगळवारचा सबंध दिवस समुद्रावरच गेला. मंगळवारीं नारळीपौर्णिमा होती. नारळीपौर्णिमेला समुद्राची पूजा करतात. माझा तर सारा दिवस समुद्र-प्रवास झाला. निरनिराळया लोकांशीं डेकवर ओळखी होऊन गप्पा झाल्या. विशेषतः श्री. हयर यांची विशेष ओळख झाली. डेन्मार्कमध्यें लहान मुलांची निगा घेणाऱ्या कांहीं संस्था आहेत व अशा एका संस्थेंत ते काम करतात. डेन्मार्कमधील सामाजिक सुधारणांची व सोयींची माहिती मला होती. पण यासंबंधीं जास्त माहिती त्या संस्था प्रत्यक्ष पाहून मिळवितां आली तर बरें होईल असें मीं सुचविल्यावर श्री. हयरनीं मोठ्या आनंदानें मला कांहीं संस्था कोपेनहेगनला दाखविण्याचें कबूल केलें. " गुरुवारीं तीन वाजतां आपण भेटूं व मग मी तुम्हांला दोन-तीन संस्था दाखवीन " असें त्यांनीं कबूल केलें.

बोटीवर असतांनाच माझी आणखी एक काळजी दूर झाली. कोपेनहेगनला माझी राहण्याची सोय झाली नव्हती. विद्यार्थी–संघानें (Students' Union) "तुमची व्यवस्था आम्ही कदाचित् करूं शकूं" असें मोघम आश्वासन दिलें होतें. पण नक्की कांहींच नव्हतें. थॉमस् कुकमार्फत एखाद्या हॉटेलांत जमतें का हें बघण्याचा प्रयत्न केला होता. पण ऑलिंपिकच्या गर्दीमुळें सर्व हॉटेल्स आधींच भरलीं होतीं. त्यामुळें तेथेंहि शिरकाव होऊं शकत नव्हता. 'ट्रॅव्हल ब्यूरो' म्हणून एक संस्था कोपेनहेगनला आहे. तिच्या कचेरींत स्वतः जाऊन त्यांच्यामार्फत कांहीं सोय झाली नाहीं तर मग नाइलाजानें कोपेनहेगनचा मुक्काम सोडून तडक हॅंबुर्गला जायचें मीं ठरविलें होतें.

बेन्टीनें मला सहज विचारलें, "कोपेनहेगनला तूं कुठें राहणार आहेस?" "अजून सोय झाली नाहीं. तेथं गेल्यावर पाहूं," असें मी म्हणालों. तेव्हां ती मला लगेच म्हणाली. "मग तूं असं कर. तूं माझ्या घरींच रहायला चल. आमचं घर खूप मोठं आहे. त्यांत तुझी सहज सोय होईल." तिच्या आदरातिथ्याचें मला फार नवल वाटलें. मीं सुरवातीस आढेवेढे घेतले. पण तिनें फारच अगत्यानें आग्रह करून तिच्या घरीं माझी राहाण्याची सोय केली व त्यामुळें माझी एक मोठी काळजी दूर झाली.

बुधवारीं दुपारीं ११॥–१२ पासूनच डेन्मार्कचा किनारा दिसूं लागला. लहानसहान बेटें आसपास दिसतात. दुपारीं २–२॥ च्या सुमारास बोट बंदरांत शिरली. बंदरांत प्रवेश करण्यापूर्वी हॅन्स ॲन्डरसन या लेखकाच्या रम्य-कथांतील 'छोटी मत्स्यकन्या' (The Little Mermaid) हा पुतळा प्रथम दृष्टीस पडतो. एका दगडावर मत्स्यकन्या बसली असून समुद्रांतून जाणाऱ्या-येणाऱ्या जहाजांकडे ती पाहत आहे असें वाटतें.

बोटींतून धक्क्यावर उतरल्यावर पासपोर्टतपासणी, कस्टमची तपासणी हे ठराविक विधि झाले. मग आम्ही रस्त्यावर आलों. बेन्टीचा भाऊ आपली मोटार घेऊन आला होता. आम्ही त्या मोटारींत बसलों. समोरच राजवाडा होता. सन १७५० च्या सुमारास हा बांधण्यांत आला. राजाचा मुक्काम कोपेनहेगनला असेल तेव्हां तो तेथेंच राहातो. बाहेरच्या चौकांत पांचव्या फ्रेड्रिकचा घोड्यावर बसलेला पुतळा आहे. कोपेनहेगनच्या सर्व पुतळ्यांमध्यें

हा पुतळा अधिक सुंदर आहे अशी ह्याची ख्याति आहे. राजवाड्याबाहेर रक्षक होते. त्यांचा पोषाख आकर्षक होता.

कोपेनहेगनचें बंदर पूर्व बाजूला तर बेन्टीचें घर पश्चिम टोंकाला. त्यामुळें मोटारींतून कोपेनहेगनच्या मध्यभागांतून चक्कर झाली व आम्ही तिच्या घरीं आलों. बेन्टीचा फ्लॅट हा एका उंच घरांत तिसऱ्या मजल्यावर आहे. पांच-सहा खोल्या असून त्यांपैकीं तीन खोल्या बेन्टीच्या आईकडे आहेत. दोन खोल्या व एक स्वयंपाकघर बेन्टी व तिचे यजमान यांच्याकडे आहेत. तिची आई सध्यां घरीं नव्हती. आपल्या खेड्यांतील घरीं ती कांहीं दिवस राहायला गेली होती. बेन्टीचे यजमान सैन्यांत नोकरीला आहेत. त्यांचें नोकरीचें ठिकाण कोपेनहेगनपासून शंभर मैल दूर आहे. बेन्टीचा भाऊ शेजारच्या घरांत राहतो. त्यामुळें एवढ्या मोठ्या फ्लॅटमध्यें मी व बेन्टी असे दोघेच होतों.

दुपारचा चहा झाल्यावर मी व बेन्टी बाहेर जाण्यास निघालों. प्रथम कोपेनहेगच्या मध्यभागांतील टिव्होली नांवाच्या बगीच्यांत आम्ही गेलों. कोपेनहेगनला उत्तरेकडील पॅरिस म्हणतात; त्याची साक्ष पटते. टिव्होली हा बगीचा कोपेनहेगनचें वैभवच आहे. विशेषतः रात्रीं दिव्यांचा लखलखाट झाल्यावर त्याची शोभा अधिकच खुलून दिसते. सर्वत्र निरनिराळ्या रंगांचे दिवे दिसतात. झाडांवरहि दिवे ठेवले आहेत. बगीच्यांत मोठमोठालीं रेस्टॉरन्ट्स असून तीं दिव्यांच्या माळांनीं सुशोभित केलेलीं आहेत. कांहीं इमारती पौर्वात्य पद्धतीच्या—घुमट व चार मिनार अशा—तर कांहीं चिनी घरांप्रमाणें आहेत. करमणुकीचीं साधनें अनेक आहेत. सरोवरांवर दिव्याचा प्रकाश दिसतो. तेथें थयथय नाचणारीं कारंजीं आहेत. नृत्यगृहें, संगीतगृहें, पॅन्टोमाईन्स म्हणजे अभिनय-गृहें इत्यादींमुळें वातावरणांत एक प्रकारचा रंगेलपणा भासतो. कित्येक लोक मजा करीत इकडे तिकडे हिंडतांना दिसतात.

हा बगीचा १८४३ सालीं तयार केला व तेव्हांपासून वीस कोटींच्यावर लोक या बगीच्यांत येऊन गेले आहेत. निरनिराळ्या उघड्यावरच्या रेस्टॉरन्ट्समधून लोक खातपीत असतात व जीवनांतील आनंद उपभोगीत असतात.

या बगीच्याजवळ टाऊनहॉल स्क्वेअर हा चौक आहे. तें कोपेनहेगचें एक मध्यवर्ती ठिकाण समजलें जातें. रहदारीमुळें हा भाग फार गजबजलेला असतो. चौकाच्या एका कोंपऱ्यांत टाऊन हॉलची उंच इमारत आहे. समोर सुप्रसिद्ध ड्रेगन कारंजें, आग्नेय दिशेस एका उंच स्तंभावर तीन लोक डेन्मार्कचें राष्ट्रीय वाद्य वाजवीत आहेत असा पुतळा, वायव्येस कोंपऱ्यावरच्या घरावर आधुनिक वायुभारमापक यंत्र बसविलेलें—असें या चौकांत मोठें मनोहर दृश्य पहायला मिळतें.

रात्रीं बारा वाजेपर्यंत आम्ही टिव्होली उद्यानांत भटकलों. उद्यां येथें आणखी कांहीं गोष्टी पाहणार आहें.

माझ्या या प्रवासांत रोज नवीं माणसें, नवीं दृश्यें व नवे प्रदेश पाहायला मिळतात. रोज येणारे अनुभवहि नवनवे असतात. रोज नवता धारण करणाऱ्या रमणीयतेचें रूप पहायला मिळतें.

येथें मी अजून दोन-तीन दिवस थांचणार आहें. पुढें जर्मनीस जाणार आहें. तत्पूर्वी येथील हकीकतीचें एक पत्र पाठवीनच.

मी क्षेम आहें. माझी कोणत्याहि प्रकारची काळजी करूं नये.

ती. नाना व सौ. आई यांना शिरसाष्टांग नमस्कार.

तुझा,

**भाऊ**

* * *

**पत्र २६ वें**

## डेन्मार्कमधील कांहीं वैशिष्टयपूर्ण संस्था

॥ श्री ॥

कोपेनहेगन, दि. ८ ऑगस्ट, १९५२.

प्रिय उषा,

गुरुवारीं ( दि. ७ ला ) बेन्टीबरोबर येथील दोन सुप्रसिद्ध म्यूझियम्स पाहिल्या. बर्टेल थॉरव्हाल्डसन ( Bertel Thorvaldsen ) हा डेन्मार्कचा प्रसिद्ध शिल्पकार सन १७७० ते १८४४ च्या काळांत होऊन गेला. त्याच्या व त्याच्या शिष्यांच्या कलाकृति थॉरव्हाल्डसन वस्तुसंग्रहालयांत ठेवल्या आहेत.

डेन्मार्कचा थॉरव्हाल्डसन व नॉर्वेचा व्हिग्लंड यांच्या कलेंत फरक आढळला. व्हिग्लंडनें आपल्या कृति मानवी भावना रंगविण्यासाठीं उपयोगांत आणल्या तर थॉरव्हाल्डसननें आपल्या शिल्पकृतींना फक्त कला एवढ्या दृष्टीनें महत्त्व दिलें आहे. कोपेनहेगनची दुसरी म्यूझियम म्हणजे आर्ट गॅलरी—चित्रकला प्रदर्शन–ती पाहिल्यावर प्राचीन व अर्वाचीन डॅनिश चित्रकलेची कल्पना येते.

डॅनिश हस्तकौशल्याचें एक कायमचें प्रदर्शन, चित्रकलेचें कार्ल्सबर्ग ग्लिप्टॉटेक हें प्रदर्शन, नॅशनल म्यूझियम वगैरे आणखी कांहीं प्रेक्षणीय म्यूझियम्स येथें आहेत. पण त्या पहायला मला वेळ मिळाला नाहीं. पाहण्यासारख्या इमारती म्हणजे लॉ कोर्ट, कॅथेड्रल, युनिव्हर्सिटी बिल्डिंग, चर्च ऑफ ट्रिनिटीचा ११६ फूट उंचीचा राऊंड टॉवर आणि ख्रिश्चनबर्ग पॅलेस नांवाची पार्लमेंटची इमारत. यांखेरीज फुलांचा बाजार व कालव्याच्या कांठीं होड्यांवर भरणारा मच्छीबाजार हींहि ठिकाणें पाहण्यासारखीं आहेत.

कोपेनहेगनची सायकलींसाठीं ख्याति फार. रस्त्यांतून सर्वत्र सायकली दिसतात. गर्दीतून वाट काढून सायकल पुढें चालविण्यांत पुणेंकरांइतकेच लोक कुशल दिसतात.

येथें नव्या व जुन्या अशा दोन्ही स्थापत्यविद्येचे नमुने आढळतात. विशेषतः **स्ट्रगेट** या भागांत अरुंद रस्ते व उतरत्या छपरांचीं उंच लांकडी घरें अजूनहि दृष्टीस पडतात. ४ था ख्रिश्चन या राजाच्या काळांत (सन१५८८ ते १६४८) रोझेनबर्ग किल्ला व राऊंड टॉवर या दोन गोष्टी बांधण्यांत आल्या. कोपेनहेगनच्या नवीन भागांत मात्र सर्व आधुनिक पद्धतीचीं घरें दिसतात. रेडिओ हाऊस, मत्स्यालय (अक्वेरियम), पोलिस स्टेशन, ग्रंड्व्हिग मेमोरियल चर्च या सर्व इमारती १९ व्या–२० व्या शतकांतील आहेत. कोपेनहेगनमध्यें अनेक इमारतींवर मनोरे आहेत. आकाशांत जिकडे तिकडे मनोरेच मनोरे दिसतात. त्यामुळें या शहरास मनोऱ्यांचें शहर ( City of Towers ) म्हणायला हरकत नाहीं.

येथील बहुतेक सर्व कुटुंबें फ्लॅट्समध्यें राहात असल्याचें दिसतें. खूप मोठाल्या इमारती असून त्यांत अनेक फ्लॅट्स आहेत. कुटुंबास खाजगी जीवन व्यवस्थित कंठतां येईल अशा सर्व सुखसोयीहि आहेत. कोपेनहेगनचें आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे येथें शहराचे भाग क्रमशः पाडलेले आहेत.

आपण पुणें – १, पुणें – २ असें म्हणतों. पण येथें कोपेनहेगन–अ, कोपेनहेगन–ब असे भाग आहेत.

दुपारीं तीन वाजतां श्री. हयर यांच्याशीं भेट ठरली होती. त्याप्रमाणें त्या वेळीं त्यांची गांठ पडली. डेन्मार्कमध्यें शिशु-संगोपन-संस्था अनेक आहेत. अशी एक संस्था दाखविण्याचें त्यांनीं कबूल केलें होतें. त्यांनीं मला एका शिशु–कल्याण–गृहांत ( Child Welfare Institution मध्यें ) नेलें. या संस्थेचा पत्ता ' Gardstedet 57, Copenhagen ' असा आहे. कोपेनहेगन नगरपालिकेनें ही संस्था ६ मार्च, १९५० रोजीं उघडली. संस्थेची इमारत तीन मजली असून मोठी आकर्षक आहे. इमारतीची जागा ६७० चौरस फूट असून क्रीडांगण वगैरेसाठीं १६५७ चौरस फुटांचें मोकळें आवार आहे. ही संस्था ' कोपेनहेगन महानगरपालिकेच्या तिसऱ्या विभागा ' च्या ( The Third Department of the Corporation of Copenhagen च्या ) कक्षेंत येते ; व शिशु-कल्याण तपासणीखात्याची ( Inspectorate of Child-Welfare ची ) देखरेख या संस्थेवर असते. कामाच्या सोईसाठीं या संस्थेचे तीन विभाग पाडले आहेत :—

**पहिला विभाग– ' दि डे नर्सरी ' :—** याच्या प्रमुख चालिका मिस् सी. लर्सन ह्यांची व माझी ओळख झाली. त्यांनीं मला शाळेच्या निरनिराळ्या भागांत नेऊन कामकाज दाखविलें. यांत फक्त अडीच ते तीन वर्षें वयापर्यंतचे मुलगे व मुली असतात. विशेषतः स्त्रिया कामावर गेल्यावर त्यांच्या मुलांची काळजी घेण्यासाठीं ही शाळा आहे. सकाळीं कामावर जाण्यापूर्वीं स्त्रिया आपल्या मुलांना येथें आणून सोडतात. प्रथम मुलांचे घरचे कपडे काढून त्यांच्या अंगावर संस्थेचे कपडे चढविले जातात. आम्ही गेलों तेव्हां तेथें सुमारें पन्नास मुलें होतीं. त्यांना आंघोळ घालणें, खाऊं घालणें, तीं रडूं लागलीं तर त्यांचें समाधान करणें इ. सर्व कामें अकरा स्त्रिया करतात. त्यांपैकीं नऊ स्त्रियांची त्याच इमारतींत राहण्याची सोय आहे. दोन स्त्रिया गांवांत राहतात. आठवड्याची फी १० क्रोनर म्हणजे १० शिलिंग किंवा साडेसहा-सात रुपये. मुलांना दूध व अन्न संस्थेमार्फत पुरविलें जातें. कामावरून सायंकाळीं घरीं परत जातांना स्त्रिया आपलीं मुलें तेथून घेऊन जातात. कांहीं स्त्रियांना आपलीं मुलें रात्रींहि तेथें ठेवावीं असें वाटलें तर तशी तेथें सोय आहे.

**दुसरा विभाग—किंडरगार्टन :—** याच्या प्रमुख चालिका मिस् कॅरेन लार्सेन यांनीं मला सर्व माहिती सांगितली. तीन ते सात वर्षें वयाच्या मुलांसाठीं ही शाळा आहे. शाळेंत ६६ मुलें असून ५ स्त्रिया शिक्षिका म्हणून काम करतात. २२ मुलांचा एक असे तीन वर्ग केले आहेत. प्रत्येक वर्गाला एक स्वतंत्र खोली, कपडे ठेवण्याची जागा व स्नानगृह आहे. शिवाय सर्वांना मिळून एक जेवणाची खोली आहे. फी आठवड्यास ६ ते ९ क्रोनरपर्यंत—मुलांच्या पालकांच्या उत्पन्नाप्रमाणें—असते. त्यांत मुलांना जेवणहि मिळतें. जेवण्यास एक वेळची उत्तम लंच व दुपारीं दूध असतें. स्मरब्रड ( म्हणजे पाव व लोणी ) मुलांनीं घरून आणून त्या दुधाबरोबर खायचा. दुपारीं मुलांना विश्रांति मिळावी म्हणून झोंपण्याची व्यवस्था असते. हीं मुलें मुख्यतः खेळत असतात; चित्रांच्या साहाय्यानें त्यांना शिक्षणाचे पाठहि देतात. एखाद्या बाईनें आपल्या दोन्ही मुलांना पाठवलें तर तिला फीची सवलत मिळते. पहिल्या मुलास ६ क्रोनर, दुसऱ्यास ४॥ क्रोनर, ( तिसऱ्यास ३ क्रोनर ) अशी उतरती फी असते. डे नर्सरी व किंडरगार्टन सकाळीं ६॥ ते सायंकाळीं ५॥ पर्यंत उघडीं असतात. किंडरगार्टनचा आणखी एक प्रकार असतो—तीन ते सात वर्षें वयाचीं जीं मुलें दुबळ्या मनोवृत्तीचीं ( नर्व्हस ) किंवा बंडखोर वृत्तीचीं ( नॉटी ) असतात त्यांची देखील स्वतंत्र सोय कांहीं शाळांतून होते. अशा ठिकाणीं काम करणाऱ्या शिक्षिकांना बाल-मानस-शास्त्राचें चांगलें ज्ञान असणें आवश्यक असतें. मी पाहिलेल्या किंडरगार्टन विभागांत अशी सोय नव्हती. पण इतर कांहीं शाळांतून तशी सोय आहे असें मिस् के. लार्सेन म्हणाल्या.

**तिसरा विभाग :—** फावल्या वेळांत करण्याच्या व्यवसायाचें केंद्र ( Home for spare-time occupation ). ही संस्था शाळेंत जाणाऱ्या मुलांसाठीं आहे. जीं मुलें दिवसा शाळेंत जातात त्यांना इतर वेळीं करमणुकीचें साधन म्हणून या केंद्राचा उपयोग होतो. हीं केंद्रें सकाळीं ८ ते सायंकाळीं ५ पर्यंत उघडीं असतात. अर्थात् मुलें सर्व काळ केंद्रांत नसतात. शाळेंतून उरेल त्या फावल्या वेळांत तीं येथें येतात. अशीं १०० मुलें या केंद्रांत आहेत. फी आठवड्याला दीड क्रोनर असते. येथें येणाऱ्या मुलांना केंद्रातर्फे फक्त दूध

पुरवलें जातें. पाव व सँडविचेस त्यांनीं आपापल्या घरून आणायचे असतात. ७ ते १४ वयोमर्यादेंतील मुलें येथें घेतात. दोघे शिक्षक व दोघी शिक्षिका अशीं चार माणसें येथें काम करतात.

याशिवाय १२ ते १८ वर्षें वयाच्या मुलांसाठीं एक ' संध्या-मंडळ ' (Evening Club) या शिशु-संगोपनगृहास जोडलेलें आहे. हें मंडळ अर्थात्च फक्त सायंकाळीं उघडें असतें. २५ ओर (øre) म्हणजे ¼ क्रोनर फी एका संध्याकाळला पडते. परंतु मुलांची ती संध्याकाळ गप्पा, खेळ, गायन, वादन इत्यादि कार्यक्रमांत मजेंत जाते.

अशा तऱ्हेची ही संस्था मीं येथें पाहिली. अशा अनेक संस्था कोपेन-हेगनमध्यें व डेन्मार्कच्या इतर भागांत आहेत. या संस्थांचें काम निश्चित यशस्वी होत आहे; व त्यांची संख्या दिवसेंदिवस वाढत आहे. प्रत्येक संस्थेंत भरपूर संख्येनें बाळगोपाळ येतात. या योजनेची यशस्विता मुलांच्या चेहऱ्यां-वरून कळते. डे नर्सरींतील अडीच वर्षांपर्यंतचीं हीं बालकें सदा हंसतमुख व खेळकर दिसतात. त्यांच्या आया त्यांच्याजवळ नसूनहि तीं आनंदी दिसतात. किंडरगार्टनमधील मुलें ३ ते ७ वयाचीं—थोडीशी समजशक्ति येत चाललेलीं; पण मीं किंडरगार्टनमध्यें पाऊल टाकतांच हीं निरागस बालकें माझ्याभोंवतीं जमा झालीं. मी परका आहें हें त्यांच्या लक्षांत आलें. माझ्याशीं बोलण्याचा त्यांचा प्रयत्न चालू होता. आपल्याला डॅनिश भाषा येत नाहीं याचें मला कधीं दुःख झालें असेल तर त्या वेळीं. मला त्या मुलांशीं बोलतां आलें असतें तर केवढें सुख लाभलें असतें ! माझा कॅमेरा पाहून मुलें माझ्याभोंवतीं जमा झालीं. तुम्ही आमचा फोटो काढणार आहां का, असा एकच गिल्ला त्यांनीं केला. तीं काय म्हणत आहेत तेंच मला प्रथम कळेना. पण मिस् लार्सेननीं त्यांचें म्हणणें मला सांगितलें. मीं लगेच त्या मुलांचा एक फोटो काढला. फोटो काढून होतो न होतो तोंच आंतून एक ५ वर्षांची मुलगी धांवत आली व म्हणाली, " तुम्हीं सर्वांचा फोटो काढला, पण मी आंत होतें म्हणून माझा फोटो त्यांत आला नाहीं ! " तिच्या धिटाईचें मला कौतुक वाटलें. मग मीं तिचा एकटीचा फोटो काढला. तिचें नांव लीला (Leala). तिला तर मीं कधींच विसरणें शक्य नाहीं. या संस्थांचें काम यशस्वी रीतीनें चालतें याचा एकच पुरावा म्हणजे फोटोच्या वेळची तिची आनंदी मुद्रा !

ही संस्था पाहून झाल्यावर आणखी एका सामाजिक संस्थेंत ( Social Institution मध्यें ) श्री. हयर मला घेऊन गेले. ज्या मुलांच्या माता आजारी आहेत अशा मुलांसाठीं ही संस्था आहे. दोन ते चार वर्षें वयाचीं मुलें या शाळेंत असतात. घरीं आईच्या आजारपणामुळें त्यांची आबाळ होऊं नये म्हणून सरकारतर्फे त्यांची सोय होते. येथें दहा स्त्रिया चाळीस मुलांची निगा घेत असल्याचें दृश्य पाहायला मिळालें. या संस्थेचीं माहितीपत्रकें व कांहीं फोटो श्री. हयरनीं मला दिले. नंतर आम्ही गांवांत गेलों, चहा घेतला, व मीं श्री. हयर यांचे आभार मानून त्यांचा निरोप घेतला.

बेन्टीची व माझी गांठ बोटीवरच पडली होती. तत्पूर्वी आमची ओळखहि नव्हती. त्यामुळें मी तिच्या घरीं उतरणार आहें याची तिला पूर्वकल्पना नव्हती. गुरुवारीं सायंकाळीं तिला कोपेनहेगनपासून २५-३० मैलांवर कांहीं कामासाठीं जायचें होतें. तेथून ती शनिवारीं परत येणार होती. काम महत्त्वाचें होतें. आधींपासून योजना आंखली होती. त्यामुळें तिला बेत रद्द करतां येईना. म्हणून तिनें घराच्या सर्व किल्ल्या मजजवळ देऊन सारें घर माझ्या स्वाधीन केलें. मीं गुरुवारची रात्र व शुक्रवारचा सबंध दिवस आणि रात्र एकट्यानेंच त्या घरीं काढली. शनिवारीं सकाळीं उजाडतांच मी कोपेनहेगन सोडणार होतों. बेन्टी शनिवारीं दुपारीं परत येणार होती. त्यामुळें मीं डेन्मार्क सोडण्यापूर्वी आमची पुन्हां भेट होणेंहि शक्य नव्हतें. वास्तविक मी परदेशी मुशाफीर, आमची ओळखसुद्धां दोन दिवसांचीच; पण सारें घर माझ्या स्वाधीन करून तिनें मला एकट्याला आपल्या घरांत राहूं दिलें! केवढा हा विश्वास! खरोखर मला फार नवल वाटलें. आणि हें सारें तिनें कशासाठीं केलें तर एका हिंदी मुलाशीं मैत्री असावी एवढ्यासाठीं. निरोप घेतांना तिनें मला बजावलें, "ओळख विसरायची नाहीं हं! आणि पत्रव्यवहारहि चालू ठेवायचा. नमस्ते!"—डॅनिश लोक किती आदरातिथ्य करतात याची साक्ष या एका गोष्टीवरून पटण्याजोगी आहे.

शुक्रवारीं मला डेन्मार्कमधील एक लोकशाळा ( Folk High School ) पाहण्याची संधि मिळाली. या संस्थेसंबंधीं बरीच हकीगत मीं हिंदुस्थानांत असतांनाच ती. नानांच्या तोंडून ऐकली होती. अशी एखादी शाळा मला पाहायला मिळाली तर बरें, असें मी बेन्टीला म्हणालों. तेव्हां तिनें गांवाला

जाण्यापूर्वी ती शाळा मला पाहायला मिळेल अशी व्यवस्था केली. कोपेनहेगनच्या उत्तरेस सुमारें २२ मैलांवर हिलेरड या गांवीं अशी एक शाळा आहे. सकाळीं ९-१८ च्या गाडीनें मीं कोपेनहेगन सोडलें व १०-१५ ला हिलेरडला पोंचलों. प्रथम त्या शाळेला फोन केला. शाळा–प्रमुखांनीं तो घेतला. शाळा बघण्याची माझी इच्छा असल्याचें मीं त्यांना सांगितलें. त्यावर ते फोनवरून म्हणाले, "अगदीं आनंदानें दाखवूं. तुम्ही लंचलाच येथें या. लंच झाल्यावर आमचे एक शिक्षक तुम्हांला सर्व शाळा दाखवतील व सगळी माहिती सांगतील." त्याप्रमाणें मी शाळेंत गेलों. शाळेंतील एक शिक्षक श्री. विल्यम नीलसेन यांनीं लंच झाल्यावर मला सर्व शाळा दाखविली व माझ्या प्रश्नांचीं समाधानकारक उत्तरें दिलीं. शेवटीं त्यांनीं या लोकशाळेची माहिती देणारीं पुस्तकें व चित्रें मला दिलीं. त्यांनीं सांगितलेली माहिती मनोरंजक व उपयुक्त आहे. तिचा सारांश असा :—

लोकशाळांच्या कल्पनेचा जनक एन्. एफ्. एस्. ग्रंडव्हिग् ( १७८३–१८७२ ) हा होय. त्याच्या मतें मुलांना धंदे–शिक्षण व जीवनोपयोगी ज्ञानाचें शिक्षण लहानपणीं देण्यापेक्षां मुलानें जीवनांत पदार्पण करून आयुष्याचा थोडाफार प्रत्यक्ष अनुभव घेतल्यावरच तें त्याला देण्यांत जास्त फायदा आहे. डेन्मार्कमध्यें ७ ते १४ या वयांत शिक्षण सक्तीचें आहे. त्यानंतर बहुतेक विद्यार्थी शेतकाम किंवा इतर व्यवसाय करतात. त्या क्षेत्रांत त्यांनीं ४ वर्षें काम केल्यावर त्यांना प्रौढत्व प्राप्त होतें. यानंतर त्यांना जीवनोपयोगी शिक्षण दिल्यास त्याचा जास्त उपयोग होईल. या कल्पनेचा पुरस्कार ख्रिश्चन कोल्ड यानें केला. ( त्याचा काळ १८१६–७० हा होय. ) १८४४ सालीं अशी पहिली शाळा उघडण्यांत आली. वयाचीं १८ वर्षें पूर्ण झाल्यानंतरच या शाळेंत प्रवेश मिळूं शकतो. जगाचा व विशेषतः डेन्मार्कचा इतिहास, अंकगणित, नागरिकशास्त्र, आरोग्य, वाङ्मय व व्यायाम हे येथें सक्तीचे विषय असून शेती, चित्रकला, धार्मिक शिक्षण, अर्थशास्त्र, आणि स्त्रियांसाठीं शिवणकाम व भरतकाम हे ऐच्छिक विषय आहेत. ज्या वेळीं या शाळा निघाल्या त्या वेळीं ८० टक्के लोक शेतींत होते व साधारणपणें नोव्हेंबर ते एप्रिल या महिन्यांत शेतकऱ्यांना कामाची स्वस्थता असे. त्यामुळें १ नोव्हेंबर ते १ एप्रिल या अवधींत शाळा भरत. शिवाय स्त्रियांना १ मे ते १ ऑगस्ट या कालांतहि

शिक्षण मिळे. विद्यार्थ्यांना व्यावसायिक शिक्षण तर द्यावयाचेंच, पण त्यांचें व्यक्तिमत्त्व वाढवून डेन्मार्कचा एक आदर्श नागरिक बनविण्यासाठीं जें ज्ञान आवश्यक आहे तेंहि द्यावयाचें. जगाच्या रोजच्या व्यवहाराची माहिती नागरिकाला असावी व डॅनिश संस्कृतीचा अभिमान त्याला वाटावा यासाठीं इतिहास व नागरिकशास्त्र हे विषय अभ्यासक्रमांत ठेवले आहेत. सर्व अभ्यासक्रम डॅनिश भाषेंतच असल्यामुळें डॅनिश भाषेचा अभिमान जागृत होईल. त्याचप्रमाणें देशाचे हे घटक एकत्र राहत, एकत्र जेवत व एकत्र अभ्यास करून गप्पा मारीत; त्यामुळें राष्ट्रीय वृत्ति त्यांच्यांत बाणत असे. म्हणूनच या शाळांतून राष्ट्राची जबाबदारी उत्तम तऱ्हेनें पेलणारे नागरिक निर्माण झाले. आज डेन्मार्कमध्यें अशा १०० शाळा असून त्यांतून ५००० विद्यार्थी दरवर्षी शिक्षण घेत आहेत. शिक्षणाची फी दरमहा १७० क्रोनर (सुमारें १७० शिलिंग) आहे. त्यांत राहण्याचा व जेवणाचा खर्च येतो. जर विद्यार्थ्याच्या पालकाचें उत्पन्न कमी असेल तर सरकारांतून मदत होऊं शकते. सरकार जास्तींत जास्त ⅔ मदत करतें.

व्यक्तींनीं किंवा संस्थांनीं सर्व शाळा खाजगी रीतीनें चालविलेल्या आहेत. पण त्यांना सरकारी मदत मिळते. शिक्षकांचा अर्धा पगार सरकार देतें. इमारतीच्या दुरुस्तीसाठीं ३० टक्के खर्च सरकार देतें व शिक्षणाच्या साहित्याचा (पुस्तकें इ०) ३० टक्के भाग सरकारकडून मिळतो. १८ वर्षांच्या आंत प्रवेश मिळत नाहीं. साधारणपणें २०-२१ वर्षें वयाचीं मुलें शाळेंत येतात. क्वचित् २८-३० वर्षें वयाच्या तरुणतरुणीहि आढळतात. सुटीमध्यें साप्ताहिक वर्ग भरवले जातात. लहानपणीं जे लोक या शाळांतून शिकून गेले त्यांच्या उजळणीचे वर्ग म्हणून हे वर्ग भरतात. मी तेथें गेलों तेव्हां असाच एक वर्ग चालू होता. ४०–४५ वर्षें वयाचे सुमारें २०० स्त्रीपुरुष या वर्गासाठीं आले होते.

या विद्यालयांची यशस्विता निराळी सांगायला नकोच; कारण या योजनेची जगभर स्तुति होत आहे. श्री. नीलसेन यांनीं मला शाळेच्या पद्धतींतला एक दोष सांगितला. ज्या वेळीं या शाळा निघाल्या त्या वेळेस डेन्मार्कमध्यें ८० टक्के लोक शेतींत होते. त्यामुळें त्या वेळीं साहजिकच अशा शाळांतून शेतकरी अधिक असत. या शाळा प्रमुखत्वें शेतकऱ्यांसाठीं असत.

पण आतां परिस्थिति बदलली आहे. सध्यां शेतींत फक्त २६ टक्के लोक आहेत. उद्योगधंद्यांची वाढ झाली आहे. पण अजूनहि या शाळांतून शेतकरीच जास्त येतात. इतर व्यवसायांतील लोकांना या शाळा आपल्यासाठीं आहेत असें वाटत नाहीं. वास्तविक या धंदेशाळा असल्या तरी त्या शेतीप्रमाणेंच इतर उद्योगधंद्यांसाठींहि आहेत. प्रत्येक धंद्यांतील व्यक्तीला त्याच्या धंद्याचें शिक्षण तर द्यायचेंच, पण त्यापेक्षांहि त्याला उत्कृष्ट नागरिक बनविण्याच्या दृष्टीनें जें शिक्षण आवश्यक आहे तेंहि द्यायचें असें या शाळांचें धोरण आहे. तें अजून सर्व नागरिकांच्या लक्षांत येत नाहीं, एवढाच या पद्धतींत दोष राहिला आहे.

शाळेच्या इमारतीपासून ८–१० मैलांवर एक दुग्ध-केंद्र (डेअरी फार्म) आहे. तेथें विद्यार्थींची सफर होती. डेअरी फार्म्ससाठीं डेन्मार्क प्रसिद्ध आहे. शाळेचे मुख्याध्यापक मला म्हणाले, "या विद्यार्थ्यांच्याबरोबर तुम्हांला जायचें असेल तर तुम्ही जाऊं शकतां." —केवढी मोठी संधि आली होती! पण या सहलीस गेल्यास रात्रीं ७ पर्यंत कोपेनहेगनला परत येणें शक्य नव्हतें; आणि मला तर सायंकाळीं ५ च्या आंत कोपेनहेगनला येणें जरूरीचें होतें. दुसऱ्या दिवशीं सकाळीं ६ च्या गाडीनें मी हॅंबुर्गला जाणार होतों. त्यासाठीं सायंकाळीं ५ च्या आंत थॉमस् कुकच्या कचेरींत तिकिट रिझर्व्ह करायचें होतें. ती कचेरी ५ ला बंद होते. डेन्मार्कचें डेअरी-फार्म पाहण्याची संधि हुकली याची हळहळ वाटली.

हिलेरडला एक सुप्रसिद्ध राजवाडा आहे. त्याचें नांव फ्रेड्रिक्सबर्ग स्लॉट. एक तासभर राजवाडा पाहण्याइतका मला वेळ होता. "हा राजवाडा पाहिल्याशिवाय हिलेरडहून परतूं नकोस" असें बेन्टीनें मला बजावलें होतें. ४ था ख्रिश्चन या राजाच्या कारकीर्दींत (१६०२–२०) हा राजवाडा बांधण्यांत आला. त्यानंतर १९ व्या शतकांत त्याची बरीच दुरुस्तीहि झाली. निरनिराळें फार्निचर, चित्रें, दिवे, इत्यादींनीं अनेक खोल्या सजविल्या होत्या. विशेषतः राजवाड्यांत एक प्रार्थनामंदिर असून तें प्रेक्षणीय आहे. १००१ पाइप्स असलेलें १६१२ सालीं बनविलेलें ऑर्गन (एक वाद्य) तेथें आहे.

हिलेरडच्या ईशान्येस १५ मैलांवर एल्सीनोर हें गांव आहे. तेथें क्रोन-बर्ग हा किल्ला असून त्याच किल्ल्यांत शेक्सपिअरच्या हॅम्लेट नाटकाची कथा

घडलेली आहे. या किल्ल्याच्या प्रांगणांत आंग्ल नट-नटींनीं हॅम्लेटचे अनेक प्रयोग केले आहेत. पण मला वेळ अजीबात नव्हता म्हणून नाइलाजानें त्या शहरास जाण्याची कल्पना रद्द करावी लागली व मी कोपेनहेगनला परतलों.

डॅनिश लोकांसंबंधीं चार शब्द लिहायला हवेत. मिसेस् बेन्टी व मिस्टर हयर या डॅनिश व्यक्तींची व माझी चोटीवरच ओळख झाली, पण त्या दोघांनींहि कमालीचें अगत्य दाखविलें. हिलेरडला लोकशाळा दाखविण्याची जी आस्था तेथील शिक्षकांनीं दाखविली तीहि प्रशंसनीयच आहे. डॅनिश लोकांशीं थोडा जरी संबंध आला तरी लगेच जेवणाचें नाहीं तर चहाचें आमंत्रण मिळालेंच म्हणून समजा. पुष्कळ डॅनिश लोकांना इंग्रजी येतें, त्यामुळें भाषेची अडचण पडत नाहीं. शाळेंत जाणाऱ्या प्रत्येक मुलाला आपल्या मातृभाषेव्यतिरिक्त इंग्रजी, फ्रेंच व जर्मन या भाषा शिकविल्या जातात. शिवाय स्वीडिश व डॅनिश या भाषांत बरेंच साम्य असल्यामुळें बहुतेक डॅनिश लोकांना स्वीडिश भाषा येतेच.

वृत्तपत्रवाचनाची दांडगी आवड डेन्मार्कमध्यें दिसते. डॅनिश लोक हे फार नम्र वृत्तीचे आढळतात. दोघे जण भेटले कीं हॅट काढून एकमेकांस अभिवादन करतील व हस्तांदोलन करतील. स्टेशनमास्तर अगर पोलिस यांचा उल्लेख हेर ( Herr म्हणजे श्रीयुत ) असा करतात. जसें, हेर स्टेशन-मास्तर, हेर पोलिसमन.

कोपेनहेगनमध्यें उघड्यावरील रेस्टॉरंट्स अनेक आढळतात. खूप रुंद अशा फूटपाथवरील अर्ध्या भागावर रेस्टॉरंटच्या खुर्च्या टाकलेल्या असतात. त्यांतून लोक बिअरचे ग्लासच्या ग्लास फस्त करीत गप्पा मारतांना आढळतात. पण इंग्रजी वातावरणांत वावरणाऱ्या प्रेक्षकांना या गोष्टीचें नवल वाटतें.

उद्यां मी माझा इथला मुक्काम हालवून जर्मनीस जाणार आहें. युद्ध-पूर्वकालीन जर्मनी व युद्धोत्तरकालांतील जर्मनी यांतील स्थित्यंतर जाणण्याची मला तीव्र इच्छा आहे. त्याविषयींचे माझे अनुभव पुढील पत्रांतून कळवीनच.

ती. नाना व सौ. आई यांना शिरसाष्टांग नमस्कार.

तुझा,

**भाऊ**

* * *

पत्र २७ वें

# युद्धोत्तर जर्मनी

॥ श्री ॥

हॅंबुर्ग ( जर्मनी ), दि. १० ऑगस्ट, १९५२.

प्रिय उषास सप्रेम आशीर्वाद.

शनिवार दि. ९ ला सकाळीं सहाच्या 'स्कॅंडिनेव्हीयन हॉलंड एक्सप्रेसनें' मी कोपेनहेगन सोडून जर्मनीस येणार होतों. पहांटे पावणेपांचला उठणें आवश्यक होतें. घरांत मी एकटाच होतों. त्यामुळें जाग येईल कीं नाहीं याची शंकाच होती. पण बेन्टीनें कोणाला तरी सांगून ठेवलें होतें; व पावणेपांचला टेलिफोनची घंटा वाजण्याची सोय झाली होती. टेलिफोनच्या गजरानें मी जागा झालों. प्रातर्विधि उरकून घर बंद करून घराच्या किल्ल्या मिसेस् बेन्टीनें सांगितल्याप्रमाणें शेजारच्या बिन्हाडकरूकडे देऊन निघालों. गाडीला फारशी गर्दी नव्हती. कोपेनहेगन ते कोर्सर हा प्रवास दीड तासाचा झाला. कोर्सर येथें झीलंड बेट संपतें. मध्यें एक मोठी खाडी आहे. ती चारपांच मैल रुंद आहे. मग दुसरें बेट फ्युनेन लागतें. या दोन्ही बेटांना जोडणारा पूल नाहीं. त्यामुळें गाडींतून खालीं उतरावें लागलें व बोटीनें ही खाडी ओलांडावी लागली. खाडी ओलांडण्यास दीड तास लागला; व दुसऱ्या टोंकास निबर्ग येथें पोंचलों. तेथें पुन्हा दुसऱ्या गाडींत बसलों. या गाडींत जागा रिझर्व्ह करणें भाग असतें. गर्दी नसते पण एक क्रोनर देऊन रिझर्व्हेशन होतें. तें आधीं केलें नाहीं तरी चालतें. गाडींत बसल्यावरहि पैसे वसूल करून घेतात. फ्यूनेन व जटलंड या बेटांना जोडणारा असा एक रेल्वेचा पूल आहे. हा प्रेक्षणीय पूल ओलांडून जटलंडमध्यें प्रवेश केल्यावर फ्रेड्रीशिया हें गांव लागलें. पावणे अकरा वाजतां गाडीनें हें स्टेशन सोडलें व साडेबारा वाजतां पॅडबर्ग या सरहद्दीच्या गांवीं आलों. पासपोर्टवर डेन्मार्क सोडल्याचें नमूद करण्यांत आलें. कस्टमची तपासणी झाली पण बॅग्ज उघडण्याची पाळी आली नाहीं. एकच्या सुमारास पॅडबर्ग सोडल्यावर डेन्मार्कची हद्द संपली. थोड्याच वेळांत फ्लेन्सबेर्ग या जर्मन हद्दींतील पहिल्या शहरीं गाडी येऊन दाखल झाली. एके

काळीं जगाला आव्हान देणाऱ्या देशांत आपण आलों ही भावना एकदम मनांत येऊन गेली.

जर्मनीची भौतिक शास्त्रांतील प्रगति सर्वश्रुत आहे. स्थापत्यशास्त्राचें कौशल्य जर्मनींत प्रवेश केल्यावर थोड्याच काळांत नजरेस आलें. जर्मनींतील कील कालवा हा सर्वांना ऐकून माहीत आहे. डेन्मार्कभोंवतीं वळसा घालून जहाजें नेण्याचा त्रास वांचावा म्हणून हा कालवा खणण्यांत आला. त्या कालव्यावर एक प्रेणक्षीय पूल आहे. खूप उंच ( खालून जाणाऱ्या जहाजांना अडथळा होऊं नये म्हणून ) व खूप लांब असा हा पूल आहे. तो पाहण्यासाठीं डब्यांतील सारे लोक उठून खिडकीजवळ आले. कांचेच्या खिडक्या वर करून माना बाहेर काढून लोक पाहत होते.

बरोबर साडेतीन वाजतां गाडी हँबुर्गच्या स्टेशनांत शिरली. हँबुर्गच्या विद्यार्थी-मंडळामार्फत ( Students' Union ) माझी तेथें राहण्याची सोय होणार होती. मंडळाचा फोननंबर मजजवळ होता. एका जर्मन गृहस्थाच्या मदतीनें प्रथम मीं तेथें फोन केला. तेथील चिटणिसानें फोन घेतला. आमचा पत्रव्यवहार अगोदर झालाच होता. त्यामुळें लगेच त्यांनीं मला अमुक अमुक ट्रॅमनें आमच्या कचेरींत या असें सांगितलें. त्याप्रमाणें मी तेथें गेलों. बहुतेकांना इंग्रजी समजतें. त्यामुळें हा पत्ता शोधून काढण्यास मुळींच त्रास झाला नाहीं. चिटणिसांनीं मला हँबुर्गचा नकाशा आणि जर्मनींत व विशेषतः हँबुर्गला बघण्यासारखें काय आहे याचीं माहितीपत्रकें दिलीं. नंतर डॉ. व मिसेस् सीव्हेर्स या जर्मन कुटुंबाचा पत्ता दिला व तेथें माझी राहण्याची सोय झाल्याचें सांगितलें. हें घर जवळच होतें; म्हणून मी चालतच गेलों. मिसेस् सीव्हेर्स माझी वाटच पाहत होत्या. हंसतमुखानें त्यांनीं माझें स्वागत केलें. त्यांना इंग्रजी बोलतां येत होतें व बोललेलें समजतहि होतें. पण पुष्कळ दिवसांची संवय नसल्यामुळें त्या कचरत होत्या, एवढेंच. त्यांनीं माझी डॉ. सीव्हेर्स यांच्याशीं ओळख करून दिली. ते हँबुर्ग हायकोर्टाचे जज्ज आहेत. त्यांचा मुलगा हा जवळजवळ माझ्याएवढाच असेल. तो वकिलीच्या धंद्यांत पडला होता. याशिवाय त्यांचे एक मित्र डीटर लाऊएन्स्टाईन हेहि सध्यां त्याच घरांत राहत होते. ते मूळचे बर्लिनचे, पण काहीं कामासाठीं दोन-तीन महिन्यांपुरते हँबुर्गला आले होते. गेल्याबरोबर या सर्वांची व माझी

ओळख झाली. ऑलिंपिक सामने संपवून माझ्या इंग्लंडच्या वाटेवर तीनचार दिवस जर्मनींत घालवून जर्मनीविषयीं जास्त माहिती समजून घेण्याच्या दृष्टीनें मी येथें आलों असें मीं त्यांना सांगितलें. विशेषतः लाऊएन्स्टाइन हे फारच अगत्यशील गृहस्थ वाटले. त्यांचें वय पन्नाशीच्या आसपास असेल. ते म्हणाले, " चला तर मग, आपण हँबुर्गमध्यें फेरफटका मारून येऊं. मला संध्याकाळचा वेळ मोकळाच आहे. मी तुम्हांला सर्व माहिती सांगतों. " मला पाहिजे होतें तेंच मिळालें. एका अनुभवी जर्मन गृहस्थाची सोबत मिळाली. आम्ही सायंकाळीं ५ वाजतां बाहेर पडलों ते रात्रीं ११ ला परत आलों. हँबुर्ग शहराचा भाग तर पाहिलाच पण त्याशिवाय जर्मनींतील गेल्या १०-१२ वर्षांतील घडामोडींची इत्थंभूत हकिकत ऐकायला मिळाली. माझ्या प्रश्नांचीं श्री. लाऊएन्स्टाइन यांनीं सविस्तर उत्तरें दिलीं आणि त्या-बरोबरच इतर आनुषंगिक माहितीहि सांगितली. त्याशिवाय ' जर्मन फेडरल मिनिस्ट्री फॉर द मार्शल प्लॅन ' या खात्यानें प्रसिद्ध केलेल्या ' गेट वे टु जर्मनी ' या पुस्तिकेवरून मला जास्त आंकडेवार माहिती मिळाली. ही सर्व माहिती एकत्रित करून पुढीलप्रमाणं मांडतां येईल.

राजकीय दृष्टया जर्मनीचे चार तुकडे झाले असले तरी सर्व मिळून जर्मनीचा आकार हा सुमारें १३६॥ हजार चौरस मैल भरेल. एकूण लोकसंख्या अंदाजें ६ कोटी ८० लक्ष आहे. जर्मन सरहद्द ही निरनिराळ्या नऊ राष्ट्रांनीं वेढलेली आहे.

भौगोलिक दृष्टया जर्मनीचे तीन भाग पडतात. उत्तरेचा सखल प्रदेश, मध्यवर्ती डोंगराळ प्रदेश व दक्षिणेस आल्प्स पर्वताजवळचा प्रदेश. सृष्टि-सौंदर्याच्या दृष्टीनें उत्तरेच्या सखल प्रदेशांत पाहण्यासारखें कांहीं नाहीं. माझा सर्व प्रवास बहुतेक याच भागांतून झाला. या प्रदेशांतून एम्स, वेसर, एल्ब, ओडर या चार महत्त्वाच्या नद्या वाहतात. त्यामुळें उत्तर भागांत प्रसिद्ध बंदरें वसलीं आहेत. शेती व उद्योगधंदे यांचें मिश्रण या भागांत बरेंच आढळतें. शेतकरी एकीकडे जमीन नांगरतो असें दिसेल तर पाठीमागच्या बाजूस कारखान्याच्या धुराड्यांतून धूर निघतांनाहि दिसेल. रूर.हा प्रदेश वायव्येस असून तो उद्योगधंद्यांसाठीं प्रसिद्ध आहे.

मध्यवर्ती डोंगराळ प्रदेशांत सृष्टीची विविधता आढळते असें म्हणतात. माती व दगड यांची भिन्नता आढळते व म्हणून भूगर्भशास्त्रज्ञांचें या भागाकडे विशेष लक्ष केंद्रित झालें आहे.

दक्षिणेकडील आल्पसच्या उंच भागांतून प्रसिद्ध डॅन्यूब नदी वाहते. या प्रदेशांत कांहीं उत्कृष्ट सरोवरें आहेत. या भागांत प्रवाशांची गर्दी असते.

जर्मनीचा ऱ्हाइन हा नद पश्चिम भागांतून वाहत जातो. यास 'जर्मन नद्यांचा पिता' (Father of German Rivers) असें म्हणतात. या नदाच्या कांठच्या 'कृष्णारण्य' (Black Forest) या भागांत व त्यापेक्षांहि उत्तरेस फारच रम्य वनश्री आहे. दोन्ही बाजूंस उंच पर्वत व त्यांच्या उतारावर द्राक्षांचे मळे, लहान लहान शहरें व या सर्वांच्या पुढें ठाकलेलें सृष्टिसौंदर्य असें मोठें नयनरम्य वातावरण तेथें आढळतें. मला तेवढासा वेळ नसल्यामुळें त्या भागांत जातां आलें नाहीं.

हवेच्या दृष्टीनें जर्मनी हिंवाळयांत खूप थंड व उन्हाळयांत खूप ऊष्ण असतो, असें मला सांगण्यांत आलें. पण मी गेलों तेंव्हां हवा बरीच सौम्य वाटली. उन्हाळयाचा त्रास झाला नाहीं. कारण इंग्लंडच्या मानानें हवा ऊष्ण असली तरी भारतांतील उन्हाळयापुढें ही हवा सौम्यच वाटेल. पावसाचा त्रास कुठें झाला नाहीं. फक्त एका सायंकाळीं हॅंबुर्गला खूप जोराचें वादळ होऊन पर्जन्यवृष्टि झाली, एवढेंच.

सध्यां जर्मनीला भौगोलिक विभागांपेक्षांहि राजकीय भागांच्या दृष्टीनें जास्त भिन्नता आली आहे. युद्धानंतर सारी परिस्थिति एकदम पालटली आहे. युद्धांत जर्मनीची जी अपरिमित हानि झाली तिचें दृश्य स्वरूप अजूनहि आढळतें. युद्धांत जर्मनीचे ३० लक्ष सैनिक मृत्यु पावले, २९ लक्ष बेपत्ता झाले, ५० लक्ष जखमी झाले, ३५ लक्ष युद्धकैदी झाले, आणि २५ लक्ष बायकामुलें व म्हातारी माणसें बॉम्बहल्लयांस बळी पडलीं. यावरून जी मनुष्यहानि झाली तिची कल्पना येते. सर्वत्र अंदाधुंदी माजली, राज्यकारभार ढांसळला व पोलीसव्यवस्था कोलमडली. अन्नाचा तुटवडा, रोगराई व लुटालूट यांनीं हल्लकल्लोळ माजला तो निराळाच. सर्व कारखाने बॉम्बहल्लयांत बेचिराख झाले व युद्धांतील सैनिक परत आले—त्यामुळें बेकारीचा बकासुर भेडसावूं लागला. देशांतील मालाचा सांठा संपला होता, थोडा फार होता तो

बॉम्बहल्ल्यांत भस्मसात् झाला होता. नवा माल विकत घ्यावा तर बाजारांत जिन्नस शिल्लक नव्हता. घरादारांची हानि तर अफाट झाली होती. मोठमोठ्या शहरांतून एखादें शाबूत असलेलें घर आढळणें अशक्यच होतें. लहानसहान खेडयांनाहि हा बॉम्बचा प्रसाद मिळाला होता. हँबुर्गमध्यें अनेक नवीं घरें दिसतात. जुन्या पडक्या घरांचे अनंत अवशेषहि आढळतात. गाडीनें प्रवास करतांना दुतर्फा पडक्या घरांचे सांगाडे दिसतात. कांहीं ठिकाणीं तर पडलेल्या इमारतींचे अवशेष उचलण्याचें काम अजूनहि पुरें झालें नाहीं. हँबुर्ग बंदर आतां पुष्कळच बांधलेलें आहे. पण प्रत्यक्ष युद्धांत त्या ठिकाणीं कांहींच शिल्लक राहिलें नव्हतें असें सांगतात. अमेरिकन सैनिकांनीं किती अतोनात बॉम्बवृष्टि केली असेल याची यावरून स्पष्ट कल्पना येऊं शकेल.

युद्धसमाप्तीनंतर जर्मनीचे तुकडे तुकडे झाले. ओडर व नाइस या नद्यांच्या पूर्वेकडील प्रदेश पोलंडला मिळाला, कोनिग्जबर्ग हें शहर व त्याच्या आसपासचा प्रदेश रशियाला जोडण्यांत आला. सार प्रदेश हा आर्थिक दृष्टया व राजकीय दृष्टया अलग झाला. उरलेल्या प्रदेशाचे चार तुकडे करून ते रशिया, अमेरिका, फ्रान्स व ब्रिटन यांच्या स्वाधीन करण्यांत आले. ब्रिटनला उत्तरेचा प्रदेश, रशियाला मध्यभाग, अमेरिकेला दक्षिण भाग व फ्रान्सला पूर्व भाग अशी विभागणी झाली. त्यांत परत १ कोटी ४ लक्ष जर्मन निर्वासीत पूर्व अशिया व इतर भागांतून जर्मनींत आले. यामुळें या सर्वांच्या पोषणाचा प्रश्न उद्‌भवला.

या सर्व आपत्तींतून वर येण्यासाठीं जर्मन लोकांनीं पुन्हां कष्ट करण्यास सुरवात केली. २३ मे १९४९ रोजीं ब्रिटिश, अमेरिकन व फ्रेंच विभागांचें राजकीय व आर्थिक दृष्टया एकीकरण करण्यांत येऊन 'जर्मन फेडरल रिपब्लिक'ची स्थापना झाली. त्याचा प्रमुख हा प्रेसिडेंट असून पार्लमेंटमधील बहुमतवाल्या पक्षांतील लोकांचें कॅबिनेट बनविण्याची विनंती तो त्या पक्षाच्या प्रमुखास करतो. कॅबिनेटचा प्रमुख हा चॅन्सेलर असतो. जर्मन फेडरल रिपब्लिकचे आठ भाग असून त्यांना लॅंडर ( Lander ) म्हणतात. त्यांना बऱ्याच बाबतींत स्वायत्तता आहे. पहिले प्रेसिडेंट हे प्राध्यापक थिओडॅर हॉयस हे असून पहिले चॅन्सेलर डॉ. कोन्‌राड् आडेन औअर हे आहेत. पार्लमेंटमधील सध्यांचे प्रमुख पक्ष म्हणजे ख्रिश्चन डेमोक्रॅटिक युनियन ( डॉ.

आडेन औअर हे प्रमुख), सोशल डेमोक्रॅट्स, फ्री डेमोक्रॅटिक पार्टी (प्राध्यापक हॉयस हे त्या पक्षाचे प्रमुख ), फेडरल युनियन पार्टी आणि जर्मन पार्टी हे होत. पश्चिम बर्लिनला स्वतंत्र लेंडरचा दर्जा मिळाला नसून एका लेंडरमध्यें प्रतिनिधि पाठवितां येतात.

फेडरल रिपब्लिकची राजधानी बोन ( Bonn ) या शहरीं आहे. हें शहर कोलनजवळ आहे. जर्मनीचें राष्ट्रीय निशाण काळया, तांबड्या व सोनेरी अशा तीन रंगांच्या तीन पट्टयांचें बनविलें आहे. अशा रीतीनें फेडरल रिपाब्लिकची स्थापना झाल्यावर जर्मनीच्या पुनर्निर्मितीस जोरानें सुरवात झाली.

गॅरिओआ ( Garioa, म्हणजे Government and Reconstruction in occupied Areas ) च्या मदतीनें अन्नधान्य, औषधें व कापड यांची टंचाई दूर होत आहे. १ जून १९४८ मध्यें चलनविषयक सुधारणा ( Currency Reform ) होऊन आर्थिक स्थैर्य वाढविण्याचे प्रयत्न चालू झाले. त्याच सुमारास मार्शल प्लॅनची योजना होऊन उद्योगधंद्यांचें पुनरुत्थान करण्याचें ठरलें. या तीन गोष्टींमुळें जर्मनी पुन्हां वर येऊं लागलेला दिसतो.

मार्शल प्लॅनमुळें भांडवल व कच्चा माल यांचा जर्मनीला पुरवठा होऊं लागला. १९३६ सालीं कारखान्यांतील उत्पन्न १०० धरल्यास १९४९ सालीं तें ८० च्या खालीं गेलें होतें. १९५० च्या सुरवातीस तें पुन्हां १०० पर्यंत झालें व १९५१ सालच्या शेवटीं तें १४० च्या वर होतें. यावरून उद्योगधंद्यांची झालेली वाढ लक्षांत येईल. कोळसा खणून बाहेर काढण्याची मर्यादा १९५१ सालीं युद्धपूर्वकालाइतकी पोंचली. मोटार तयार करण्याचें मान एका वर्षांत चढलें. १९५० सालीं २,२६,१०८ मोटारी बाहेर आल्या तर १९५१ सालीं २,६७,३६०!

व्यापारांतहि अशीच प्रगति झाली. शेतीच्या दृष्टीनें सुपीक प्रदेश रशियन भागांत गेल्यानें पश्चिम जर्मनीस उद्योगधंद्यांवर भर देणें भाग पडलें. १९४८ सालीं सरासरी मासिक निर्यात २२० दशलक्ष मार्क्स ( १ मार्क = २ शिलिंग ) असे ती १९५१ सालीं १२०० दशलक्ष मार्क्स झाली. १९५० सालीं २० लक्ष कॅमेरे तयार झाले, त्यांपैकीं ⅔ कॅमेरे बाहेर पाठविण्यांत आले.

जर्मनीचा व्यापार आणखीहि वाढला असता. पण युद्धांत अनेक व्यापारी जहाजें नष्ट झालीं. १९३९ सालीं ४३ लक्ष टन व्यापारी जहाजें होतीं. १९४५ सालीं फक्त ७॥ लक्ष टन जहाजें राहिलीं. १९५२ सालीं ही संख्या ११ लक्षांवर आली आहे.

यानंतर बेकारीचा प्रश्न. युद्धांतील हंगामी नोकरी संपल्यामुळें पूर्वेकडून निर्वासितांचा लोंढा आला. त्यामुळें साहजिकच बेकारी निर्माण झाली. पश्चिम जर्मनीची मूळ लोकसंख्या ३ कोटी ८६ लक्ष. त्यांत ९५ लक्ष निर्वासितांची भर पडल्यामुळें लोकसंख्या ४ कोटी ८१ लक्षांवर गेली. दर चौरस किलो-मीटरला १६० लोकांचें प्रमाण १९४ वर जाऊन थडकलें. विशेषतः १९५० सालीं बेकारी कळसाला गेली होती. मात्र आलेल्या निर्वासित लोकांची एकाच भागांत दाटी न करतां ते सर्व कोंपऱ्यांत विखरून त्यांतील अनेकांना शेतीस लावलें व बेकारीची समस्या सोडविण्याचे प्रयत्न झाले. अजूनहि बेकारीची छाया या देशावर आहेच. जर्मनींत गाडींतून प्रवास करतांना डब्यांत कांहीं खलाशी भेटले. जर्मनींत पोट भरत नाहीं म्हणून ते रॉटरडॅमला कामधंदा शोधण्यास चालले होते. पुष्कळ लोकांची परदेशांत जाऊन नोकरी शोधण्याची धडपड चालू आहे. प्रत्यक्ष ज्यांच्या घरांत मी राहिलों त्यांच्या मुलाला एखादी नोकरी मिळवून देण्याची खटपट मी करूं शकेन का, असें मला विचारण्यांत आलें. एवढेंच नव्हे तर हिंदुस्थानांत वा अन्य कुठेंहि जायची त्या तरुणाची तयारी होती.

अन्नाची टंचाई हा पुढचा भाग. धान्य, बटाटे, मांस, अंडीं, भाज्या व फळें यांचा पुरवठा ज्या भागांतून होई तो भाग पोलंड व रशिया यांच्या ताब्यांत गेला. पश्चिम जर्मनीला लागणाऱ्या अन्नापैकीं फक्त ६० टक्के अन्न तेथें निर्माण होतें. उरलेल्या ४० टक्के खाद्यपदार्थांसाठीं फार मोठ्या प्रमाणांत आयात करावी लागली. एकूण आयातीचा ४१ टक्के भाग ह्या धान्यासाठीं होता. देशांतल्या जमिनीपासून उत्कृष्ट पीक काढण्यासाठीं अद्ययावत् यंत्रसामुग्री वापरली जाऊं लागली आहे. १९४८ सालीं प्रत्येक हेक्टर ( Per Hectare ) जमिनींतून १८·८ युनिट्स ( युनिट = २२० पौंड ) धान्य निघे. १९४९ सालीं हें प्रमाण २४·१ झालें व १९५१ सालीं २५·६ झालें.

घरबांधणीचा प्रश्नहि तितकाच निकडीचा होता. युद्धांत कित्येक घरें जमीनदोस्त झालीं. कोलन व व्युत्सबुर्ग येथें तर ७५ टक्के घरें नष्ट झालीं. कासेल (Cassel), आखेन (Aachen) व म्युन्स्टर (Muenster) येथें ६५ टक्के; हँबुर्ग, एसेन डोर्टमुंड (Dortmund) येथें ५०–५५ टक्के घरांचा नाश झाला. यावरून घरबांधणीचा प्रश्न किती बिकट होता हें कळेल. त्यांत परत निर्वासितांचा लोंढा! अजून घरांची पडझडहि साफ करणें पुरें झालें नाहीं. आतांपर्यंतची गोळा केलेली पडझड एकत्र केल्यास १५० फूट रुंद, ६० फूट उंच व ५०० मैल लांब अशी भिंत तयार होईल असें म्हणतात. आणि हा केरकचरा काढण्याचें काम आणखी दहा वर्षें तरी सहज चालेल.

घरें बांधण्याचें काम अव्याहत चालू आहे. अजून ६० लक्ष घरें बांधून व्हायचीं आहेत. १९४५ पासून १९५० पर्यंत १६ लक्ष घरें बांधून झालीं. १९४९ ते १९५१ या काळांत ४५ कोटी मार्क्स घर-बांधणीस खर्च झाले. नुसत्या १९५१ सालीं ४ लक्ष घरें बांधण्याचा विक्रम करण्यांत आला.

असो. युद्धोत्तर जर्मनींतील घरबांधणीचें हें पुराण लांबत चाललें. त्याविषयीं मी बारीक सारीक आंकडे देऊन आणखी लिहूं लागलों तर पत्र लिहिण्याच्या मिषानें मीं अंकगणिताचाच एकादा अवघड भाग वाचायला लावला असें तुला वाटेल व शिक्षा म्हणून मी तेथें आल्यावर तूं माझेंच घर उन्हांत बांधशील!

पुढील पत्रांत जर्मनींत पुनर्रचनेच्या आणखी कांहीं प्रयोगांची माहिती लिहीन.

ती. नाना व सौ. आई यांना शिरसाष्टांग नमस्कार.

तुझा,
भाऊ

* * *

पत्र २८ वें

# हँबुर्गमधील वास्तव्य

॥ श्री ॥

ओस्नाब्रुक ( जर्मनी ), दि. १२ ऑगस्ट, १९५२.

प्रिय उषास अनेक आशीर्वाद.

जर्मनी हें सर्व राष्ट्र आंतून पोखरून निघालें आहे. रस्त्यानें जाणाऱ्या लोकांचे पोषाख नीटनेटके आढळतात, दुकानांत मालहि भरपूर असतो; अन्नाचें नियंत्रण (रेशन) नाहीं—पण ही सारी वरवरची झकपक. लोकांचीं मनें एक प्रकारच्या खिन्नतेनें व्यापलेलीं आहेत. त्यांचें दुःख त्यांच्या चेहऱ्यावर दिसतें. येथील राहणी फार महाग झाली आहे. सर्वसाधारण युद्धकाळच्या ५६ टक्के अधिक किंमती झाल्या आहेत. कित्येक वस्तूंच्या १०० टक्के, २०० टक्केहि किंमती वाढल्या आहेत. पण पगारांत मात्र फक्त २० टक्क्यांनीं वाढ झाली आहे. मोठमोठ्या घरांत पूर्वी एकच कुटुंब राही. आतां तेथें १०-१२ कुटुंबांचीहि सोय होते. विशेषतः मध्यमवर्गाची या महागाईनें फार ओढाताण झाली आहे. ४० वर्षांपर्यंतच्या विवाहित स्त्रियांपैकीं ५० टक्के स्त्रिया कामधंदा करून संसारास हातभार लावतात. कर देऊन राहिलेलें सरासरी वार्षिक उत्पन्न दर माणशीं जर्मनी १३५८ यूनिट, फ्रान्स १९१२, ब्रिटन २४८८, अमेरिका ४३६४ असें भरेल. युद्धांत अनेक पुरुष मेल्यामुळें साहाजिकच स्त्रियांची संख्या फुगली आहे. दर हजार माणसांगणिक २५ ते ३० वयोमर्यादेच्या १३४० स्त्रिया आढळतात, ३० ते ३५ वयांत १३५५ स्त्रिया, ३५ ते ४० वयांत १३१० स्त्रिया व ४० ते ४५ वयांत १२२० स्त्रिया आढळतात. प्रौढ पुरुष २ कोटी २३ लक्ष तर स्त्रिया २ कोटी ५३ लक्ष आहेत.

हिटलरविषयींचा आदर अजूनहि लोकांत आढळतो. हा आदर उघड व्यक्त करण्यास लोक कचरतात. पण युद्धपूर्वकाळांत त्यानें जर्मनीस वैभवाप्रत नेलें होतें. लोकांना भरपूर खायला प्यायला मिळत होतें. सर्वांना नोकऱ्या होत्या. पुढें हिटलर फार महत्त्वाकांक्षी झाला. त्याला विरोध करणें कोणासहि शक्य झालें नाहीं. आणि यामुळेंच जर्मन राष्ट्र युद्धांत खेंचलें गेलें. युद्ध व्हावें असें कुणालाच वाटत नव्हतें. पण हिटलरपुढें कुणाचेंच चाललें नाहीं.

श्री. लाऊएन्स्टाइन हे बर्लिनचे, म्हणून मीं त्यांना बर्लिनविषयीं विचारलें; तेव्हां त्यांनीं एका वाक्यांत बर्लिनचें वर्णन केलें, "आतां बर्लिन हें शहर मृतप्राय झालें आहे (Berlin is a dead city now). सारी हयात बर्लिनमध्यें गेल्यावर बर्लिनची ही दुर्दशा पाहून त्यांना वाईट वाटत होतें. युद्धपूर्वकाळांतील बर्लिनचें वैभव आतां नामशेष झालें आहे. बर्लिनचे दोन तुकडे होऊन सर्वत्र भीतीचें वातावरण पसरलें आहे.

हें झालें साऱ्या जर्मनीबद्दल. मीं फक्त हँबुर्गच पाहिलें. पण जर्मनीच्या अन्य भागांतील जीवनाची कल्पना येण्याच्या दृष्टीनें माझें हँबुर्गचें वास्तव्य सोयीचें ठरलें. हँबुर्ग हें एल्ब नदीच्या मुखाजवळचें जर्मनीचें प्रमुख बंदर व बर्लिनच्या खालोखाल महत्त्वाचें शहर आहे. येथील लोकवस्ती १६॥ लाख आहे. शहराच्या दक्षिणेस एल्ब नदी आहे. मध्यभागांत व उत्तरेस एक खूप मोठें नैसर्गिक सरोवर आहे. एका मोठ्या पुलानें त्या सरोवराचे दोन भाग केले आहेत. त्या भागांची 'आऊसेन आल्स्टर' व 'बिनेन आल्स्टर' अशीं नांवें आहेत. या सरोवरांत बोटींची रहदारी सारखी चालू असते. हँबुर्गच्या एका टोंकाला राहणारे लोक रोज बोटींतून ऑफिसला येतात. संध्याकाळीं कित्येक हौशी लोक बोटींतून हिंडतात. हँबुर्ग विद्यापीठ, टाउन हॉल, कॉन्सर्ट हॉल वगैरे ठिकाणें पाहिल्यावर रात्रीं आम्ही प्लॉन्टेन-उन्-ब्लूमेन नांवाच्या बगीच्यांत गेलों. निरनिराळे करमणुकीचे कार्यक्रम-नाच, गाणीं इ०-चालू होते. विशेषतः संगीताची आवड लोकांना फार आहे. मंत्रमुग्ध झाल्याप्रमाणें लोक तासन्तास तें संगीत ऐकतांना दिसत होते.

त्या दिवशीं सायंकाळीं श्री. लाऊएन्स्टाइन यांच्याबरोबर जेवण करण्याची संधि मिळाली. जर्मनींतलें तें माझें पहिलें जेवण. जर्मनींत जेवणाच्या वेळा सकाळीं ब्रेकफस्ट, दुपारीं लंच व सायंकाळीं डिनर अशाच आहेत. ब्रेकफस्टला फक्त पाव, लोणी व कॉफी. लंचला येथें मिट्टागएसेन म्हणतात व डिनरला आबेन्टएसेन म्हणतात. जर्मनींतील मुख्य अन्न म्हणजे सॉसेजेस, डुकराच्या मांसाचे गोळे. इंग्लंडमध्येंहि मीं ते कधीं खाल्ले नाहींत. मला ते आवडतच नाहींत, म्हणून येथेंहि ते चाखले नाहींत.

जर्मनींत दारू तयार होते. दारू पिण्याची पद्धतहि येथें सर्रास आहे. येथें निरनिराळ्या फळांचे रसहि मिळतात. आफेलसाफ्ट ( Apfelsaft ) म्हणजे सफरचंदाचा रस. अननस-साफ्ट ( Ananas-saft ) अशी एके ठिकाणीं मीं पाटी वाचली. सुरवातीस अननस हा शब्द पाहून मला आश्चर्य वाटलें. त्याचा अर्थ मीं श्री. लाऊएन्स्टाइन यांना विचारला. हा शब्द जर्मन असून त्याचा अर्थ पाइन-ॲपल ( Pine-apple ) असा आहे असें त्यांनीं सांगितलें. जर्मन भाषेंत व मराठींत अननसाला सारख्याच उच्चाराचा एकच शब्द पाहून मला नवल वाटलें. असो. रात्रीं ११ वाजतां परत आल्यावर आम्ही झोंपीं गेलों.

रविवार दि. १० रोजीं श्री. लाऊएन्स्टाइन यांना काम होतें म्हणून त्यांची सोबत नव्हती, पण स्वतः डॉ. सीव्हेर्स हे मोकळे होते. त्यांना रविवारची सुटी होती. सकाळीं न्याहारी करून आम्ही दोघे बाहेर पडलों. प्रथम लॉ कोर्ट्स व प्रिन्स बिस्मार्कचा भव्य पुतळा या गोष्टी पाहून व मग बंदरांत फेरफटका मारून आम्ही हॅंबुर्गचें कला-केंद्र ( Art-Gallery ) पाहण्यास गेलों. जर्मन लोकांची चित्रकला मला तितकीशी आवडली नाहीं. फ्रेंच व इटालियन चित्रकलेपुढें ती फिकी वाटते.

दुपारीं हॅंबुर्गच्या उत्तरेस १० मैलांवर एल्ब नदीकांठीं असलेल्या ब्लॅंकेनीज या गांवीं जायचें आम्हीं ठरविलें. जातांना आम्ही विजेवर चालणाऱ्या गाडीनें हॉपकॅम्पला गेलों व तेथून चालत ब्लॅंकेनीज गांवीं पोंचलों. हें गांव उंच टेंकडीवर वसलें आहे. तेथून नदींतल्या अव्याहत चाललेल्या वाहतुकीचें रम्य दृश्य दिसतें. आज रविवार असल्यामुळें पुष्कळ लोक सहलीला आले होते. फिरायला जायचें एक उत्तम ठिकाण म्हणून हॅंबुर्गहून खूप लोक येथें येतात. विशेषतः रात्रीं सर्व जहाजांवर दिवे लागले म्हणजे सर्व नदीभर त्यांचा प्रकाश छान पडतो; व बोटीच्या गतीबरोबर ते दिवेहि चालू लागतात. बोटीच्या पुढच्या भागास हिरवा व मागें तांबडा असे दिवे असल्यामुळें रंगीत शोभा दिसते. रात्रीं परत जातांना आम्हीं ब्लॅंकेनीज ते हॅंबुर्ग हा प्रवास बोटीनें केला.

सोमवार दि. ११ ची सकाळ थोडें पत्रलेखन व कांहीं किरकोळ खरेदी करण्यांत घालविली. आज मला कुमार सीव्हेर्सची सोबत होती. दुपारीं हॅंबुर्ग शहरांत भटकल्यावर संध्याकाळीं ल्यूह या खेडेगांवांत जायचें ठरलें. तेंहि एल्ब

नदीच्या कांठीं आहे. बोटीनेंच गेलों. या गांवांत एका बाजूला पाणी व दुसरीकडे पाण्यापेक्षांहि कमी उंच असलेली जमीन असल्यामुळें येथें कृत्रिम धरणें बांधलीं आहेत. त्यांना डाइश म्हणतात. त्या धरणांवरून चालत गेल्यास मजा दिसते. त्याला डाइशवरील फेरफटका असें म्हणतात. एका बाजूला जुनीं शेतावरचीं घरें ( Farm houses ) दिसतात. घोड्याच्या गाडीवर पेंढ्या टाकून चाललेला एक जर्मन शेतकरी आम्हांला भेटला.

ल्यूह गांवीं त्या दिवशीं हँबुर्गमधील कांहीं शिक्षक व शिक्षिका सहलीसाठीं आल्या होत्या. निरनिराळे करमणुकीचे कार्यक्रम चालू होते. थोडा वेळ त्यांच्याशीं गप्पा मारून त्यांच्या कार्यक्रमांत भाग घेण्याची संधि मिळाली. रात्रीं परत यायला १० वाजून गेले.

ल्यूहला जाण्यापूर्वी दुपारीं एल्ब नदीच्या खालीं खणलेला एक बोगदा पाहिला. एल्ब नदी ओलांडण्यास पाण्यावर पूल बांधला तर जहाजांना अडथळा होतो म्हणून ६०–६५ फूट खोल असा बोगदा खणला आहे. पाण्याच्या खालील जमिनींत हा बोगदा आहे. लिफ्टच्या साहाय्यानें मोटारी व माणसेंसुद्धां खालीं नेतां येतात. बोगदा ५०० यार्ड लांब आहे. दुसऱ्या टोंकास लिफ्टनेंच वर यायची सोय आहे.

हँबुर्ग येथील सर्व प्रमुख गोष्टी पाहून झाल्या होत्या; म्हणून मी मंगळवार दि. १२ रोजीं हँबुर्ग सोडणार होतों. मला आमस्टरडॅमला जायचें होतें. तेथें जायला फक्त दोनच गाड्या होत्या. एक हँबुर्गहून दुपारीं पावणे-चारला निघते व आमस्टरडॅमला रात्रीं अकरा वाजतां पोंचते. दुसरी पहांटे पावणेचारला निघून आमस्टरडॅमला सकाळीं दहा वाजतां पोंचते. दोन्ही गाड्या माझ्या दृष्टीनें गैरसोयीच्या होत्या. पहिली गाडी आमस्टरडॅमला फार उशिरां पोंचायची. अनोळखी शहरांत एवढ्या रात्रीं गेल्यावर तेथें स्वतःचा मार्ग शोधून काढणें अवघड जातें. दुसरी गाडी हँबुर्गहून पहांटे फारच लवकर निघत होती. त्यामुळें काय करावें असा प्रश्नच होता. पण मीं ठरवलें कीं, मंगळवारीं सकाळीं हँबुर्ग सोडायचें व ओश्नाब्रुक येथें जायचें; रात्रीं तेथेंच मुक्काम करायचा. हँबुर्गहून पहांटे पावणेचारला सुटणारी गाडी ओश्नाब्रुकला सकाळीं सहा वाजतां येते. तीच गाडी ओश्नाब्रुकला पकडून सकाळीं दहा वाजतां आमस्टरडॅमला जायचें. एक दिवस मुक्काम वाढला खरा, पण पहांटे

पावणेचार वाजतां गाडी पकडण्याची धांदल वांचून तीच गाडी सकाळीं सहा वाजतां पकडतां आली.

मीं डॉ. आणि मिसेस् सीव्हिर्स यांचे खूप आभार मानले. मिसेस् सीव्हिर्स स्वभावानें फारच चांगल्या होत्या. त्यांनीं माझें चांगलें आदरातिथ्य केलें व जर्मनीस परत येण्यास सांगितलें. एवढेंच नव्हे तर "तूं जर्मनींतच शिकायला कां येत नाहींस?" असें त्या म्हणाल्या. आम्हीं पुष्कळ फोटो काढले. त्यांचा मुलगा मला स्टेशनवर पोंचवायला आला होता.

असो. सकाळीं १०–३५ च्या गाडीनें मीं हॅंबुर्ग सोडलें. गाडी दुपारीं २–४५ ला ओश्नाब्रुकला पोंचली. ही गाडी पुढें कोलनला जाणार होती. स्टेशनवरच आर्. टी. ओ. हें ब्रिटिश सैन्याचें हेड-क्वॉर्टर आहे. मी तेथें गेलों व येथें राहण्याजोगें उत्तम हॉटेल सांगूं शकाल काय असें विचारलें. स्टेशन-समोर एक छोटेंसें पण स्वच्छ हॉटेल त्यांनीं मला दाखविलें. त्या हॉटेलांत मीं सामान टाकलें व ओश्नाब्रुक पहायला बाहेर पडलों. हें लहानसें व जुनें गांव आहे. बॉम्बहल्ल्याच्या तडाख्यांतून हें सुटलें नाहीं. संध्याकाळीं पार्कमध्यें भटकलों. दुसऱ्या दिवशीं सकाळीं लवकर उठायचें होतें म्हणून लवकर झोंपीं जायचें ठरविलें. तत्पूर्वीं गरम पाण्यानें स्नान केलें. प्रवासांतील शिणवटा घालवायला स्नानाचा खूप उपयोग होतो.

जर्मनींतील माझ्या वास्तव्याचा हा शेवटचा दिवस. उद्यां सकाळीं दहाच्या सुमारास मी हॉलंडमधील आमस्टरडॅम या गांवीं पोंचेन. तिथून पत्र टाकीनच.

कळावें. ती. नाना व सौ. आई यांना शि. सा. नमस्कार.

तुझा,
**भाऊ**

* * *

पत्र २९ वें

# आमस्टरडॅम

॥ श्री ॥

आमस्टरडॅम ( हॉलंड ), दि. १४ ऑगस्ट, १९५२.

प्रिय उषा,

बुधवार दि. १३ ला सकाळीं ६ वाजतां मीं ओश्नाब्रुक सोडलें व जर्मन-हॉलंड सरहद्दीवरील बेन्थेम या गांवीं सकाळीं ७॥ ला पोंचलों. कस्टम तपासणींतून सुटलों, पण पासपोर्टची थोडीशी भानगड झाली.

प्रत्येक देशांत प्रवेश करण्याबद्दल व्हिसा घ्यावा लागतो. व्हिसा मागण्यासाठीं जो अर्ज करावा लागतो त्यांत आपण कोणत्या तारखेस त्या देशांत प्रवेश करणार व कोणत्या तारखेस त्या देशाबाहेर पडणार तें लिहावें लागतें. मात्र त्या तारखांच्या मागेंपुढें आठदहा दिवसांची सवलत देण्यांत येते. त्यामुळें नेमकें त्याच दिवशीं गेलें पाहिजे अगर त्याच दिवशीं देश सोडला पाहिजे असें बंधन नसतें. जर्मनींत दि. ९ ला मी प्रवेश करणार आहें व दि. १२ ला जर्मनी सोडणार आहें असें मीं माझ्या अर्जांत लिहिलें. जर्मनींत तीन दिवस राहायचें असेल तर अडीच शिलिंगांत 'ट्रॅन्झिट व्हिसा' ( Transit Visa ) मिळतो व तीन दिवसांपेक्षां जास्त काळ राहायचें असल्यास निराळा व्हिसा घ्यावा लागतो. हा फरक मला ठाऊक नव्हता. मीं दि. ९ ते १२ अशी मुदत मागितली. त्याचा अर्थ मला ट्रॅन्झिट व्हिसा हवा असा करण्यांत आला व मला जर्मनींत फक्त तीन दिवस राहण्याचा व्हिसा देण्यांत आला. अर्थात् त्यावर ९ व १२ या तारखा नव्हत्या; तर जर्मनींत केव्हांहि प्रवेश करायचा व प्रवेश केल्यानंतर तीन दिवसांत जर्मनी सोडायची असें लिहिलें होतें. हा मजकूर जर्मन भाषेंत लिहिला होता म्हणून मला हा फरक कळला नाहीं. मीं दि. ९ ला जर्मनींत प्रवेश केला व चौथ्या दिवशीं म्हणजे दि. १३ ला मी जर्मनी सोडीत होतों. तें सुद्धां त्या आधीं सोईस्कर गाडी नव्हती म्हणून. मीं दि. ९ ला प्रवेश केल्याचा शिक्का पासपोर्ट-अधिकाऱ्यानें पाहिला; व मी एक दिवस उशिरां जर्मनी सोडीत असल्याचें त्याच्या लक्षांत

आलें. मी कोठून आलों, कोठें जाणार आहें वगैरे प्रश्न त्यानें विचारले; व एक दिवस मीं जर्मनींत जास्त काढल्याचें मला माहीत आहे का, असेंहि त्यानें विचारलें. "ट्रॅन्झिट व्हिसाची भानगड मला समजली नाहीं; त्यामुळें हा एक दिवसाचा घोटाळा झाला" असा मीं खुलासा केला. मी विद्यार्थी असून ऑलिंपिक सामने पाहून परत जात आहें व पुन्हां त्याच व्हिसावर जर्मनींत प्रवेश करण्याची शक्यता नाहीं हें पाहून "ठीक आहे" असें म्हणून त्यानें पासपोर्ट माझ्या स्वाधीन केला व तो निघून गेला.

७-४५ ला गाडीनें बेन्थेम सोडलें व ८ च्या सुमारास ओल्डेनूझाल स्टेशन आलें. ओल्डेनूझाल हें हॉलंडच्या सरहद्दीवरील पहिलें गांव; तेथें पासपोर्टची व कस्टमची तपासणी झाली. ९ वाजतां ॲमर्सफूर्ट या गांवीं गाडी थांबली. मला आमस्टरडॅमला जायचें होतें. गाडी रॉटरडॅम, हूक ऑफ हॉलंड या बाजूस जाणार होती. म्हणून ॲमर्सफूर्ट येथें मला गाडी बदलावी लागली. स्टेशनवरील रेस्टॉरंटमध्यें दूध-पाव अशी न्याहारी घेऊन ९-२५ ला मी आमस्टरडॅमला जाणाऱ्या गाडींत बसलों. पुण्या-मुंबईकडील विजेच्या एंजिनाच्या लोकल गाड्यांसारख्या पॅसेंजर गाड्यांचें हॉलंडमध्यें जाळें आहे. येथील पुष्कळ गाड्या विजेवर चालणाऱ्या असतात. त्यामुळें धुरानें काळींकुट्ट झालेलीं स्टेशनें न दिसतां एक प्रकारची स्वच्छता आढळते.

१०-१० ला आमस्टरडॅमला पोंचलों. क्लोकरूममध्यें सामान टाकलें. माझी राहण्याची सोय 'वाय्. एम्. सी. ए.' प्रमाणेंच असलेल्या 'ए. एम्. व्ही. जे.' या संस्थेच्या वसतिगृहांत झाली होती. परंतु मी प्रथम स्टेशन-जवळच्या 'टूरिस्ट इन्फर्मेशन ऑफिस' मध्यें गेलों व आमस्टरडॅम शहराचा नकाशा घेऊन इतर महत्त्वाच्या प्रेक्षणीय स्थळांची चौकशी केली. टूरिस्ट इन्फर्मेशन ऑफिसांना 'व्ही. व्ही. व्ही.' असें येथें म्हणतात. प्रत्येक गांवांत या कचेरीची शाखा असते. तेथें प्रवाशांना सर्व माहिती पुरवून सल्ला दिला जातो. हॉलंडमध्यें इंग्रजी जाणणारे लोक बरेच आढळतात; त्यामुळें भाषेची अडचण येत नाहीं.

आमस्टरडॅमचा नकाशा मिळाल्यामुळें 'ए. एम. व्ही. जे.' ची कचेरी कुठें आहे तें समजलें व त्या ठिकाणीं मी ११ च्या सुमारास पोंचलों. माझ्या वयाचे अनेक विद्यार्थी निरनिराळ्या देशांतून हॉलंड देश बघण्यास

आले होते. ते सर्व जण तेथेंच उतरले होते. शिवाय अनेक डच मुलें-मुलीहि होत्या. त्यामुळें समवयस्क तरुणांशीं बोलण्याची संधि मिळाली. माझ्या ओळखीच्या दोन व्यक्ति आमस्टरडॅमला होत्या. एक डॉ. एस्. एस्. गोव्हर्स, हे धंद्यानें डॉक्टर आहेत. दुसरी मिस् मॅडलीन बेली. हीं दोघेंहि डच असून माझ्याच वयाचीं आहेत. त्यांच्या गांठी पडून त्यांच्याशीं मनसोक्त गप्पा झाल्या.

हॉलंडविषयीं थोडी पूर्वमाहिती सांगणें आवश्यक आहे. इंग्रजींत या देशाला हॉलंड म्हणतात; पण खुद्द डच भाषेंत नेदरलंड म्हणतात. नेदरलंडचे अनेक वेगवेगळे प्रांत असून वायव्येकडील प्रांत नॉर्थ हॉलंड व दुसरा साउथ हॉलंड म्हणून ओळखला जातो. या देशांतील लोकांना ' डच ' असें इंग्रजींत म्हणतात. खुद्द त्यांच्या भाषेंत ' डच ' हा शब्द नाहीं व हे लोक स्वतःस डच म्हणवून घेतहि नाहींत. डच या शब्दाची व्युत्पत्ति मीं अनेक लोकांना विचारली. निरनिराळ्या लोकांनीं निरनिराळीं उत्तरें दिलीं, पण कोणासहि निश्चित उत्तर देतां आलें नाहीं. हॉलंडमध्यें सहाव्या शतकांत डिट नांवाचे लोक राहत असत. डच राष्ट्रगीतांत डिट लोकांचें रक्त ( Dicts blood ) असा उल्लेख आहे. त्यावरून डच हा शब्द निघाला असावा हें मत मला सयुक्तिक वाटलें.

हॉलंडचा $\frac{1}{3}$ पेक्षां अधिक भूभाग समुद्रसपाटीपासून खालीं आहे. निरनिराळीं धरणें ( Dykes and dunes ) बांधून समुद्र थोपवून धरला आहे. हीं धरणें नसतीं तर समुद्राचें पाणी देशांत खूप आंत घुसलें असतें. पूर्वी हा सर्व भाग पाणी व दलदल यांनीं व्यापलेला होता. परंतु हें सर्व पाणी हटवून व धरणांच्या साहाय्यानें थोपवून मानवानें निसर्गावर मातच केली आहे. प्रथम समुद्राच्या पाण्यामध्यें एक धरण बांधायचें व पाण्याचे दोन भाग करायचे. खालच्या भागांतलें पाणी पंपाच्या साहाय्यानें व अन्य रीतींनीं काढून टाकलें कीं समुद्राचा तळ जमिनीप्रमाणें होतो. पाणी काढल्यामुळें साहाजिकच तेथील जमीन ही समुद्रसपाटीपेक्षां खोल असते व आधीं बांधलेल्या धरणानें पाणी थोपवलें जातें. या जमिनीची मशागत करून तिच्यावर कुरणें तयार करतात. हॉलंडच्या उत्तरेस ' झुइडर झी ' हें मोठें आखात असून तें सर्व हटविण्याचे यत्न चालू आहेत. त्यासाठीं २७ मैल लांबीचें प्रचंड धरण बांधलें असून बरेंच पाणी हटविलें आहे.

माझा बहुतेक प्रवास हॉलंडच्या उत्तर भागांतच झाला. जमीन समुद्र-सपाटीपेक्षां खोल असल्यामुळें कुठें एकहि टेकडी दिसत नव्हती. क्षितिजापर्यंत दृष्टि फेंकली तरी सर्वत्र हिरवींगार कुरणें, त्यांवर चरणाऱ्या गाई, अधूनमधून शेतकऱ्यांचीं घरें व डेअरी फार्म्स असें लोभसवाणें दृश्य दिसतें. त्याशिवाय हॉलंडच्या पवनचक्क्या! आतां यांत्रिक सुधारणांमुळें त्यांची संख्या कमी झाली आहे. पण अजूनहि कांहीं ठिकाणीं पवनचक्क्या दिसतात. निसर्गतः मिळणाऱ्या वाऱ्याचा उपयोग करून, नैसर्गिक शक्ति निर्माण करून पाणी हटविणें, धान्य दळणें वगैरे कामांसाठीं या पवनचक्क्यांचा उपयोग होतो.

हॉलंडमध्यें दिसणारी आणखी एक गोष्ट म्हणजे पाण्याचे कालवे. समुद्राचें पाणी हटवितांना अशा तऱ्हेचे कालवे मुद्दाम राखण्यांत आले. कारण पाण्याची पातळी समान जागेवर ठेवण्यास हे कालवे आवश्यक आहेत. समुद्राचें पाणी आंत आल्यास प्रथम तें कालव्यांतून फिरवलें जाईल व धोका कमी होईल. या कालव्यांचा रहदारीस कांहीं ठिकाणीं उपयोग केला जातो. विशेषतः आमस्टरडॅम शहरांत तर असे अनेक कालवे दिसतात.

शेती व शेतीवर अवलंबून असलेले धंदे हे हॉलंडमधील लोकांचे मुख्य व्यवसाय आहेत. उंच भागांत शेती असून कडधान्यें, बटाटे व बीट हें पीक तेथें काढतात. ज्या ठिकाणीं खोल जमीन आहे तेथें फक्त कुरणें असून गाईंच्या दुधापासून चीज व लोणी तयार करतात. कोंबड्यांपासून अंडीं निपजवतात. गाई, डुकरें इ० प्राण्यांचें मांस परदेशीं पाठवतात. मच्छीमारीचा धंदा त्या-खालोखाल चालतो. उत्तरेकडील सर्व खेड्यांतून हा धंदा विशेष चालतो. हॉलंडमध्यें उद्योगधंद्यांची वाढ होऊं लागली आहे. दक्षिणेकडे कोळशाच्या खाणी आहेत. शिवाय फिलिप्स रेडिओ आणि बल्ब इ० विजेचीं उपकरणी तयार करण्याच्या कारखान्यांचें आयंधूवन हें गांव आगर असून २५ हजार लोक तेथें कामावर आहेत. आमस्टरडॅम व रॉटरडॅम हीं प्रमुख बंदरें आहेत. युरोपचा फार मोठा व्यापार या दोन बंदरांतून चालतो.

हॉलंडचा राज्यकारभार लोकशाही असून राज्यसंस्थेची सध्यांची प्रमुख राणी ज्युलिआना ही आहे. येथें इंग्लंडप्रमाणेंच दोन सभा (Houses) आहेत. त्यांपैकीं पहिली सभा ही लोकसभेसारखी (House of Commons) असून ती सर्व लोकांनीं निवडलेली असते. वयाचीं तेवीस वर्षें पूर्ण



आमस्टरडॅम – कालव्यांतील रहदारी



अल्कमार – चीज मार्केट



हॉलंड – कालवा आणि पवनचक्की

झालेल्या प्रत्येक नागरिकास मताधिकार असतो. राणी स्वतः आपले मंत्री निवडते. हे मंत्री दोन्ही सभांना जबाबदार असतात. हॉलंडची राजधानी आमस्टरडॅम ही असली तरी राज्यकारभार हेग येथून चालतो. सप्टेंबर महिन्याच्या तिसऱ्या मंगळवारीं पार्लमेंट सुरू होतें. राणी ज्युलिआना ही सोनेरी कोचांतून मिरवणुकीनें येऊन रायडरझाल या पार्लमेंटच्या इमारतींत सर्व सदस्यांचेसमोर भाषण करून पार्लमेंट उघडल्याचें जाहीर करते. मी हॉलंडमध्यें होतों तेव्हां बराच काळ राज्यकारभार स्थगित होता; कारण पार्लमेंटमध्यें कोणत्याहि एका पक्षाचें बहुमत होऊं शकत नव्हतें. त्यामुळें एक तऱ्हेची कोंडी ( Deadlock ) तयार झाली होती.

हॉलंडमध्यें धार्मिक दृष्ट्या निम्मे लोक प्रॉटेस्टंट असून एक-तृतीयांश लोक कॅथॉलिक आहेत. उत्तरेस प्रॉटेस्टंट लोकांचें प्राबल्य आहे तर दक्षिणेस कॅथॉलिकांचें.

डच भाषेवर जर्मन, इंग्रजी व फ्रेंच या तिन्ही भाषांची छाप पडली आहे. पुष्कळांना इंग्रजी व फ्रेंच या दोन्ही भाषा येतात. डच भाषेंत 'जी' ( G ) या अक्षराचा उच्चार 'ह' असा करतात. उदाहरणार्थ 'गिल्डर' ( Guilder ) हें त्यांचें नाणें. हा शब्द डचमध्यें 'Gulden' असा लिहितात. पण त्याचा उच्चार मात्र 'हिल्डन' असा करतात. १०० सेन्ट्स म्हणजे १ हिल्डन, म्हणजे २ शिलिंग.

हॉलंडमध्यें इंडोनेशियन लोक खूपच आढळतात. शिक्षणासाठीं येणारे इंडोनेशियन विद्यार्थी आणि व्यापार व उद्योगधंद्यांसाठीं येऊन स्थायिक झालेले इंडोनेशियन लोक पुष्कळ आढळतात. त्याशिवाय डच व इंडोनेशियन यांचा संकर होऊन निर्माण झालेली प्रजाहि आढळते. डच लोकांचें इंडोनेशियावर वर्चस्व आहे. तसेंच इंडोनेशियांतील सुशिक्षित लोकांना डच भाषा येते. त्यामुळें हॉलंडमध्यें या लोकांचा भरणा आहे.

आमस्टरडॅमची लोकसंख्या ८॥ लाख आहे. कला व शास्त्र या दृष्टीनें तें हॉलंडचें केंद्र आहे. या शहराचें खरें सौंदर्य कशांत असेल तर तें कालव्यांत होय. सर्व शहरभर निरानिराळे ६० कालवे आहेत. या कालव्यांची आंखणी योजनाबद्ध आहे. कालव्यांच्या दुतर्फा लहानमोठे रस्ते, झाडें वगैरे असून त्यांपलीकडे दुतर्फा इमारती आहेत. कालव्यांवर निरानिराळे ४०० च्यावर

पूल आहेत. त्यामुळें गांवास विशेष शोभा आली आहे. कालव्यांतून बोटींचीं सारखी रहदारी नसली तरी लहान बोटींतून प्रवाशांना आमस्टरडॅम दाखविण्याची सोय आहे. सुमारें तास–दीड तासांत बोटींतून शहर बघतां येतें. पुलावरून बस किंवा ट्रॅम जात आहे व पुलाखालून बोटी जात आहेत हें दृश्य रम्य दिसतें.

आमस्टरडॅमला निरनिराळया सत्तरच्यावर म्यूझियम्स आहेत. त्यांपैकीं रिक्स म्यूझियम ही नॅशनल आर्ट गॅलरी होय. युरोपांत चित्रकलेचीं जीं प्रेक्षणीय प्रदर्शनें आहेत त्यांत या म्यूझियमची गणना होते. रेम्ब्रान्ट ( Rembrandt ) या प्रसिद्ध डच चित्रकाराचें 'नाइट वॉच' हें चित्र उत्कृष्ट आहे. त्याशिवाय व्हर्मीर, फ्रॅन्स–हॉल्स, जॅन स्टीन वगैरे नामांकित चित्रकारांचीं चित्रें येथें पहायला मिळतात. या म्यूझियममध्यें प्राचीन शिल्पकलेचें प्रदर्शनहि आहे. विशेषतः जावा, सुमात्रा वगैरे ठिकाणीं प्राचीन हिंदु संस्कृतीचे जे अवशेष सांपडले आहेत तेहि या प्रदर्शनात ठेवले आहेत. सन ९०० ते ११०० या काळाला 'हिंदु जावानीज ( Hindu-Javanese ) काळ' असें म्हटलें असून स्तूपांचे अवशेष, बुद्ध, लोकेश्वर, विष्णु, गणपति, त्रिमूर्ति, बोधिसत्त्व, शिव, नटराज, मुरलीधर कृष्ण, नृसिंह, उमा, शिव–पार्वती इ० हिंदु देव–देवतांचे पुतळे या प्रदर्शनांत, एवढ्या दूरवर पाहून मला फारच आनंद झाला. त्यांचे फोटो घ्यायला परवानगी नव्हती.

दुसरें प्रेक्षणीय प्रदर्शन म्हणजे ट्रॉपिकल म्यूझियम. त्यांत अतिपूर्वेकडील देशांतील चित्रकला व हस्तकौशल्य यांचें प्रदर्शन आहे. याशिवाय त्या भागांतील झाडें, फळें, प्राणी, पक्षी यांचे नमुने ठेवले आहेत. विषुववृत्तावरील दाट जंगलांचे कृत्रिम नमुने करून ते तेथें मांडले आहेत. कॉफी, चहा, नारळ, तंबाखू, भात, रबर इ० पिकांची वाढ कशी होते तेंहि दाखविलें आहे.

या शहरांतून आमस्टल ( Amstel ) ही नदी वाहते. समुद्राचें पाणी अडविण्यासाठीं या नदीच्या मुखावर धरण ( Dam ) बांधलें होतें. यावरूनच आमस्टरडॅम हें नांव या शहरास पडलें आहे.

युरोपांत सर्वत्र बसेस एकमजली आहेत. आमस्टरडॅमला बसमधून जाण्याचा मला एकदांच प्रसंग आला. बसमध्यें कंडक्टरहि नव्हता. बसला एकच दार असतें व तेंहि ड्रायव्हरजवळ. बसमध्यें शिरल्यावर कोठें जायचें तें

ड्रायव्हरला सांगायचें व तो तिकिट फाडून देतो. त्याचेजवळ एक बंद पेटी असते. त्या पेटींत पैसे टाकायचे. मजजवळ तिकिटास लागणारे सुटे पैसे नव्हते. मीं ड्रायव्हरजवळ मोड मागितली. तो म्हणाला, "पेटी बंद आहे. त्यांत पैसे टाकायला हवेत. मी मोड देऊं शकत नाहीं." मला फार आश्चर्य वाटलें. पण तेवढ्यांत एका सह-प्रवाशानें मला मोड दिली व माझें काम भागलें. बसमध्यें मोड मिळूं शकत नाहीं ही गोष्ट मला फक्त येथेंच पहायला मिळाली.

आमस्टरडॅम शहर पाहण्यांत सबंध दिवस घालवल्यावर मी संध्याकाळीं डॉ. गोव्हर्स यांना भेटण्यास गेलों. बराच वेळ आमच्या गप्पा झाल्या. नंतर मिस् मॅडलोनला भेटायला जायचें आम्हीं ठरविलें. पण फोन केला तर ती घरीं नव्हती असें कळलें; म्हणून उद्यां सायंकाळीं आम्ही दोघे येऊं असा निरोप ठेवला. रात्रीं ११ वाजतां मी खोलीवर परत आलों.

हॉलंड पाहण्याची खरी मजा शहरांत नसून खेड्यांत आहे; व म्हणून उरलेले दोन दिवस आमस्टरडॅमच्या बाहेर हिंडायचें असें मीं ठरविलें आहे. तेथील अनुभव पुढील पत्रांतून कळवीन.

कळावें. ती. नाना व सौ. आई यांना शिरसाष्टांग नमस्कार.

तुझा,
भाऊ

* * *

पत्र ३० वें

## डच धरणाची रोमहर्षक कथा

॥ श्री ॥

आमस्टरडॅम ( हॉलंड ), दि. १६ ऑगस्ट, १९५२.

प्रिय उषास सप्रेम आशीर्वाद.

आमस्टरडॅम शहराचे दोन भाग आहेत. एक उत्तर व दुसरा दाक्षिण. या दोन्ही भागांच्या मध्यें एक खाडी आहे. पण पूल बांधल्यास जहाजांच्या वाहतुकीस अडथळा येतो म्हणून अजूनहि हे दोन भाग अलग आहेत. या शहरांत ४०० पूल असूनहि हे दोन प्रमुख भाग जोडले गेले नाहींत याचें आश्चर्य वाटतें. या दोन भागांत जाण्यायेण्यासाठीं प्रचंड बोटींची सतत

रहदारी चालू असते. माणसें, सायकली, मोटारी इत्यादींची ने-आण अहोरात्र चालू असते. सायकली व माणसें यांना मोफत नेलें जातें. मोटारींना तेवढा आकार पडतो.

आमस्टरडॅमच्या उत्तरेस ब्रॉक या खेडेगांवांत चीज-फार्म असून तें बघायला मी गुरुवारीं ( दि. १४ ला ) सकाळीं १०॥ वाजतां निघालों. प्रथम एका बोटींतून दक्षिण आमस्टरडॅममधून उत्तरेस गेलों. तासाभरांत ब्रॉकला पोंचलों. हें एक छोटेंसें पण सुंदर खेडें आहे. आसपास हिरवींगार कुरणें असून त्यावर असंख्य गाई चरत होत्या. खेड्यांत कमालीची स्वच्छता आढळली. चीज-फार्मवर काम करणाऱ्या एका गृहस्थाला इंग्रजी येत होतें. चीज कसें तयार करतात हें सर्व त्यानें मला प्रत्यक्ष दाखविलें. गाईचा गोठा, दूध तापविण्याचें व घुसळण्याचें सामान, चीज दाबून त्यांतून पाणी बाहेर काढण्याचें यंत्र वगैरे गोष्टी पाहायला मिळाल्या. शेतकऱ्याची निजण्याची जागा मला आवडली. भिंतींतच एक मोठें कपाट होतें. त्या कपाटाला दोन खण. वरच्या खणांत शेतकरी व त्याची बायको यांचा बिछाना असतो. खालच्या खणांतील गादीवर त्याचीं मुलें झोंपतात. कपाटाला दोन दारें असून आंत शिरल्यावर दार बंद करून घ्यायचें.

चीज-फार्मवर काम करणाऱ्या बायका खेडेगांवच्या पोषाखांत होत्या. एका विशिष्ट तऱ्हेच्या पांढऱ्या कापडावर काळ्या पट्ट्या असलेला परकर, काळा ब्लाउज व उंच पांढरी तिकोनी टोपी हा त्यांचा पोषाख पाहून खूप मजा वाटली. पुरुषांचाहि पोषाख काळ्या रंगाचा व वर मुसलमानी फेज् कॅपप्रमाणें टोपी आणिं पायांत लांकडी बूट.

तास–दीड तासांत चीज फार्म पाहून झालें. ब्रॉकच्या उत्तरेस ५ मैलांवर व्हॉलेन्डॅम हें गांव आहे. तेथील रहिवासी जुन्या काळचा राष्ट्रीय पोषाख घालून हिंडतात व तो फार गमतीदार असतो असें समजलें. म्हणून मी तेथें गेलों. हें गांव मच्छीमारीसाठीं प्रसिद्ध आहे. सर्व स्त्री-पुरुष रंगीबेरंगी राष्ट्रीय पोषाख घालून हिंडत होते. त्या खेड्याचें तें वैशिष्ट्य कायम ठेवण्याचें तेथील लोकांनीं ठरविलें आहे. मात्र ते पोषाख पाहण्यासाठीं अनेक प्रवासी तेथें येतात. त्यामुळें त्या शहराला थोडेंसें व्यापारी स्वरूप आलें आहे. सायंकाळीं ५ पर्यंत त्या खेड्यांत भटकून नंतर मी आमस्टरडॅमला परत आलों.

संध्याकाळीं जेवण आटोपल्यावर मी व डॉ. गोव्हर्स असे दोघे जण मिस् मॅडलोनकडे गप्पा मारायला गेलों. आदल्या दिवशीं तिला फोनवरून निरोप ठेवला होता त्याप्रमाणें ती घरीं थांबली होती. त्याच वेळीं तिचा एक मित्र मायकेल पोडयुलस्की हा तेथें आला होता. मायकेलचे वडील पोलिश, आई नॉर्वेजियन, सारें आयुष्य अमेरिकेंत गेलेलें, पण सध्यां तो हॉलंडमध्यें राहत होता. आम्ही चौघांनीं खूप गप्पा मारल्या. निरनिराळ्या देशांतील निरनिराळ्या वैशिष्ट्यांवर खूप चर्चा झाली व दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं पुन्हां भेटण्याचें ठरून रात्रीं ११ वाजतां आम्हीं एकमेकांचा निरोप घेतला.

शुक्रवारीं सकाळीं मी अल्कमार या गांवीं गेलों. हें खेडें आमस्टरडॅमच्या वायव्येस २० मैलांवर आहे. दर शुक्रवारीं तेथें चीज मार्केट भरतें असें ऐकलें होतें म्हणून मुद्दाम गेलों. जुन्या काळीं चीज मार्केट जसें भरत असे तसें हें मार्केट भरतें. मजसारख्या बघायला आलेल्या लोकांची अफाट गर्दी असते. जो तो कॅमेऱ्यावर फोटो काढीत होता. मार्केटचें मुख्य आकर्षण म्हणजे चीजची ने-आण करणारा नोकरवर्ग. या नोकरांचा पोषाख पाहण्यासारखा होता. पांढऱ्या लांब विजारी, पांढरे फुल् शर्ट्स, डोक्यावर रंगीत टोप्या. कोणाच्या तांबड्या, कोणाच्या हिरव्या तर कोणाच्या पिवळ्या. लांकडी फळ्यांवरून चीजची ने-आण होत होती. त्या फळ्यांच्या दोन टोकांना दोऱ्या बांधून त्या दोऱ्या खांद्याभोंवतीं अडकवून हे लोक चीज आणीत होते. कामाच्या गडबडींतहि प्रेक्षकांच्यामधून नोकर लोक झटपट कुशलतेनें वाट काढीत चालले होते. 'ही-ही' असा तोंडानें आवाज काढून एका वेळीं चीजचे दीड-दोनशें गोळे नेण्याचें काम ते करीत होते. जुन्या पद्धतीच्या कांट्यावर चीजचें वजन करून त्याची विक्री होत होती. हा सारा देखावा इतका छान होता कीं, तेथून हलावेंसें वाटत नव्हतें. आपण विसाव्या शतकांत आहों याचा विसर पडून चौदाव्या-पंधराव्या शतकांत जन्म घेतला आहे कीं काय असें वाटण्याइतपत आपण तल्लीन होऊन जातों. जुन्या काळचें वातावरण टिकविण्यासाठीं हॉलंडमध्यें विशेष प्रयत्न केले जातात. यांत्रिक सुधारणांचा रसहीन प्रवाह पाहून उबगलेल्या मनाला हें जुनें पण जिवंत वातावरण पाहून प्रसन्न वाटतें.

बारा वाजतां हें मार्केट बंद झाल्यावर मी एक प्रसिद्ध धरण (*Dyke*) पहायला गेलों. हॉलंडच्या उत्तर टोंकाला 'डेन ओव्हर' हें गांव असून तेथें हें

धरण आहे. अल्कमारपासून २५ मैल अंतर आहे. मी बसनें तेथें दीडच्या सुमारास पोहोंचलों.

या धरणाचा इतिहास मोठा रोमहर्षक आहे. हॉलंडच्या उत्तरेस जो समुद्र आंत घुसला आहे त्यास झुइडर झी ( Zuider zee ) म्हणतात. हा सर्व भाग हटवून तेथें जमीन तयार करण्याचे प्रयत्न अनेक शतकें चालू आहेत. १५ व्या शतकाच्या आसपास बराच समुद्र हटवला जाऊन झुइडर झीचा हल्लींचा आकार त्याला प्राप्त झाला. तेथें जमीन करण्याची कल्पना मुख्य मंत्री डॉ. लेली यांची. इ. स. १९१६ मध्यें त्यांनीं या योजनेस राष्ट्राची अनुमति मिळविली. सुरवातीला मध्यभागीं ब्रीझन्ड हें कृत्रिम बेट तयार करण्यांत आलें. धरण बांधण्यास अनेक ठिकाणीं सुरवात झाली. समुद्रहि फारसा खोल नव्हता, त्यामुळें पुष्कळसें काम झटपट झालें. जसजसें धरण पुरें होऊं लागलें तसतशा अडचणी वाढूं लागल्या. समुद्राच्या लाटांचा तडाखा ह्या एकाच भागावर बसूं लागला. जोरजोराचे प्रवाह वाहूं लागले व सर्व धरणच्या धरण वाहून जाईल कीं काय अशी भीति वाटूं लागली. निरनिराळे शास्त्रीय उपाय योजून हा दाब कमी करण्याचे यत्न झाले. शेवटीं मानवी प्रयत्नांना यश येऊन अखेरची उरलेली फट बुजविण्यांत आली. तो दिवस २८ मे १९३२, दुपारीं १ वाजून २ मिनिटें. त्या वेळीं आसपासच्या जहाजांनीं शिंगें फुकलीं व मानवानें आपला विजय साजरा केला. ज्या ठिकाणीं शेवटची फट बुजली तेथें एक स्मारक उभारलें आहे. त्याच्या एका बाजूस " या ठिकाणीं २८ मे १९३२ रोजीं धरणाचें काम पूर्ण झालें " असें कोरलें आहे. दुसऱ्या बाजूस ' जें राष्ट्र जिवंत राहतें तेंच आपल्या भावी काळासाठीं नवरचना करूं शकतें ' ( A nation that lives builds for its future ) असें वाक्य कोरलें आहे.

या धरणाची रुंदी अडीचशें फूट आहे. धरणावरून मोटारींसाठीं एक उत्कृष्ट रस्ता बांधला आहे. सायकलस्वार व पादचारी यांच्याकरितांहि स्वतंत्र रस्ते आहेत. रेल्वेरस्ता अजून बांधला नाहीं, पण त्यासाठीं जागा ठेवली आहे. हें धरण बांधण्यास ५०० जहाजें वाळू लागली व १२ कोटी गिल्डर म्हणजे १८ कोटी रुपये खर्च आला.

धरण बांधणें ही नुसती सुरवात होती. पंपाच्या साहाय्यानें पाणी

काढून सर्व झुइडर झीच्या जागीं जमीन करणें हें काम राहिलेंच होतें. धरणाची बांधणी चालू असतांना वीरिंजर या भागांतील पाणी काढून तेथें शेती करण्यालायक जमीन तयार करण्यांत आली. १९३७ ते ४२ या काळांत दुसरा तुकडा तयार झाला. याप्रमाणें हळूहळू सर्व भूभाग तयार होईल. शास्त्रीय ज्ञान व यंत्रसामुग्री यांच्या बळावरच हें काम सुलभ झालें. नवे रस्ते, नवीं घरें इ० बांधलीं जाऊन हा भाग तयार झाला. प्रत्येक घरांत टेलिफोन, वाहतें पाणी, ड्रेनेज इ० सोयी केल्या आहेत. आतां या भागांत अनेक खेडीं वसलीं आहेत व नवें जीवन सुरू झालें आहे.

१९४० सालीं दुसरें महायुद्ध सुरू झालें. हॉलंडचा सर्व भाग जर्मनांनीं व्यापला. १९४५ पर्यंत या धरणाच्या आसपासच्या प्रदेशांतील व वीरिंजर येथील जीवन सुरळीत चालू होतें. पण त्यानंतर हॉलंडमधील क्रांतिकारक या भागांत भूमिगत झाल्याचा जर्मन सैन्याला संशय आला. हे क्रांतिकारक सहजासहजीं सांपडत नाहींत असें पाहून वीरिंजरचें रक्षण करणाऱ्या धरणाला सुरुंग लावून भगदाड पाडण्यांत आलें. ही गोष्टी १७ एप्रिल १९४५ ला घडली – आणि त्यानंतर बरोबर १७ दिवसांनीं जर्मनी शरण आला! पण जर्मनीच्या या कृत्यानें वीरिंजरचा भाग जलमय झाला. पिकें, घरें, खेडीं हें सर्व वाहून गेलें. डच सरकारनें अधिकारावर येतांच पुन्हां लगेच २१ जूनला भगदाड बुजविण्यास सुरवात केली. ५ ऑगस्टला तें काम पूर्ण झालें. नाताळच्या आंत सर्व पाणी काढण्यांत आलें. इतक्या घाईनें काम केल्या-मुळें रस्ते व कालवे सुरक्षित राहिले. – अशी ही या धरणाची कथा आहे!

हॉलंड हा लहानसा देश आहे. त्या मानानें लोकसंख्या वाढती आहे, म्हणून समुद्र हटवून, नवीन जमीन तयार करणें व ती लागवडीखालीं आणणें हा खटाटोप येथें सारखा चालू असतो. या उपायाचा अवलंब करून हें राष्ट्र जिवंत राहण्याचा प्रयत्न करीत आहे.

"माझ्या जीवनाचा—मीच शिल्पकार, स्वर्गीय मंदिर—उभारीन!"

ही काव्योक्ति या राष्ट्रानें खरी करून दाखविली आहे.

धरण पहायला आलेल्या प्रवाशांत एक हिंदी गृहस्थ होते. हॉलंडमध्यें हिंदी लोक क्वचित्‌च दिसतात. त्यामुळें साहजिकच आम्हीं बोलायला सुरवात केली. श्री. आचार्य म्हणून बंगलोरचे गृहस्थ होते ते. यूनेस्कोच्या योजनेंत ते

उत्तर आफ्रिकेंत आले होते व सध्यां रजा घेऊन हॉलंडला आपल्या डच मित्राचा पाहुणचार घेण्यासाठीं आले होते. त्यांच्या विनंतीवरून त्यांच्या मोटारींतून मी संध्याकाळीं सहाच्या सुमारास आमस्टरडॅमला परत आलों.

जेवण उरकतों तोंच माझे मित्र डॉ. गोव्हर्स व इतर मंडळी मला भेटण्यास आलीच. आज संध्याकाळीं भेटायचें काल ठरलें होतेंच. डॉ. गोव्हर्स आपली मोटार घेऊन आले होते व मोटारींतून दक्षिण हॉलंडचा कांहीं भाग मला दाखविण्याचें त्यांनीं योजिलें होतें. त्याप्रमाणें त्यांच्या मोटारींतून आम्ही आमस्टरडॅम विमानतळ, हार्लेम हें गांव, सँडपोर्ट व ब्लाऊमेनपोर्ट हीं नैऋत्येकडील बंदरें वगैरे भागांतून ६०–७० मैलांचा प्रवास करून रात्रीं १०॥ ला आमस्टरडॅमला परत आलों. हवा उत्तम होती म्हणून उघड्यावर असलेल्या एका कॅफेमध्यें आम्ही कॉफी पीत बसलों. अशीं उघड्यावरचीं कॅफेज् हॉलंडमध्यें भरपूर आढळतात. दुसऱ्या दिवशीं उजाडत आमस्टरडॅम सोडण्याचा माझा बेत होता. म्हणून माझ्या मित्रांची भेट होण्याचा हा शेवटचा प्रसंग होता. गप्पा खूप रंगांत आल्या. कॉफीचा एक कप संपला कीं दुसरा मागवला जाई. असें प्रत्येक जण माझें आदरातिथ्य करीत होता. शेवटीं गप्पांच्या भरांत रात्रीचा एक वाजला तरी आम्हांला त्याचा पत्ता लागला नाहीं! कॅफेचा मॅनेजर म्हणाला, " कॅफे बंद करण्याची वेळ झाली आहे. " तेव्हां आम्ही नाइलाजानें उठलों. माझ्या चार डच मित्रांचा निरोप घेण्याची पाळी आली. आम्ही सर्वजण एकमेकांच्या हातांत हात घालून रस्त्यानें चाललों व त्या सर्वांनीं मला माझ्या राहत्या ठिकाणापर्यंत पोंचविलें. शेवटीं आर्त मनानें आम्हीं एकमेकांचा निरोप घेतला.

रात्रीं उशिरां झोपलों तरी सकाळीं थोडें लवकर उठावें लागलें. न्याहारी करून हें पत्र लिहायला घेतलें. आज आतां १० च्या गाडीनें मी आमस्टरडॅम सोडून हेगला जाणार आहें. तिथून पत्र पाठवीनच.

कळावें. ती. नाना व सौ. आई यांना शि. सा. नमस्कार.

तुझा,
**भाऊ**

* * *

पत्र ३१ वें

# हेगमधील आकर्षणें

॥ श्री ॥

रॉटरडॅम (हॉलंड), दि. १७ ऑगस्ट, १९५२.

प्रिय उषास अनेक आशीर्वाद.

शनिवार दि. १६ रोजीं दुपारीं ११ वाजतां मी आमस्टरडॅमहून हेगला आलों.

हेग शहराची वस्ती ५॥ लक्ष आहे. बिनेनहॉफ हा या शहराचा सर्वांत जुना भाग असून तेथें जुन्या काळच्या बऱ्याच इमारती दिसतात. हेगला खरें महत्त्व येथील शांति-प्रासादा ( Peace Palace ) मुळें आलें आहे. या राजवाड्यांत तडजोडी घडविण्याचें कायमचें न्यायालय ( Permanent Court of Arbitration ) आणि आंतरराष्ट्रीय न्यायालय ( International Court of Justice ) या दोन संस्था काम करतात. या संस्थांचा इतिहास मनोरंजक व उद्बोधक आहे.

**१. तडजोडी घडवून आणण्याचें न्यायालय :—** १८९८ सालीं रशियाचा झार दुसरा निकोलस यानें एक जागतिक शांतता परिषद् भरविण्याची योजना मांडली. ही पहिली शांतता परिषद् १८९८ सालींच ‘वनसदना’ ( The House in the Woods ) मध्यें भरली. वाढत्या शस्त्रनिर्मितीला आळा घालणें हा या परिषदेचा मुख्य हेतु होता. पण या बाबतींत परिषदेला अपयश आलें. मात्र दोन राष्ट्रांतील तंटे मिटविण्यासाठीं तडजोडी घडवून आणण्यासाठीं एक कायमचें न्यायमंदिर स्थापण्याचा निर्णय या परिषदेंत घेण्यांत आला. प्रत्यक्ष कोर्टाची स्थापना कांहीं झाली नाहीं. पण या न्यायालयास मान्यता देणाऱ्या प्रत्येक राष्ट्रानें चार मध्यस्थांचीं ( Arbitrators ) नांवें पाठवायचीं व दोन राष्ट्रांत तंटा निर्माण झाल्यास या यादींतून प्रत्येक राष्ट्रानें दोन मध्यस्थ सुचवायचे. दोन राष्ट्रांचे असे चार मध्यस्थ येतील. पांचवा मध्यस्थ त्या चार मध्यस्थांनीं सुचवायचा. या पांच जणांनीं त्या दोन राष्ट्रांतील

तंटा सोडवायचा असें ठरलें. तंटा मिटल्यावर साहजिकच मध्यस्थांचें काम संपे व न्यायालयहि बरखास्त होई. या न्यायालयावर देखरेख ठेवण्यासाठीं एक नियामक मंडळ ( Board of Directors ) नेमण्यांत आलें. त्या मंडळाचे सदस्य म्हणून निरनिराळया देशांचे जे वकील हॉलंडमध्यें असतील त्यांची नेमणूक करावी असें ठरलें. आतांपर्यंत या न्यायालयानें २३ तंटे सोडविले आहेत.

**२. शांति-प्रासाद**:—१८९८ सालीं भरलेल्या शांतता-परिषदेंत प्रामुख्यानें भाग घेणाऱ्या फ्रेड्रिक द मार्टेन्स ( रशियन कौन्सिलर ऑफ स्टेट ) याच्या मनांत तडजोड घडवून आणणाऱ्या न्यायालयाची स्वतःची अशी एक इमारत असावी असें आलें व म्हणून १९०० सालीं बर्लिनमधील अमेरिकन वकिलाची गांठ घेऊन या इमारतीस कोणी अमेरिकन नागरिक आर्थिक साहाय्य करूं शकेल का अशी त्यानें विचारणा केली. तेव्हां अँड्रय् कार्नेजी या धनाढ्य अमेरिकन गृहस्थाचें नांव पुढें करण्यांत आलें. अँड्रयू कार्नेजी हा एका गरीब स्कॉटिश विणकऱ्याचा मुलगा होता. पुढें त्यानें आपलें नशीब काढलें. अमेरिकेंत तो एका पोलादाच्या कारखान्याचा मालक बनला. तडजोड घडयून आणण्याच्या न्यायालयाच्या इमारतीसाठीं १५ लक्ष डॉलर्सची मदत करण्याचें त्यानें कबूल केलें. या इमारतीस शांति-प्रासाद हें नांव द्यायचें ठरलें. इमारत हेगला बांधायचें आधींच ठरलें होतें. निरनिराळ्या शिल्पकारांकडून इमारतीची रचना मागविण्यांत आली. एका फ्रेंच शिल्पकाराची योजना मंजूर झाली व १९०७ सालीं बांधकामाला सुरुवात झाली. त्याच सुमारास दुसरी शांतता परिषद् भरली. ही इमारत बांधण्यास प्रत्येक राष्ट्रानें कांहींना कांहीं सामान द्यावें अशी फ्रेंच प्रतिनिधीनें सूचना मांडली. त्याप्रमाणें प्रत्येक राष्ट्रानें चित्रें, लांकूड, दगड इत्यादि सामान दिलें. इमारतीच्या बाहेरचा बगीचा कसा तयार करायचा याविषयींची एका इंग्रजाची योजना मान्य झाली.

२८ ऑगस्ट १९१३ रोजीं ही इमारत बांधून पुरी झाली.

**३. शांति-प्रासादांतील ग्रंथालय**:— राष्ट्राराष्ट्रांत तडजोडी घडविणारें न्यायालय शांति-प्रासादांत असल्यामुळें तेथें एक आंतरराष्ट्रीय कायद्याचें ग्रंथालय असावें असें ठरलें. त्याप्रमाणें सध्यां या ग्रंथालयांत

देशोदेशींचीं कायदेविषयक अडीच लक्ष पुस्तकें असून कायद्याचें हें एक उत्कृष्ट ग्रंथालय समजलें जातें. हें ग्रंथालय सर्वांना खुलें आहे.

**४. आंतरराष्ट्रीय न्यायदानाचें कायमचें न्यायालय—** ( Permanent Court of International Justice )— 'लीग ऑफ नेशन्स' च्या सनदेनुसार पहिल्या महायुद्धानंतर १९२२ सालीं या न्यायालयाची स्थापना झाली. पूर्वीच्या शांतता-परिषदेंत फक्त मध्यस्थांचीं नांवें सुचवून तडजोड घडवून आणणारें न्यायालय स्थापन झालें होतें. पण आतां एक कायमचें न्यायालय ( Court of Justice ) निर्माण झालें. या न्यायालयाचे सुरवातीस ११ न्यायाधीश काम पहात. नंतर १५ जण काम पाहूं लागले. 'कॉन्सिल ऑफ् लीग ऑफ नेशन्स' व 'असेम्ब्ली ऑफ लीग ऑफ नेशन्स' यांनीं हे न्यान्याधीश ९ वर्षांच्या मुदतीनें निवडलेले असत.

**न्यायदानाची पद्धत :—** "न्यायालयाचा निर्णय आम्ही मान्य करूं" असें न्यायदानापूर्वी जर दोन्ही राष्ट्रांनीं मान्य केलें असेल तरच जो कांहीं न्याय दिला जाईल तो दोन्ही राष्ट्रांना बंधनकारक असतो. तंटा कोर्टापुढें आल्यानंतर प्रत्येक राष्ट्रानें कोर्टापुढें आपलें म्हणणें लेखी द्यायचें असतें. त्यानंतर तोंडी पुरावा मांडला जातो. त्या वेळीं आपली बाजू कशी बरोबर आहे याचें समर्थन प्रत्येक राष्ट्रानें करायचें असतें. नंतर साक्षी होतात व मग न्यायालयाचा निकाल दिला जातो. १९२२ ते ४० या काळांत ३१ तंट्यां-बाबत या न्यायालयानें आपलीं निर्णायक मतें दिलीं व २६ तंट्यांचे बाबतींत सल्ला दिला. हा सल्ला बंधनकारक नसतो.

१९४० सालीं हॉलंड जर्मनीच्या ताब्यांत गेला व या न्यायालयाचें कामकाज बंद पडलें.

**५. न्यायदानाचें आंतरराष्ट्रीय न्यायालय** ( International Court of Justice ):—वॉशिंग्टनजवळील डम्बर्टन ओक्स् येथें १९४४ सालीं भरलेल्या परिषदेंत 'लीग ऑफ नेशन्स' च्या धर्तीवर जागतिक सुरक्षिततेसाठीं एक संस्था काढण्याचें ठरलें. त्या संस्थेचा एक भाग म्हणून न्यायदानाचें आंतरराष्ट्रीय न्यायालय हेग येथें स्थापन करण्याचें ठरलें. ही संस्था आंतरराष्ट्रीय न्यायदानाच्या कायमच्या न्यायालयाचे धर्तीवर स्थापिली

होती. १८ एप्रिल १९४६ पासून हेगच्या शांति-प्रासादांत या संस्थेचें कामकाज सुरू झालें.

६. **आंतरराष्ट्रीय कायदा-समिति** ( Academy of International Law ) :— १९२३ सालीं ही संस्था स्थापन झाली. विद्यापीठाला मिळणाऱ्या उन्हाळयाच्या सुटींत प्रसिद्ध प्राध्यापकांनीं विद्यार्थ्यांसाठीं जागतिक कायद्यावर कांहीं व्याख्यानें द्यावींत असा या संस्थेचा मूळ हेतु होय. हीं व्याख्यानें फुकट असून त्यासाठीं कांहीं शिष्यवृत्त्याहि ठेवल्या आहेत. १९३९ सालीं ३१ राष्ट्रांतील ३५४ विद्यार्थी येथें आले. १९५० सालीं ४८ राष्ट्रांतील ५१७ विद्यार्थी आले; व ८ राष्ट्रांतील १२ प्राध्यापकांनीं व्याख्यानें दिलीं.

शांति-प्रासादाच्या प्रमुख दिवाणखान्यांतून हिंडण्यास परवानगी आहे. बरोबर वाटाडे असतात. ते निरनिराळया भाषांतून माहिती सांगत असतात. " हे दिवे हेग-नगरपालिकेनें दिले, हे संगमरवरी दगड इटलींतून आले, हे दरवाजे बेल्जमचे, हीं बाकें ब्राझीलहून आलीं, हीं तावदानें ब्रिटननें दिलीं, हें कारंजें डेन्मार्कचें, " अशी बारीकसारीक माहिती ते पुरवतात.

विशेषतः न्यायदानाचें आंतरराष्ट्रीय न्यायालय जेथें भरतें तो ' सर्वोच्च न्यायालय ' ( Great Court of Justice ) हा हॉल उत्तम आहे. एक खूप मोठें टेबल असून त्यामागें न्यायाधिशांना बसण्यासाठीं खुर्च्या ठेवल्या आहेत. समोर दुभाषे, लघुलेखक व वकील यांच्या जागा आहेत. त्यामागें प्रेक्षकांची बसण्याची सोय आहे. या दिवाणखान्यांत काचेचीं चार तावदानें असून त्यांवर मानवाच्या रानटी अवस्थेपासून तों थेट राष्ट्रांतील मतभेद युद्धाच्या मार्गानें सोडविणें बंद होईपर्यंतच्या काळांतील प्रगतीचीं चित्रें रेखाटलीं आहेत. भिंतीवर एका फ्रेंच चित्रकारानें काढलेलें चित्र आहे. त्यांत दोन योद्ध्यांना युद्धापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न एक स्त्री करीत असून तिच्यामागें उभा असलेला पुरुष मध्यस्थीच्या मार्गानें त्यांच्यांतील भांडण मिटवीत आहे असें दृश्य आहे. सत्य व न्याय यांचें दिग्दर्शन करणाऱ्या दोन स्त्रियांचे दोन पुतळे दोन कोंपऱ्यांत ठेवले आहेत.

दुसरा महत्त्वाचा दिवाणखाना म्हणजे तडजोड घडवून आणणाऱ्या न्यायालयाचा. तेथें मधोमध एक मोठें टेबल असून दुतर्फा खुर्च्या आहेत. प्रत्येक खुर्चीवर प्रत्येक देशाचें मानचिन्ह ( Coat of arms ) आहे. या

खुर्च्या त्या त्या देशांच्या फ्रेंच मूळाक्षरांतील अकारविल्ह्यानुसार मांडल्या आहेत. मध्यभागीं ठेवलेली खुर्ची ही मुख्य चिटणिसाची. चिटणीस नेहमीं डच असतो. या खोलीचें मुख्य सौंदर्य म्हणजे भिंतींवर लटकलेले सुंदर पडदे. हे जपानी आहेत. त्यामुळें या खोलीला जपानी खोली असें म्हणतात. निरनिराळया प्राण्यांचें व फुलांचें जीवन त्यांवर रंगविलें आहे. सयामच्या राजानें दोन प्रचंड हस्तिदंत भेट म्हणून दिले तेहि या खोलींत आहेत. सुबक नक्षीकाम केलेलीं दोन मोठीं चिनी मातीचीं भांडीं चीननें दिलीं आहेत. स्पेननें चांदीच्या बारा दौती दिल्या आहेत. मध्यभागीं एक चांदीची मोठी दौत असून ती पोर्तुगालची भेट आहे. जमिनीवर उत्कृष्ट सतरंजी अंथरली असून ती तुर्कस्तानांतून आलेली आहे.

अशा रीतीनें सर्व राष्ट्रांच्या एकजुटीनें निर्माण झालेला हा शांति-प्रासाद पाहून मीं दुपारीं एकच्या सुमारास हेग सोडलें व रॉटरडॅमला जायला निघालों. तेथें मी दीड वाजतां पोंचलों. प्रथम लंच घेतली व स्टेशनसमोरील 'व्ही. व्ही. व्ही.'त (म्हणजे टूरिस्ट इन्फर्मेशन आफिसांत) गेलों. तेवढी दुपार व संध्याकाळ रॉटरडॅममध्यें काढून मला दुसऱ्या दिवशीं हॉलंड सोडायचें होतें. त्या ऑफिसांतील लोकांनीं माझी राहण्याची सोय त्यांच्याच वसतिगृहांत केली व जेवण्याची व्यवस्था मिसेस् पीअरश्रूम या बाईच्या घरीं केली. त्यांचें घर स्टेशनजवळच होतें. दुपारीं ३ ते ५॥ एवढ्या वेळांत बसमधून करावयाची एक सहल व्ही. व्ही. व्ही. नें आंखली होती असें समजलें. बस रॉटरडॅम शहराभोंवतीं हिंडून येणार होती. ही सहल मला फारच सोयीची होती, म्हणून मीं सहलीसाठीं नांव नोंदविलें; व अशा रीतीनें घाईघाईनें का होईना, रॉटरडॅम शहर पाहण्याचें पुण्य लाभलें.

रॉटरडॅमची लोकसंख्या ६॥ लक्ष असून युरोपचें एक मोठें बंदर म्हणून त्याची ख्याति आहे. मास ही नदी शहराच्या मध्यभागांतून वाहत जाते. हे दोन्ही भाग नदीच्या खालून जाणाऱ्या एका बोगद्यानें जोडले आहेत. हा बोगदा ११७० यार्ड लांब आहे. गेल्या महायुद्धांत या शहरावर अतोनात बॉम्बवृष्टि झाली. त्यामुळें शहरांतील अनेक जागा ओसाड दिसतात. रेल्वे-स्टेशन भरवस्तींत असूनहि आसपास एकसुद्धां इमारत उभी नाहीं. आतां रॉटरडॅमची आधुनिक पद्धतीनें पुनर्रचना चालू आहे.

शहरांत अनेक म्यूझियम्स आहेत. पण मला एकहि पाहायला वेळ झाला नाहीं.

उद्यां सकाळीं मी हॉलंड सोडून बेल्जममध्यें जाईन. यानंतर पुन्हां मँचेस्टरला जाईपर्यंतचा माझा प्रवास मी चारच दिवसांत संपवणार आहें. या धांवपळीच्या प्रवासांत वाटेंतील प्रदेश पाहायलाहि पुरेशी उसंत मिळेलसें वाटत नाहीं. तरी मी मँचेस्टरला पोंचलों कीं तिथूनच सविस्तर पत्र लिहीन. तोंपर्यंत—' व्हेसगूट ! '

युरोपचा हा जो मीं धांवता प्रवास केला तो मला मोठा रम्य व उद्‌बोधक वाटला. ' जग हें चलत्‌चित्र आहे ' ( The world is a passing show ) हें प्रवासांत यथार्थतेनें पटतें. हा प्रवास म्हणजे माझ्या आयुष्यांतील अमोल स्मृति ठरेल याची मला खात्री आहे. वर्ड्स्वर्थ कवीनें डॅफोडिल्सच्या फुलांचा एक सुंदर ताटवा पाहिला. " मला कधीं उदासवाणें वाटूं लागलें कीं तीं सुंदर फुलें माझ्या नेत्रांसमोर नाचतात व मग माझें मनहि प्रसन्नवृत्ति धारण करतें," असें त्यानें म्हटलें आहे. माझ्या या प्रवासांतील सुंदर स्मृति माझ्या मनाला असाच दिलासा देतील असें मला वाटतें.

प्रिय उषा, तुला ती सोन्याच्या पांखराची गोष्ट माहीत आहे का ? तो पक्षी रोज रात्रीं बागेंत यायचा व सकाळीं अचानक निघून जायचा. कुण्णाला दिसायचा नाहीं. सकाळीं उठून बागेंत त्याला शोधायला जावें तर रोज एक सोन्याचें पीस मात्र सांपडायचें !

— मला वाटतें कीं, आपल्या जीवनांतील आनंदहि त्या पांखरासारखा आहे. माझ्या या प्रवासांतील आनंद मला आतां पुन्हां अनुभवतां येणार नाहीं. पण त्यानें माझ्यासाठीं रम्यमधुर स्मृतींचीं सोन्याचीं पिसें मागें ठेवलीं आहेत.

— तींच आतां जतन करून ठेवायचीं !

ती. नाना व सौ. आई यांना शिरसाष्टांग नमस्कार.

तुझा,

**भाऊ**

* * *

# मननाकरितां कांहीं प्रश्न

[ हीं पत्रें मुख्यतः विद्यार्थ्यांकरितां प्रसिद्ध करण्यांत येत आहेत. तीं ज्यांच्या वाचनांत येतील त्यांनीं तीं वाचल्यानंतर त्यांतील मजकुराचें मनन करावें व पुढील प्रश्नांचीं उत्तरें देण्याचा प्रयत्न करावा. ]

( १ ) पैसे घेऊन परकीय विद्यार्थ्यांची (आणि इतरांचीहि) आपल्या घरीं राहण्याची आणि जेवणाची सोय इंग्लिश कुटुंबें करतात. युरोपांतील इतर कांहीं देशांतहि अशी पद्धत आढळते.

या पद्धतीचे फायदे-तोटे कोणते ?

आपल्याकडे विद्यार्थ्यांकरितां अशी सोय करणें कितपत इष्ट व शक्य आहे ?

( २ ) विलायतेंतील शिस्तीसंबंधींचे कोणते उद्‌बोधक अनुभव या पत्रांतून आले आहेत ?

असे आणखी कांहीं अनुभव तुमच्या वाचण्यांत अथवा ऐकण्यांत आले आहेत काय ?

या दृष्टीनें आपल्या सामाजिक जीवनांत कोणत्या उणिवा दिसतात ?

त्या उणिवा दूर करण्याकरितां आपण कसा प्रयत्न करावयास हवा यासंबंधीं कांहीं व्यवहार्य सूचना तुम्हांस करतां येतील काय ?

( ३ ) विलायतेंतील नाताळसारखे सण आणि आपल्याकडील दिवाळी–दसरा असे सण यांची तुलना केल्यास एकमेकांच्या कोणत्या चालीरीतींचें त्यांनीं व आपण अनुकरण करण्यासारखें आहे ?

( ४ ) सहावे जॉर्ज यांच्या मृत्यूकडे पाहण्याचा इंग्रजांचा दृष्टिकोन कोणता होता ? अशासारख्या प्रसंगीं आपल्याकडे लोकांचें वर्तन कसें असतें ? हा फरक कां ?

(५) इंग्रजांच्या विवाहपद्धतींतील वैशिष्ट्यें कोणतीं? त्यांच्या पद्धतींतील कोणत्या चांगल्या गोष्टी आपणांस अनुकरणीय आहेत? आपल्या विवाहपद्धतींतील कोणत्या चांगल्या गोष्टी त्यांना अनुकरणीय वाटतील?

(६) राष्ट्रभाषेचा प्रश्न नॉर्वेजियन लोकांनीं कसा सोडविला? तो प्रश्न संपूर्णपणें सुटावा म्हणून आतां त्यांनीं काय प्रयत्न चालविले आहेत? आपल्याकडे त्या मानानें भाषेचा प्रश्न अवघड कां?

(७) बर्गन–ऑस्लो हा रेल्वेप्रवास विशेष स्मरणीय कशामुळें झाला? त्या प्रवासांतील कोणत्या सोयी आपल्याकडे त्वरित होण्यासारख्या आहेत?

(८) हेलसिंकीच्या ऑलिंपिक सामन्यांत हिंदी खेळाडूंनीं कोणता विशेष पराक्रम गाजविला? इतर देशांच्या मानानें गुण मिळविण्यास भारतीयांनीं कोणत्या दृष्टीनें आपले खेळ सुधारले पाहिजेत?

(९) पुढील देशांतील लोकांचे कोणते राष्ट्रीय गुण म्हणून म्हणतां येतील? इंग्लंड, हॉलंड, नॉर्वे, फिनलंड, जर्मनी, डेन्मार्क.

(१०) परदेशप्रवासाचे कोणते फायदे या पत्रांतून व्यक्त होतात?

(११) परदेशीय विद्यार्थ्यांनीं पाहण्यासारखीं आपल्या देशांतील ठळक ठिकाणें म्हणून कोणतीं सांगतां येतील? त्या विद्यार्थ्यांच्या प्रवासाची, राहण्याची व त्यांना तीं ठिकाणें दाखविण्याची सोय आपण कशी करूं शकूं?

(१२) या पत्रांच्या भाषेंतील गुणदोष कोणते?

---